अस्तरावरील पाषाण चित्रात राजा शुद्धोदनाच्या दरबारातील दृश्य आहे. त्यात तीन ज्योतिषी बुद्धाची आई–मायाला स्वप्नाचा अर्थ समजावून सांगत आहेत. इ. स. दुसऱ्या शतकातील नागार्जुन-कोंडा येथील एका शिल्पात कोरलेल्या या प्रसंगात खालच्या बाजूला बसलेला राजचिटणवीस स्वप्नाचा अर्थ लिहून घेत आहे. भारतातील लेखन कलेचा शिल्पबद्ध पुरावा देणारे हे अत्यंत पुरातन शिल्प असावे असा अंदाज आहे.

राष्ट्रीय संग्रहालय, नवी दिल्ली यांच्या सौजन्याने

# राजस्थानी साहित्याचा इतिहास

लेखक
हीरालाल माहेश्वरी

अनुवादिका
सविता जाजोदिया




साहित्य अकादेमी

*Rajasthani Sahityacha Itihas* ( राजस्थानी साहित्याचा इतिहास ) . Marathi translation by Savita Jajodia of Hiralal Maheshwari's *History of Rajasthani Literature,* Sahitya Akademi New Delhi (1990) Rs · 75–00



First Edition · 1990

*Published by* :
Sahitya Akademi
Head Office ·
Rabindra Bhavan, 35, Ferozeshah Road, New Delhi 110 001
Sales Department :
Basement in 'Swati', Mandir Marg, New Delhi 110 001

*Regional Offices* :
172, M M G. S. Marg, Dadar (East), Bombay 400 014
29, Eldams Road, Teynampet, Madras 600 018
'Jeevan Tara', 23-A / 44-X, Diamond Harbour Road,
Calcutta 700 053

*Printed by* :
Prabhat Printing Works
427, Gultekadi
Pune 411 037

किंमत : ७५ रुपये

# भूमिका

अकराव्या शतकात राजस्थानीला जेव्हा बोलीभाषेचे रूप आले तेव्हापासून ते तिचे साहित्य समृद्ध व प्रगत असल्याचा दावा ती करू शकेल तेथपर्यंतचा म्हणजे १९७९ पर्यंतचा राजस्थानी साहित्याचा आढावा घेण्याचा प्रयत्न पुढील पानामधून केलेला आहे

राजस्थानी साहित्य व्यापक व बहुविध आहे. ही सपदा बहुधा हस्तलिखिताच्या स्वरूपात आहे. ही हस्तलिखिते फक्त राजस्थानीतच नव्हे तर देशातील अन्य प्रातातही विखुरलेल्या व्यक्तींनी व सस्थानी आस्थापूर्वक काळजी घेऊन जतन करून ठेवली आहेत. यापैकी कित्येक हस्तलिखिते तसेच व्यक्तींनी प्रकाशित केलेली पुस्तके सहजासहजी उपलब्ध नाहीत ती मिळवणे, त्यांचे चिकित्सक परीक्षण करणे, अध्ययन करणे हे जिकिरीचे काम फलदायी असले तरी सोपे नाही

आधुनिक लेखकाच्या साहित्याच्या बाबतीत वेगळाच प्रश्न आहे. त्याचे साहित्य विभिन्न मासिकामधून व खाजगी प्रकाशनामधून विखुरलेले आहे त्यापैकी कित्येक लेखक अजूनही भरघोस साहित्य रचना करीत आहेत त्यामुळे त्यांच्या संपूर्ण साहित्याचे मूल्यांकन करता येत नाही त्या सर्वांचा वैयक्तिक परामर्श घेण्याएवजी विभिन्न साहित्यिक प्रवाहाचा परामर्श घेऊन तदनुषंगाने प्रत्येक लेखकाचा वा त्याच्या साहित्यकृतीचा सदर्भ देणे मी अधिक पसत केले आहे. त्यामुळे काही ठिकाणी पुनरावृत्ती टाळता आलेली नाही.

प्रस्तुत इतिहास हा अशा प्रकारचा इग्रजीतील पहिलाच प्रयत्न आहे राजस्थानाबाहेरील वाचकाना राजस्थानच्या सास्कृतिक ठेव्याची व राजस्थानी साहित्याच्या संपन्नतेची कल्पना यावी हा या लेखनामागचा मूळ उद्देश आहे. तो साध्य करण्यासाठी, अनुवादाचा आश्रय घ्यावा लागला आहे एका भाषेतून दुसऱ्या भाषेत अनुवाद करण्याचा प्रयत्न करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीला, साहित्यिक सौंदर्य, सयुक्तकल्पना आणि गर्भितार्थ एका भाषेतून दुसऱ्या भाषेत व्यक्त करण्यातील प्रचड अडचणीची जाणीव असेलच हे काम प्राय अशक्य कोटीतीलच आहे मानवी भावना सर्वत्र सारख्याच असतात हा माझा विश्वास आहे मला आशा आहे की माझ्या या नम्र प्रयत्नामुळे राजस्थानी साहित्याच्या समृद्ध सौंदर्याची

ओझरती छटा दिसून येईल आणि अभ्यासू वाचकाची जिज्ञासा जागृत होईल तेवढे झाले तरी माझे श्रम सफल होतील

काल निदर्शनासाठी सर्वत्र इसवी सन वापरलेला आहे त्यासाठी विक्रम संवत मधून ५७ उणे करून गणना करण्याचा सामान्य नियम पाळलेला आहे

साहित्य अकादमी, नवी दिल्लीने हे काम माझ्यावर सोपविले यासाठी मी त्यांचा ऋणी आहे राजस्थान विद्यापीठाने जर या अध्ययन कार्यासाठी मला रजा दिली नसती तर हे महत्कार्य मी यशस्वीरित्या पार पाडू शकलो नसतो. उप-कुलपती आणि कार्यकारी मंडळाचा मी आभारी आहे श्री विष्णू दत्त शर्मा, भूतपूर्व अध्यक्ष, राजस्थान साहित्य अकादमी (संगम), उदयपूर यांनी प्रस्तुत ग्रंथाचे हस्त-लिखित वाचले व बहुमोल सूचना केल्या यासाठी मी त्यांचा अत्यंत आभारी आहे मात्र प्रस्तुत इतिहासात व्यक्त केलेल्या मताची जबाबदारी त्यांच्यावर मुळीच नाही, श्री. राधाकृष्ण नेवटिया, कलकत्ता यांनी त्यांच्याजवळचे हस्तलिखित मला अभ्यासू दिले हा त्यांचा मोठेपणा. त्या हस्तलिखिताची फक्त एकच प्रत अस्तित्वात आहे. श्री. रावत सारस्वत व डॉ. बी. एम जवलिया यांच्या बहुमोल साह्यासाठी मी त्यांचा आभारी आहे. डॉ एन के बाहेटी, श्री आर डी सोमाणी, श्री टी आर. माजू, श्री एम. जी सारडा, श्री. डी एन जाजू, श्री. आर. के. राठी, डॉ आर के गोदरा, श्री. रतन शाह, डॉ के. सी. कासलीवाल, श्री. के सी. केडान आणि श्री. के एस तिवारी यांनी केलेल्या मदतीसाठी मी त्यांचा आभारी आहे. श्री. एम एन नीलकण्ठ पिल्लै आणि श्री आर सी कलानी यांनी हस्तलिखिताची प्रत तयार केली यासाठी मी त्यांचाही आभारी आहे. श्री. एम आर जामी, इंग्रजी विभाग, राजस्थान विद्यापीठ, यांचे ऋण शब्दात व्यक्त करता येतील असे मला वाटत नाही. त्यांनी चिकित्सक दृष्टीने संपूर्ण हस्तलिखित तपासले, मननपूर्वक सूचना केल्या, चालना देणारे विचार मांडले आणि न कंटाळता सहकार्य दिले। त्यांच्या दीर्घ व सोशिक सहाय्यामुळेच मी हे महत्कार्य पूर्ण करू शकलो सौ भगवतीदेवी माहेश्वरी यांच्या समंजसपणा व सहकार्याने हाती घेतलेले हे काम पूर्ण करण्यास मला पाठबळ दिले. त्यांचे आभार शब्दात व्यक्त करणे कठीण आहे

**हीरालाल माहेश्वरी**

बी—१७४ ए, राजेन्द्र मार्ग,
बापूनगर, जयपुर.
१५ मे, १९८०

# अनुक्रमणिका

प्रकरण पहिले

# प्रास्ताविक

# प्रदेश व भाषा

राजस्थान म्हणताच शौर्य व स्वातंत्र्याच्या उज्ज्वल परंपरेची आठवण होते. शूरवीर, सती व संत याचा हा देश भारताच्या संस्कृती, कला व शिल्पकला यांचे महत्त्वपूर्ण केंद्र बनून राहिला आहे त्याचे साहित्य बहुरंगी व्यापक व समृद्ध असून गली एक हजार वर्षे त्याची अखंड परंपरा अबाधित चालू राहिली आहे. त्याच परंपरेचा आढावा घेण्याचा प्रयत्न पुढे केलेला आहे.

## राजस्थान : निर्मिती

आजच्या राजस्थानातील घटक प्रदेश पूर्वीच्या काळी वेगवेगळ्या नावानी ओळखले जात कित्येकवा त्याचे राज्यकर्ते पालटल्याने विभिन्न प्रदेशांच्या सीमा-देखील बदलल्या जात या प्रदेशापैकी उत्तरेकडील भाग जागल या नावाने ओळखला जाई. पूर्वेकडील मत्स्य, दक्षिणेकडील मेडपाट, वागड, वल्ल, त्रवणी, आग्नेयेकडील भाग शिवि आणि मध्यवर्ती भाग अर्बुद व सपादलक्ष या नावाने ओळखला जाई. या सर्व प्रदेशासाठी राजपुताना हे नाव जॉर्ज थॉमस याने आपल्या 'मिलिटरी मेमॉयर्स'मध्ये १८०० साली पहिल्यांदा वापरल्याचे दिसते. राजपूत सरदाराचे या प्रदेशावर शासन असल्याने त्याने हे नाव दिले असावे १८२९मध्ये कर्नल टॉड याने आपल्या 'ॲनल्स ॲन्ड ॲन्टिक्विटीज ऑफ राजस्थान' या सुप्रसिद्ध ग्रंथात राजपुताना ऐवजी 'राजस्थान' शब्द वापरला, कारण तेथे राज्यसंस्थाने होती. तेव्हा-पासून या प्रदेशाचा निर्देश करण्यासाठी ही दोन नावे वापरली जातात. त्यातल्या त्यात 'राजस्थान' हे नाव अधिक लोकप्रिय झाले इंडियन नॅशनल काँग्रेसनेही हे नाव मान्य केले आणि स्वातंत्र्यानतर भारत सरकारनेदेखील हेच नाव स्वीकारले. या ठिकाणी एक उल्लेख करावयास हवा की पूर्वी मुहनोत नैणसी (१६१०-१६७०) याने आपल्या 'ख्यात'मध्ये आणि रतनू वीरभाण (१६८८-१७३५) याने आपल्या 'राजरूपक' मध्ये राजधानीसाठी हा शब्द वापरला होता.

लहान मोठी २१ संस्थाने आणि पूर्वी केंद्रशासित प्रदेश असलेल्या अजमेरच्या 'क' संस्थानाचा विभाग मिळून हल्लीचे राजस्थान राज्य तयार झालेले आहे. संस्थानाची नावे पुढीलप्रमाणे आहेत. (१) अलवर, (२) भरतपुर, (३) धोलपुर, (४) करोली, (५) बाँसवाडा, (६) बूंदी, (७) डुंगरपुर, (८) झालवाड़, (९) कोटा, (१०) कुशलगढ, (११) किशनगढ, (१२) लावा, (१३) प्रतापगढ, (१४) शाहपुरा, (१५) टोंक, (१६) उदयपुर, (१७) जयपुर, (१८) जोधपुर, (१९) बीकानेर, (२०) जैसलमेर, (२१) सिरोही

या सर्व संस्थानाच्या एकीकरणाचे कार्य टप्प्या-टप्प्यानी पूर्ण करण्यात आले. २८ फेब्रुवारी १९४८ ला सुरवातीची चार संस्थाने एकत्र करून 'मत्स्य' विभाग तयार करण्यात आला. २५ मार्च १९४८ रोजी पुढील अकरा संस्थानांचा (५ ते १५) प्रदेश एकत्र करून राजस्थान संघ स्थापन करण्यात आला.

राजस्थान राज्य करण्यासाठी त्यास १ एप्रिल १९४८ ला उदयपुर जोडण्यात आले.

नंतर ३० मार्च १९४९ला या राज्यात जयपुर, जोधपुर, बीकानेर व जैसलमेरचा समावेश करण्यात आला.

त्यानंतर लगेच म्हणजे १५ मे १९४९ ला 'मत्स्य' प्रदेश व ७ फेब्रुवारी १९५०ला सिरोही संस्थानाचे यात विलीनीकरण करण्यात आले.

अखेर १ नोव्हेंबर १९५६ रोजी अजमेर, अबू (मुंबई राज्याचा एक विभाग) आणि पूर्वीच्या मध्य भारतातील मंदसोर जिल्ह्याच्या भानपुरा तहसीलमधील सुनेल या राज्यास जोडण्यात आले. अशा तऱ्हेने, हल्लीचे राजस्थान राज्य तयार झाले. भौगोलिक दृष्टया अरवली पर्वतराजीने याचे दोन नैसर्गिक विभाग पाडलेले आहेत— वायव्य विभाग आणि आग्नेय विभाग

## राजस्थानी : मरु भाषा

सामान्यतः प्रदेश, प्रांत वा राज्यावरून तेथील भाषेचे नाव ठरतं. कधी कधी मुख्य बोलीच्या नावावरून वा ती बोलणाऱ्या लोकांवरूनही भाषेचे नाव पडते. राजस्थानी हे नाव राज्याच्या नावावरून पडले असून ते सर्वसंमत झालेले आहे. अर्थातच राजस्थानी हे नावही तसे नवीनच आहे. जुने व लोकप्रिय नाव होते मरु भाषा (गोपाल लाहोरीने आपल्या 'रस-विलास' मध्ये १५८७ साली ते वापरले होते). या भाषेची आणखी नावे होती— मरु भूम भाषा (माच्छ कवीने आपल्या 'रघुनाथ रूपक गीतां रो'मध्ये वापरलेले), मरु-बाणी आणि मरुदेशीय भाषा (सूर्यमल्ल मिश्रणने आपल्या 'वंशभास्कर'मध्ये वापरलेले) आणि मरुभाषा (आसिया मोडजीने आपल्या 'पाबूप्रकाश'मध्ये वापरलेले) उद्योतन सूरीने ७७८ साली (वि. सं. ८३५ मध्ये) रचलेल्या 'कुवलयमाला'त इतराबरोबरच मरु

प्रदेशाच्या लोकांची व त्यांच्या भाषेची वैशिष्ट्ये सांगितलेली आहेत 'कुवलयमाला' मध्ये एक ओळ आहे—'अप्पा तुप्पा भणी रे अद पेच्छै मारुए तत्रो' (मरु प्रदेशाचे लोक 'अप्पा तुप्पा' बोलतात). बोलीचा हा सर्वात प्राचीन उल्लेख महत्त्वाचा असला तरी त्यावरुन 'मरु भाषे'विषयी स्पष्ट कल्पना येत नाही.

## उत्क्रान्ती व विकास

आर्यकुलोत्पन्न भाषांच्या उत्क्रान्ती व विकासाच्या पायऱ्या पुढीलप्रमाणे होत · (१) वैदिक वा छांदस-संस्कृत (इ आय ए. इ स पूर्व १५०० ते इ. स. पूर्व ५००), (२) प्राकृत-अपभ्रंश (एम. आय ए. इ. स. पूर्व ५०० ते इ. स १०००) आणि (३) 'देशीभाषा'-राजस्थानी सह (एन. आय ए. इ स. १००० पासून पुढे). प्राकृतच्या सहा मुख्य शाखांपैकी, उदाहरणार्थ, पाली, अर्धमागधी, शौरसेनी, महाराष्ट्री, मागधी व पैशाची यांपैकी पहिली दोन रूपे त्यातल्या त्यात प्राचीन समजली जातात. बौद्ध व जैन धर्मग्रंथ अनुक्रमे पाली व अर्धमागधी भाषात लिहिलेले आहेत. पाली ही भाषा जरी प्राकृतचेच एक रूप असली तरी तिला बहुधा प्राकृत संबोधत नाहीत. प्रत्येक विकसित भाषेची दोन रूपे असतात. काव्यमय भाषा व लोकप्रिय बोली भाषा. भाषेचा विकास हा बोली भाषेच्या आधारे होत असतो. आर्य कुलोत्पन्न सर्व भाषांच्या बाबतीत वर उल्लेखिलेल्या प्रत्येक पायरीच्या वेळी नेमके हेच घडले असावे त्याचे पुरावे मात्र आढळत नाहीत प्राकृतचा कालखंड ढोबळ मानाने इ. स. पूर्व ५०० ते इ स. ५०० समजला जातो प्रत्येक प्राकृतचे निदान एक तरी अपभ्रंश रूप आढळते व ते तिच्या वाढीचे द्योतक आहे.

## प्राकृत-अपभ्रंश : राजस्थानी

ऐतिहासिक दृष्ट्या राजस्थानीच्या उत्क्रान्तीचा शौरसेनी प्राकृतशी संबध लावता येईल. मुळात ही मथुरा प्रदेशाची भाषा होती आणि पश्चिमेकडे गुजरात व सौराष्ट्रपर्यंत तिचा प्रसार होता. या पश्चिमेकडच्या रूपात काही वैशिष्ट्ये निर्माण झाली, जसे– शब्दाच्या सुरुवातीच्या 'द्व' अक्षराचे 'ब' मध्ये रूपांतर होते (द्वारका-बेरका, द्वे-बे), 'क्ष' चे रूप होते 'च्छ' वा 'छ' अशा तऱ्हेने 'क्षुद्र' होते 'छुद्द' पण पूर्वेकडच्या रूपात मात्र त्याचे 'क्ख' वा 'ख' (खुद्द) होते संस्कृत 'ऋ' चे 'अ' होते. पूर्वेकडील रूपात त्याचे 'इ' होते. या पश्चिमेकडील रूपात 'स्त्र'चे 'स्त्र'च राहते पण पूर्वेकडील रूपात त्याचे 'त्थ' होते.

शौरसेनी प्राकृतपासून दोन प्रमुख अपभ्रंश भाषा विकसित झाल्या. शौरसेनी नावाची पूर्वेकडील वा 'मध्यदेशीय' आणि 'गुर्जर' वा 'गुर्जरी' नावाची पश्चिमेकडील 'गुर्जर' अपभ्रंश म्हणून ओळखता येणाऱ्या या पश्चिमेकडील प्रदेशातील भाषेत अपभ्रंशाच्या प्रारंभीच्या वैशिष्ट्यांचा पहिल्यांदा विकास झाला, हे मत आता बहुतेक सर्व विद्वानांनी मान्य केले आहे. गुर्जर अपभ्रंशापासून राजस्थानी भाषेचा

विकास झाला आणि शौरसेनी अपभ्रंशापासून खडी बोली, बांगरू, व्रज, कनौजी व बुंदेली या भाषाचा विकास झाला.

सध्या उपलब्ध असलेल्या अपभ्रंश साहित्याचे तीन विभाग केलेले आहेत : पूर्वेकडील, उत्तरेकडील आणि पश्चिमेकडील. बौद्ध धर्माच्या वज्रयान शाखेच्या सिद्धाच्या साहित्यात अपभ्रशाचे पूर्वेकडील रूप दिसून येते 'महायान प्रकाशा'त उत्तरेकडील अपभ्रंशाचा नमुना आढळतो या दोन रूपांत आढळणाऱ्या साहित्य-कृतीची संख्या फार कमी आहे. अपभ्रश साहित्यापैकी बरेचसे साहित्य पश्चिमेकडील अपभ्रशात आहे. काही अपवाद वगळता पश्चिमेकडील अपभ्रंश साहित्याचे बहुतेक सर्व महत्त्वाचे लेखक जसे स्वयंभू, पुष्पदंत, धनपाल, मुनि कनकामर, धवल, रेधू, यश कीर्ति, नयनदी, धाहल, श्रीधर, हरिभद्र, वगैरे जैन होते या जैन अपभ्रश साहित्याचे भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून अध्ययन अद्यापि झालेले नाही

वर दिलेल्या तीन प्रकारच्या अपभ्रंशांमध्ये अनेक सामान्य वशिष्ट्ये दिसून येतील. या खेरीज स्थानीय बोली भाषेची काही वैशिष्ट्येही आढळतात. ढोबळ-मानाने असे म्हणता येते की अपभ्रशाचे सामान्य रूप पश्चिमेकडील अपभ्रशावर आधारित होते अपभ्रशात लेखन करणाऱ्या प्रत्येकाने हे प्रमाणभूत रूप आपल्या-समोर ठेवले होते.

हेमचद्राने संग्रहित केलेल्या 'सनतकुमार चरिऊ' मधील दोहयांमध्ये व 'कुमारपाल प्रतिबोध' आणि इतर काही साहित्यकृतीमधील पद्यामध्ये आढळणाऱ्या भाषेला 'गुर्जर अपभ्रंश' म्हणतात. पश्चिमेकडील अपभ्रंशाची सर्व वैशिष्ट्ये 'गुर्जर अपभ्रशा'तही आढळतात जुनी राजस्थानी (किंवा मरु–गुर्जर) ही 'गुर्जर अपभ्रंशा'-पासून विकसित झाली असल्याने तिची सर्व वैशिष्ट्ये हिच्यात आढळतातच , शिवाय तत्कालीन प्रचलित व लोकप्रिय बोलीभाषेच्या काही लकबीही आढळतात. भाषा-शास्त्रीय दृष्टिकोनातून इ. स. ५०० ते इ. स. १००० हा अपभ्रंशाचा कालखंड असला तरी १३ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत काव्यांची भाषा म्हणून तिचा वापर होत असल्याचे आढळते. 'देसी' वा जुन्या राजस्थानी भाषेच्या खुणा ११ व्या व १२ व्या शतकातील रचनांमधून दिसून येतात. उदाहरण म्हणून धनपाल विरचित 'सक्क उरिय महावीर उत्साह' (१० वे शतक वा ११ व्या शतकाचा पूर्वार्ध) आणि पल्ल विरचित 'श्री जिनदत्त सूरि स्तुति' (१२ वे शतक) यांचा उल्लेख करता येईल.

## जुनी राजस्थानी : काही उल्लेखनीय वैशिष्ट्ये

गुर्जर अपभ्रंशापासून 'देसी' वा 'जुनी राजस्थानी' कशी उत्क्रान्त झाली ते पुढे दिलेल्या वैशिष्ट्यांवरून दिसून येईल—

(१) जोड व्यजन सोपे साधे करून त्यापूर्वीच्या अक्षरातील स्वर दीर्घ कर-ण्यात येतो. अप. 'कम्म' = 'काम' (२) 'पृथक्करणात्मक' रूपाकडे विकास. संस्कृत;

प्राकृत व अपभ्रंश या 'संयोगीकरणात्मक' भाषांच्या गटातील आहेत (३) संस्कृत तत्सम शब्दांबरोबर प्राकृत व अपभ्रंशातील तद्भव शब्दाचा वापर. ४) वर्तमान-काळात 'छै' सारख्या साहायक क्रियापदाचा वापर. (५) संस्कृतपासून तद्भव शब्दाची निर्मिती. जुन्या तद्भवपासून जसे– 'कज्ज'='काज', नवीन तद्भव– 'कारज' वापरात आले (६) उभयान्वयी क्रियापद व काळ यांचा विकास. (७) विविध विभक्ती गाळणे व काही प्रत्ययाचा वापर, जसे– दोन्ही क्रमाकांत नौ, रौ, सौं, मै इत्यादी (८) अपभ्रंशातील अनुस्वाराच्या जागी अनुनासिकाचा उपयोग व आधीच्या स्वराचे दीर्घीकरण अप 'पंच' = 'पाच'.

११ व्या शतकात १०५० इ. स. च्या सुमारास ज्यावेळी जुनी राजस्थानीचा अस्तित्वात आली त्यावेळी या सर्व प्रवृत्तीना आकार यायला सुरवात झाली. आजच्या अवलोकनाचा तोच मूळ बिंदू होय.

## मरु-गुर्जर : राजस्थानीचे पृथकत्व

अशा प्रकारे हल्लीचे राजस्थान व गुजरात राज्य असलेल्या देशाच्या पश्चिम भागात, जेथे पूर्वी लोकप्रिय गुर्जर अपभ्रंश प्रचलित होती तेथे प्राचीन राजस्थानीचा विकास झाला व ११ व्या शतकात तिला निश्चित भाषाशास्त्रीय रूप येऊ लागले. १४५० इ. स पर्यंत प्राचीन राजस्थानी व गुजराती या एकच भाषा होत्या. त्यानंतर त्या वेगवेगळ्या व्हावयास सुरवात झाली. या उभयसामान्य भाषेस मरु–सोरठ, जुनी पश्चिमेकडील राजस्थानी, जुनी गुजराती, जुनी राजस्थानी आणि मरु–गुर्जर अशी नावे देण्यात आली. त्यापैकी अखेरचे मरु–गुर्जर हे नाव अधिक योग्य होय. अशा प्रकारे प्राचीनकालीन (१०५०–१४५०) साहित्य हा गुजराती व राजस्थानी दोन्ही भाषाचा समाईक ठेवा आहे.

१५ व्या शतकाच्या पूर्वार्धात दोन्ही भाषाचा स्वतंत्रपणे विकास व्हावयास सुरवात झाली आणि परिणामी आधुनिक राजस्थानी अस्तित्वात आली. जुन्या राजस्थानीपासून तिचे वेगळेपण मुख्यत: पुढील बाबतीत दिसून येते—

(अ) दोन नवीन स्वरांची उत्क्रांती— 'ऐ' आणि 'औ'. संस्कृत स्वरसयोग– 'अ + इ' आणि 'अ + ड' याच्यापासून हे वेगळे आहेत

(आ) शुद्ध लेखनात 'अ + इ' आणि 'अ + उ' याच्या ऐवजी 'ऐ' आणि 'औ'-चा वापर 'अ + इ' आणि 'अ + उ' याचा वापर हे जुन्या राजस्थानीचे सर्वसामान्य वळण होते. त्याच्या जागी 'ऐ' आणि 'औ'चा उपयोग १५ व्या शतकाच्या सुरवातीपासून होऊ लागला

(इ) शब्दोच्चारात अन्त्य 'अ', 'इ' व 'उ' चा लोप

(ई) नपुंसक लिंग गाळण्यात आले किंवा पुल्लीगात त्याचा समावेश करण्यात आला.

अशा प्रकारे भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून मध्ययुगीन राजस्थानीच्या काल-खडास सुमारे १४५० इसवी सनापासून सुरवात झाली.

## बोलीभाषेचे संदर्भ

राजस्थानचे विभिन्न विभाग व निकटवर्ती प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या बोली-भाषाचे नमुने प्राचीन हस्तलिखितातील स्फुट रचनामध्ये नमूद केलेले आहेत अशाच एका गद्य रचनेत गुर्जरी, माळवी, मराठी व पूर्वी भाषेची उदाहरणे आढळतात. (राजस्थानी, भाग ३, क्र ३, जानेवारी, १९४० कलकत्ता). नव-बोली-मध्ये गुजराती, थटाइची, जैसलमेरी, मुलतानी, उत्तरादि, पूर्वी, तैलंगी, दिल्लण व खुरासानी भाषेची पदे आढळतात. आठ देस री गुजरीमध्ये पंजाबी, व्रज, मेवाती, लाहौरी, मारवाडी, ढूंढाडी, काबली व बागडीची पदे मिळतात. राजस्थान भारती (क्र. ३–४, भाग ३, जुलै १९५३, बीकानेर) मध्ये आणखी तीन रचना प्रसिद्ध केलेल्या आहेत. त्यापैकी एकात, पजाबी, मुलतानी, दक्षिणी गुजराती, पूर्वी व मार-वाडी भाषेतील 'सवैये' आढळतात. दुसऱ्यात ढूढाडी, मारवाडी, गुजराती, गोढवाडी, पजाबी, हाडौती, दक्षिणी व चौबोली (पजाबी, पूर्वी, गुजराती व मारवाडीची एकेक ओळ सवैया छदात रचलेली) यांची उदाहरणे सापडतात. विभिन्न बोलीच्या, विशेषतः राजस्थानीच्या अभ्यासासाठी हे साहित्य फार महत्त्वाचे आहे

## डिंगल : मरु भाषा

मरु भाषेला डिंगल असेही म्हणतात. १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत दोन्ही एकच समजल्या जात. चालू शतकाच्या प्रारंभी मारवाडमध्ये हरप्रसाद शास्त्री यांचे 'प्रिलिमिनरी रिपोर्ट ऑन द ऑपरेशन इन सर्च ऑफ मॅन्युस्क्रिप्टस ऑफ बार्डिक क्रॉनिकल्स' प्रसिद्ध झाले. त्यानंतर डॉ. तेस्सितोरी व इतर विद्वानानी 'डिंगल' (तसेच पिंगल) भाषेच्या अर्थ व उद्भवाविषयी बरीच उपपत्ती लावली आहे. पण निश्चित निर्णयाप्रत काही ते पोचू शकले नाहीत. आपण त्या वादविवादात शिर-ण्यात काही अर्थ नाही कारण त्यातून काहीच निष्पन्न होणार नाही. 'डिंगल' चे जे साहित्य आहे त्यावरून आपण ती समजून घेण्याचा प्रयत्न करूया. डिंगल भाषा साहित्यिक व अन्य रूप असलेल्या तसेच काव्याची भाषा व लोकांची भाषा अस-लेल्या मरु भाषेशी समानार्थक, असल्याचे आमचे मत आहे. सरजनदास पुनिया (१५८३–१६९१) या संत कवीने १६४० च्या सुमारास किंवा तत्पूर्वी रचलेल्या एका 'छप्पय'मध्ये डिंगल व पिंगल दोन्हींचा भाषा म्हणून उल्लेख केलेला आढळतो. तो सर्वांत प्राचीन उल्लेख होय.

वरील दृष्टिकोनातून पाहता छंदशास्त्रावर अन्यत्र उपलब्ध असलेल्या विविध ग्रथांचीही दखल आपण घ्यावयास हवी. त्यातून अन्य छंदांबरोबरच, डिंगल गीते व त्यांची आवश्यक वैशिष्ट्ये यांचे विवेचन केलेले आढळते. डिंगल गीते व त्यांची

छंदात्मक रचना याचे मरु भाषेतील (मारवाडी भाषा, मरुभूम भाषा इ. अन्य नावानी ओळखल्या जाणाऱ्या भाषेतील) छंदोरचनेप्रमाणेच विवरण केलेले आहे. यावरून मरु भाषा व डिंगल एकच असल्याचे सिद्ध होते.

डिंगल वा मरु भाषेतील जुन्या लेखकांनी आपापल्या भाषेविषयी जी विधाने केली आहेत त्यावरूनही वरील मताचीच पुष्टी होते. त्यानी म्हटले आहे की या प्रदेशातील बोलचालीच्या भाषेलाही डिंगल म्हणतात. दोन उदाहरणे पुरेशी आहेत. १५ व्या शतकाच्या अखेरीस पदम भगतने 'रुक्मिणी मगल वा हरजी रो ब्यॉवलो' नावाचे एक आख्यानकाव्य रचले ते बोली-भाषेत आहे. त्याचे उपलब्ध असलेले सर्वात प्राचीन हस्तलिखित १६१२ (विक्रम सवत १६६९) चे आहे. नंतरच्या एका हस्तलिखितात ग्रथाच्या परिसमाप्तीच्या पदात म्हटले आहे, 'माझ्या काव्याची भाषा डिंगली आहे. मला व्याकरणाचे ज्ञान नाही. तिला कोणत्याही छंदाची वा क्रमाची माहिती नाही. तिच्यात फक्त दैवी निदिध्यास आहे.'

१८२३ व १८६३ च्या दरम्यान रचलेल्या आपल्या पाडव यशेंदु चद्रिका-मध्ये सत स्वरूपदास म्हणतो, माझी भाषा संमिश्र आहे. तिच्यात डिंगल, पिंगल व सस्कृत आहे. जेणेकरून ती सर्वांना समजू शकेल. महान कवींची मी त्यासाठी क्षमा मागतो.

## पिंगल

सर्वसाधारणपणे पिंगल म्हणजे छंदःशास्त्र. पण राजस्थानात भाषेसाठी हे नाव रूढ झाले. राजस्थानी मिश्रित ब्रजभाषेलाही पिंगल म्हणतात. पिंगलने मरु भाषेतील काव्याची शब्दरचना व शैली उचलली आहे; पण व्याकरणिक रचना मात्र ब्रजभाषेची वा तिला जवळची अशी आहे अशाप्रकारे एकीकडे ती विशुद्ध ब्रजभाषेपासून वेगळी आहे, तर दुसरीकडे डिंगल वा राजस्थानीपेक्षा निराळी आहे. पिंगलच्या शब्दसग्रहात राजस्थानीचे लोकप्रिय प्रचलित शब्द आढळतात. उदाहरणार्थ 'कड' शब्द. (संस्कृतमधील 'कटि') याचा राजस्थानीत अर्थ आहे कमर. 'ड' चे 'र' मध्ये रूपातर होते. हा बदल करून पिंगलमध्ये 'कर' शब्द तयार झाला. सामान्यतः कर म्हणजे हात; पण पिंगलमध्ये त्याचा कमर असाही अर्थ आहे. ते काही असो, अपवाद वगळता, पिंगल ही फक्त काव्याची भाषा होती.

## पिंगल काव्याचे प्रकार

पिंगल काव्यात पुढील वैशिष्ट्ये दिसून येतात. व्याकरणिक रचना ब्रज भाषेसारखी असते. शब्द योजना विशुद्ध साहित्यिक स्वरुपाची असते राव डुगरसी याचे पृथ्वीराज रासौ, शत्रुसाल रासौ, कुभकरण याचे रतन रासौ, नल्लसिंह भाट याचे विजयपाल रासो, मान याचे राजविलास, दयालदास याचे राणा रासौ, सूर्यमल्ल मिश्रण याचे वंश भास्कर (याचा बराच भाग) इत्यादी पिंगल भाषेतच

रचलेले आहेत. ही सर्व कथात्मक व वर्णनात्मक काव्ये असून प्रस्तुत अध्ययनाच्या कक्षेबाहेरील आहेत

पिंगल काव्याचे दुसरे रूप बहुताशी राजस्थानच्या संत काव्यात दिसून येते. संतानी आपल्या भावना व विचार सोप्या भाषेत व्यक्त केले. तसे करताना ज्या ज्या ठिकाणी ते हिंडले त्या त्या प्रदेशातील बोलीभाषेचे प्रचलित लोकप्रिय शब्द त्यांनी उचलले व आपल्या काव्यात वापरले आपल्या कल्पनाचा प्रचार करणे व त्या समजावून सागणे हा त्यामागील हेतू होता. या काव्यांची व्याकरणात्मक रचना राजस्थानीला जवळची होती. यापैकी बरीचशी पदे फक्त राजस्थानातच लोकप्रिय नसून, उत्तरानाही त्यापासून स्फूर्ती मिळाली आहे. संत काव्याची परंपरा अद्याप लोप पावलेली नाही. या प्रकारच्या काव्यात संत पीपा यांची पदे व साखी सर्वांत प्राचीन होत. याच कारणास्तव प्रस्तुत ग्रंथात आम्ही संत काव्याच्या या प्रकाराचा परामर्श घेतला आहे

आणखी एक प्रकारच्या लोकप्रिय काव्यात राजस्थानी व खडी बोलीचे संमिश्रण आढळते या प्रकारच्या काव्याची व्याकरणिक रचना कधी राजस्थानीला जवळची वाटते तर कधी खडी बोलीला जवळची वाटते. या अशा प्रकारात अधून मधून पंजाबीचीही पुसटशी छटा दिसून येते.

खडी बोलीच्या व्यापक व शीघ्र प्रसाराला मुख्यत्वे दोन कारणे जबाबदार आहेत : मुस्लिम शासनाची वाढ व विस्तार आणि नाथ सिद्धांचा प्रादुर्भाव व संघटन. नाथ संप्रदायाचा देशात सर्वत्र प्रसार झाला. कालांतराने नाथ शैली व भाषेचे अनुसरण करणाऱ्या काही संत कवींनी खडी बोलीला प्रोत्साहन दिले.

नीसाणी, झूलणा व चांद्रायण यांसारख्या काही छंदामध्ये पंजाबीची किंचित छटा असलेल्या खडी बोलीचा वापर बरेच वेळा आढळतो. बादर ढाढी याची नीसाणी (वीरमायण), सादू माला याचे झूलणा (महाराजा रायसिंघजी रा, अकबर पातशाहजी रा, दीवान प्रतापसिंघजी रा इ.) आणि के सौदास गोडारा, वाजिद इ. ची चांद्रायणे ही काही उदाहरणे होत. कित्येक पदांमध्ये व गद्य लेखनात मुसलमान व नाथ योगी पात्रे खडी बोली बोलतात. प्रारंभीच्या काळातील मुसलमान संत कवींपैकी काझी महमूदच्या पदांमध्ये अशा प्रकारची भाषा वापरल्याचे आढळते' कर्पटनाथ व पृथ्वीनाथसहित अनेक नाथ सिद्धांच्या काव्यातून खडी बोलीचा वापर करण्याकडे कल असल्याचे दिसून येते.

## प्रमुख प्रवाह : चारण काव्य

प्राचीन व मध्ययुगीन कालखंडाचे राजस्थानी काव्य, १९ व्या शतकापर्यंत पाच मुख्य प्रवाहातून वाहत राहिले— (१) जैन (२) चारण (३) आख्यान

(४) सत (५) लौकिक. चारण शैलीच्या काव्याचा व आख्यान काव्याचा परामर्श घ्यावयास हवा.

राजपूत, वीरपूजेची भावना, मध्ययुगीन समाजरचनेतील स्थळ व कार्य, याच्याशी असलेल्या पारपरिक सबधामुळे काही जातीचा, त्यातल्या त्यात चारणाचा या अशा पद्धतीच्या (चारण) काव्याशी अधिक सबध राहिला. अन्य जातीमध्ये मोतीसर, भाट, राव, ढाढी इ चा समावेश होतो. ब्राह्मण, राजपूत, महाजन वगैरे जातींनीही त्यात उल्लेखनीय भर टाकली चारण व भाट याच्यातील धदेवाईक प्रतिस्पर्धेचे पडसाद प्राचीन साहित्यातून उमटलेले दिसतात काव्यरचनेसाठी बहुतेक चारणांनी मरु भाषेचा वापर केला, तर भाटानी पिंगल वापरली; पण १७ व्या शतकापासून यात बदल झाला कित्येक चारणानी पिंगलमध्ये काव्यरचना केली व भाट आणि राव यानी डिंगलमध्ये काव्य रचले

चारण व राजपूत याच्या संबंधाची मुळे इतिहासात खोलवर रुजलेली आहेत. शूर वीराबरोबर चारणही रणागणावर जात असत. कित्येकदा तेही युद्धात भाग घेत ते फक्त युद्धेच नव्हे तर समकालीन राजपूत जीवनाचे अंग असलेल्या अन्य अनेक घटना व प्रसगही प्रत्यक्ष पहात असत या अशा घटनावरील काव्याचे अतिशयोक्ती वगळता दोन विशेष गुण दिसून येतात . एक, त्यात मूलभूत ऐतिहासिक सत्य असते आणि दुसरे म्हणजे त्यात स्पष्ट, वास्तविक व चित्रमय वर्णन असते. विशेषतः शूर वीर, त्याची शौर्याची कृत्ये व युद्धे यांचे ! चारण काव्यास तोड नाही आणि विद्वानानी केलेली त्याची प्रशसा योग्यच आहे

चारण काव्याचे दोन प्रकार आहेत : निवेदनात्मक व स्फुट दोन्हीची शैली बहुतेक वर्णनात्मक आहे. पहिल्यास विभिन्न नावे आहेत, उदा. रास, रासौ, रूपक, प्रकाश, छंद, विलास, प्रबंध, आयण, सवाद इ. या काव्याना छदाची नावेही दिलेली आढळतात. जसे– कवित्त, कुंडलिया, झूलणा, नीसाणी, झमाल व वेली इ. स्फुट काव्य विभिन्न छदात लिहिले आहे

चारण काव्यात काही छदाचा विपुल वापर केलेला दिसतो. गीत (डिंगल गीत), दोहा, छप्पय, नीसाणी इ चा त्यात समावेश होतो.

वास्तविक गीताचा शोध चारण कवींनीच लावला असावा असे वाटते. राजस्थानी काव्याचे ते आगळे वैशिष्ट्य आहे दोहा हा जसा अपभ्रंशाचा सर्वाधिक लोकप्रिय छद आहे, तद्वत गीत हा राजस्थानीचा आहे गीताचे १२० प्रकार आहेत असे म्हणतात. पण सर्व प्रकारांचे नमुने उपलब्ध नाहीत, छदःशास्त्रावरील ग्रंथातून ७२ ते ८१ प्रकार आढळतात. गीत हे लहान कवितेसारखे असते. ते गात नसतात. पण उच्च स्वरात एका विशिष्ट शैलीने ते म्हणून दाखवतात. ऐतिहासिक घटनाच्या स्मरणार्थ हजारो गीते रचलेली आहेत. विख्यात तसेच अज्ञात शूर वीर व घटनांचे त्यातून वर्णन आढळते. अनेक गीते तात्कालिक रचनेच्या स्वरूपाची आहेत अशा

कवितांना 'साख री कविता' म्हणजेच साक्षरूपी कविता म्हणतात. गीतांमध्ये शूर वीरांच्या संपूर्ण जीवनाचा आलेख आढळतो. गीतामध्ये एखादीच कल्पना, भावना, अनुभूती वा घडामोड घेऊन त्याची पुनरावृत्ती सर्व कडव्यामध्ये केलेली असते. पण शैलीचा थाट व लालित्य यांच्यामुळे ती पुनरावृत्ती कंटाळवाणी वाटत नाही.

गीत रचनेचे छदःशास्त्रीय नियम आहेत ते आहेत–'जथा' (काव्य रचनेची विशिष्ट पद्धती, जथेचे १८ प्रकार आहेत), 'वयणसगाई' (अनुप्रास. याचे कटाक्षाने पालन करतात वयणसगाईचे अनेक प्रकार आहेत) आणि 'उक्ति' (विधान मुळात वक्ता हजर असल्याने, श्रोता व वस्तू). रचनेत 'दोष' टाळावे लागतात. चारण छंदःशास्त्राचे ते विशेष लक्षण असून त्याचे ११ प्रकार आहेत. छप्पयचे २२ प्रकार आहेत, नीसाणीचे १२ प्रकार आहेत व दोह्यांचे २३ प्रकार आहेत.

## आख्यानकाव्य

मध्यकालीन राजस्थानी काव्याचा आणखी एक महत्त्वाचा प्रकार म्हणजे आख्यान काव्य. मध्ययुगात या काव्यानी हिंदू समाजासाठी फार मोठे सांस्कृतिक कार्य बजावले. या काव्यांच्या कथा महाकाव्य वा पुराणातून घेतलेल्या असतात. कथा वा प्रसग अतिशय लोकप्रिय असतात. लोकाचे लक्ष वेधून घेण्यासाठी कथा अतिशय लालित्यपूर्ण काव्यातून सांगण्याचा प्रयत्न केलेला असतो. लोकप्रिय चाली-वर ते काव्य गातात आणि संगीत हे त्याचे मुख्य आकर्षण असते नाट्यमय अंश त्यात अत्यंत कौशल्याने गुंफलेला दिसतो. संवाद संक्षिप्त, अर्थपूर्ण व परिणामकारक असतात. वर्णन मार्मिक, स्पष्ट व आकर्षक असते. भाषा सोपी व ओघवती असते या सर्व कारणांमुळे आख्यान सहज लक्षात ठेवता येते व लोकप्रियतेसाठी, प्रसारासाठी सादर करणे सोपे जाते. धार्मिक कार्याशी बहुधा आख्यानाचा संबंध निगडित असतो त्याचाही आख्यान काव्याच्या प्रसारासाठी उपयोग होतो. सर्वांचे मनोरंजन करण्याचा हेतू असतो पण धार्मिक व सांस्कृतिक परंपरा, आदर्श, कल्पना व मूल्येही अप्रत्यक्ष-पणे व्यक्त होतात. आख्याने बहुधा जागरणांच्या वेळी गाईली जातात. त्यापैकी कित्येकांचा उघड्या रंगभूमीवर सहज नाट्यप्रयोग करता येतो. आख्याने बहुधा लहान असतात, जसे मेहोजीचे रामायण, पदम भगतचे रुक्मिणी मंगल. पण डेलहजीच्या कथा अहमनीसारखी दीर्घ आख्यानेही लिहिली गेली आहेत.

## राजस्थानी : प्रकार, शाखा व काव्यात्म एकरूपता

१५ व्या शतकाच्या पूर्वार्धात राजस्थानीचे पूर्वेकडील व उत्तरेकडील असे दोन प्रकार दिसून येतात. पूर्वेकडील प्रकाराचे वैशिष्ट्य म्हणजे 'कौ' या षष्ठीकारक विभक्तीरूपाचा वापर. अचलदास खीची री वचनिकामध्ये तो आढळतो.

राजस्थानीच्या पाच शाखा आहेत :

(१) **मारवाडी–मेवाडी** ही जोधपूर, बीकानेर, जेसलमेर, उदयपूर, सिरोही

या जुन्या संस्थानात तसेच जयपूरच्या शेखावाटी विभागात, किशनगड, अजमेर, मेरवाडाच्या एका विभागात, पंजाबच्या काही विभागात आणि किंचित फरकाने हरियाणाच्या श्री गंगानगर जिल्ह्याच्या आजूबाजूस बोलली जाते.

(२) **जयपुरी–हाडौती** ही जुन्या संस्थानातील लोकप्रिय भाषा जयपूर (शेखावाटी सोडून) लव, टोंक, किशनगड, अजमेर, मेरवाडाच्या एका विभागात आणि बूंदी, कोटा, झालावाड असलेल्या हाडौती प्रदेशात बोलली जाते

(३) **मेवाती–अहीरवाटी** ही भरतपूर, अल्वर या जुन्या संस्थानाच्या काही भागात, हरियाणातील गुडगाव आणि उत्तर प्रदेशातील मथुरेच्या काही भागात बोलली जाते. हिच्यावर ब्रज आणि हरियाणी भाषाचा किंचित प्रभाव दिसून येतो.

(४) **माळवीमध्ये** मारवाडी व जयपुरी–हाडौतीची वैशिष्टचे असून ती मध्य प्रदेशातील माळवा विभागात बोलली जाते तिच्यात गुजराती, मराठी व बुंदेलीच्या किंचित छटा आहेत

(५) **भीली** वा **बागडी** ही डुंगरपूर, बांसवाडा या जुन्या संस्थानांत तसेच मेवाडच्या काही भागांत लोकप्रिय आहे. गुजरातीचा तिच्यावर किंचित प्रभाव दिसून येतो.

देशाच्या विभिन्न भागात बोलल्या जाणाऱ्या बंजारी व गुजरी भाषाचे राजस्थानीशी जवळचे नाते आहे कारण बहुतेक बंजारे व गुजर हे मुळात राजस्थानचेच रहिवासी होते. नेपाळी व दक्खिनी हिंदी यांचेही राजस्थानीशी दूरचे नाते आहे.

भरतपूर, धोलपूर व करोली संस्थानातील भाषेवर ब्रज भाषेचा प्रभाव दिसून येतो.

उत्तराढी (उत्तरेकडील) वा गंगानगरी हा भाषेचा आणखी एक प्रकार श्री गंगानगर जिल्हा व त्या लगतच्या हरियाणा व पंजाबच्या विभागात प्रचलित आहे. स्वरयुक्तोच्चारण व महाप्राणोच्चारित ध्वनी या बाबतीत तिच्यावर हरियाणीचा व किंचित पंजाबीचा परिणाम दिसून येतो. फरक आहे तो गो, गा, गी यांनी तयार होणाऱ्या संबंधी सर्वनामाच्या वापराच्या बाबतीत आहे हिचा विकास खूप जलद झाला कारण गंगा कालव्याच्या बांधकामासाठी नव्या व्यावसायिक जागी शेजारच्या प्रदेशातून लोकाची ये-जा होत राहिली आणि नंतर १९४७ साली देशाचे विभाजन झाल्यावर हल्लीच्या पाकिस्तानातील पंजाबातून निर्वासिताचा लोंढा आला परिणामी या भाषेच्या विकासाला वेग आला. विभिन्न लोकांचे समान पातळीवर संमीलन झाले की बहुधा भाषा समिश्र होते

स्वरयुक्तोच्चारण आणि बोलीभाषेचा वापर, किरकोळ विभक्ती व भविष्य कालीन क्रियापदे, इ. बाबतीत थोडा फरक वगळता वर उल्लेखिलेल्या सर्व शाखांची व्याकरणात्मक रचना समानच आहे.

वरील सर्व शाखांपैकी मारवाडी भाषेला सर्वांत प्राचीन, समृद्ध व अखंड साहित्यिक परंपरा आहे काव्याच्या भाषेचे स्वरूप आणि अधिकृत मध्यवर्ती भाषेचा दर्जा तिने मिळवला आहे. सुमारे ५०० वर्षे, १९ व्या शतकापर्यंत तिचे हे स्थान टिकून राहिले. सर्व प्रदेशातील कवी व लेखक प्रमाणभूत दर्जा, व्यापक ख्याती व लोकांच्या मनाचा ठाव घेण्यासाठी या भाषेत लेखन करीत राहिले. शैलीतील फरक सोडला तर बूंदीच्या सूर्यमल्ल मिश्रण, जैसलमेरच्या सग्राम (किरात – लिछमी रो संवाद), अल्वरच्या (सटावट खेडे) रामनाथ कविया, सिरोहीच्या (पेशावा खेडे) ओपा आढा, आणि बिकानेरच्या (बोबासर खेडे, सुजानगढ) शकरदान सामोर याच्या काव्याच्या भाषेत काहीही फरक नाही. वात, ख्यात आणि अन्य गद्य साहित्यातही ही अधिकृतता तितकीच ठळकपणे दिसून येते. १९ व्या शतकात या कवीचा उत्कर्ष झाला ही बाब उल्लेखनीय आहे.

## लिपी

देवनागरी ही राजस्थानी भाषेची लिपी आहे. शास्त्री या नावानेही ती सामान्य लोकामध्ये ओळखली जाते. व्यापारी वर्ग याच लिपीचा थोडचा वेगळचा स्वरूपात वापर करतो. या लिपीत शब्दाच्यावर रेघ नसते तसेच स्वरदर्शक खुणा नसतात, देशी जमाखर्चाच्या चोपडयात, वहीखात्यात, पत्रात व हुंडयामध्ये ही लिपी वापरतात. लिहिण्याच्या या पद्धतीला महाजनी बाणियावाटी वा बाणिका म्हणतात आणि वर्णमालेला मोडिया वा मुडिया म्हणतात. यात लिहिण्याच्या कष्टाची आणि वेळेची बचत होऊन लघुलिपीसारखे कार्य होत असले तरी चुकीचा मजकूर वाचला जाण्याची शक्यताही असते. व्यवस्थापकीय कार्यालयातील नागरी लिपीच्या लेखन शैलीला कामदारी हे नामाभिधान लाभले होते. जैनांनी त्यांच्या हस्तलिखित ग्रथांच्या लेखनासाठी त्यांची एक वेगळीच अक्षर लिपी तयार केली होती.

राजस्थानी भाषेची काही वैशिष्टचे खाली देत आहोत—

(१) ल आणि ळ यांचे ध्वनी वेगवेगळे आहेत. ल चा ळ असा उच्चार केला किंवा ळ चा ल असा उच्चार केला की अर्थ बदलतो. उदाहरणार्थ :

| ल | | ळ | |
|---|---|---|---|
| गाल | (गाल) | गाळ | (शिवी) |
| चचल | (चंचल) | चचळ | (घोडा) |
| कुल | (एकूण) | कुळ | (वश) |
| काल | (वेळ) | काळ | (मृत्यू) |
| खाल | (कातडी) | खाळ | (ओहूळ) |
| सूल | (सोपे) | सूळ | (काटा) |

(२) 'व' दोन प्रकारे लिहितात. एका प्रकारात 'व' नेहमीच्या नागरी पद्धतीने

लिहितात आणि दुसऱ्यात वळणाखाली एक बिंदु देतात (व़). जुन्या हस्तलिखित ग्रंथात सर्वत्र हा नियम पाळलेला आढळतो. हे दोन वेगवेगळे ध्वनी आहेत. 'व' हा दंत्योष्ठ्य आणि 'व' हा द्वयोष्ठ्य ध्वनी आहे. रोमन लिपितील व्ही आणि डब्ल्यू याच्याशी त्याचे अनुक्रमे जवळचे नाते आहे. त्याच्या वापरावरून वेगवेगळा अर्थ निघतो. जसे—

| व | | व़ | |
|---|---|---|---|
| वाचियो | (वाचलेला) | वचियो | (मूल) |
| वास | (वास) | वास | (निवास) |
| वळ | (बाक) | वऴ | (भाजले जाणे वा नाहीसे होणे) |

व व़ आणि व याच्या तारतम्यशून्य सढळ वापराने काही वेळा अर्थाचा गोंधळ होतो

(३) ड आणि ड हे देखील दोन वेगळे ध्वनी आहेत. हिंदीत ते वेगवेगळ्या जागी वापरले जातात. राजस्थानीत ते एकाच जागी वापरले गेले तरी प्रत्येक ठिकाणी त्यांचा अर्थ वेगळा असू शकतो जसे—

| ड | | ड | |
|---|---|---|---|
| मोडो | (डोके भादरलेला) | मोडो | (दार वा उशिरा) |
| नाडी | (लहान तलाव) | नाडी | (नाडी) |
| पाडो | (वासरू) | पाड़ो | (उपटणे, काढून टाकणे) |

(४) अनेक शब्द समोच्चारित आहेत उच्चारावर भर दिल्याने अर्थ बदलतो. काही उदाहरणे पुढे दिली आहेत

| सामान्य उच्चार | भर दिलेला उच्चार |
|---|---|
| नानो (आजोबा, आईचे वडील) | नानो (लहान) |
| कद (आकार) | कद (केव्हा) |
| नार (स्त्री) | नार (वाघ) |
| कोड (कौतुक) | कोड (कोढ) |
| सारो (संपूर्ण) | सारो (पाठिंबा) |

(५) राजस्थानीत श, ष व स हे तीन वापरले जात नाहीत. 'श' साठी 'स' वापरतात आणि उच्चारात मात्र दोन्ही ध्वनीतील फरक कायम ठेवतात ष च्या जागी ख वापरतात.

ऋ, लृ, ढ़ आणि ञ वापरत नाहीत

'आ', 'ए', 'ऐ' आणि 'औ' यांच्या ऱ्हस्व स्वराचा वापर आणि शब्दाच्या मध्यभागी 'अ', 'इ', 'य' आणि 'व' यांचे दीर्घीकरण हे काव्याचे सर्वसामान्य

वैशिष्टय होय जात, घराणे, वर्ग वा वंश दर्शविण्यासाठी शब्दाच्या अखेरीस 'वत' आणि 'औत' वा ओत लावतात. 'बीदावत' म्हणजे– बीदाच्या परंपरेतील वा घराण्यातील, 'कांधलोत' चा अर्थ आहे कांधलचा मुलगा तसेच कांधलचा वंश.

'क', 'ज', 'त', 'म', 'र', 'स' आणि 'ह' या वर्णांचा विशिष्ट संदर्भात अव्यय, अविभक्तिक म्हणून वापर करतात. शब्दांच्या मध्यभागी वा अखेरीस आलेल्या महाप्राणोच्चाराने उच्चारणातील प्रारंभीच्या ध्वनीवर परिणाम होतो. (जोध = जोद) अन्य ध्वनीवर परिणाम करणाऱ्या उच्चारात 'हकार' चा फार महत्त्वाचा भाग असतो

राजस्थानीत जोडाक्षरांचा सर्रास वापर आढळतो. अनेक पद्धतींनी व अनेक रूपात त्याचा वापर करतात.

## ऐतिहासिक पार्श्वभूमी

११ व्या शतकाच्या सुरवातीस बलाढ्य प्रतिहार साम्राज्याचा ऱ्हास होऊ लागला होता. त्याच्या अखेरच्या राजाचा–कनोजच्या राज्यपालाचा १०१८ मध्ये गझनीच्या महमूदाने पराभव केल्यावर तर त्याच्या शक्तीचा पार धुव्वा उडाला होता. प्रतिहार मूळचे गुर्जर वा 'गुर्जरदेश'चे होते भिल्लमाल (भीनमाल) आणि जालोर ही त्यांची केंद्रस्थाने होती. ९ व्या शतकाच्या उत्तरार्धात 'आदिवराह' बिरुद असलेला मिहिर भोज हा या वंशातील सर्वांत थोर शासक होता. 'गुर्जर', शब्द भौगोलिक प्रदेश दर्शवितो, एखाद्या जाती, कूळ वा जमातीचा तो द्योतक नव्हे. गुर्जरदेश जेव्हा चालुक्याच्या अंमलाखाली आला तेव्हा त्यांनाही तेच नाव लावले जाऊ लागले त्यावेळच्या गुर्जर देशात फक्त हल्लीच्या गुजरातचा नव्हे, तर पूर्वीच्या जोधपूर संस्थानासह राजस्थानच्या बऱ्याच मोठ्या विभागाचा समावेश होता.

१००० ते १२०० या काळात राजस्थानात वर्चस्व मिळवण्यासाठी अनेक राजपूत घराण्यांत भांडणे चालली होती. त्यात अन्हिलपूर पाटणचे चालुक्य माळव्याचे परमार आणि शाकंभरीचे चौहान मुख्य होते.

९४१ मध्ये मूलराज चालुक्याने गुजरातचे राज्य हस्तगत केले आणि त्याचा विस्तार केला. या वंशात काही विलक्षण शूर व मुत्सद्दी राजे होऊन गेले. त्यापैकी भीमदेवाने नाडोल व आबूवर विजय मिळविला. चालुक्य राजांच्या शासन काळात वास्तुकला व साहित्याचा भरपूर विकास झाला. विशेषतः सिद्धराज जयसिंह व कुमारपाल यांच्या अमदानीत या कलांना बहर आला अनेक अपभ्रंश व मरु-गुर्जर काव्यात या शासनकर्त्यांचा उल्लेख केलेला आढळतो.

अल-उद-दिन खलजीने १२९७ मध्ये गुजरातला दिल्लीच्या सल्तनतशी जोडून टाकले. तेव्हापासून पुढे दिल्लीच्या सल्तनतने मुसलमान राज्यपालाची नेमणूक करावयास सुरवात केली. १३९१ मध्ये महमद तुघलकने झफर खानला राज्यपाल नेमले.

१४०१ मध्ये तो स्वतंत्र झाला श्रीधर व्यासने आपल्या रणमल्ल छंद काव्यात इडरच्या राव रणमल्ल राठोडवर झफरखानाने केलेल्या आक्रमणाचे व त्याच्याशी झालेल्या युद्धाचे वर्णन केले आहे. झफर खानानंतर अहमद शाहने सूत्रे ताब्यात घेतली तो कुशल शासक होता १४४२ मध्ये तो मरण पावला. अहमद शाहनंतर महम्मद शाह सत्तेवर आला. त्याने १४५१ पर्यंत राज्य केले

प्रारंभीच्या काळात सत्ता हाती घेण्याच्या प्रयत्नात परमाराना फारसे यश लाभले नाही. तरी चालुक्यांना त्यांच्या वाढत्या सत्तेला मान्य करावे लागले. मुंज परमारने मूलराजचा पराभव केला. परमारामध्ये भोज सर्वांत थोर राजा होऊन गेला राजस्थानचे चित्तोड, बासवाडा आणि डुंगरपूर विभाग त्याच्या साम्राज्यात होते. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वंशजाचे १३ व्या शतकाच्या अखेरपर्यंत राजस्थानच्या काही प्रदेशावर आधिपत्य राहिले. मुंज व मृणालवती वरील अपभ्रंश काव्ये सुप्रसिद्ध आहेत भोज राजाची कन्या राजमती ही बीसलदेव रास काव्याची नायिका आहे.

१० शतकाच्या अखेरच्या सुमारास शाकंभरीचे चौहान हे प्रतिहार राजसत्तेपासून विलग झाले विग्रहराज द्वितीय या चौहान व मूलराज या चालुक्यांत प्रदीर्घ काळ संघर्ष होत राहिला. त्याच्या वंशात अनेक पिढ्या तो चालू राहिला. सोमेश्वराचा मुलगा पृथ्वीराज तृतीय हा सर्वांत महान चालुक्य राजा होऊन गेला. त्याने कित्येक राजांचा पराभव केला. ११९१ मध्ये तराईच्या युद्धात त्याने मुहम्मद घोरीचा पराभव केला पण पुढच्या वर्षी घोरीने पृथ्वीराज तृतीयचा पराभव करून त्यास ठार मारले. त्यानंतर घोरीने पृथ्वीराजच्या मुलास गोविंदराज यास अजमेरच्या गादीवर बसवले खंडणी द्यावयाची अट त्याने गोविंदराजवर लादली. पृथ्वीराजच्या धाकट्या भावाने हरिराजने गोविंदराजला घालवून अजमेरचा ताबा घेतला व काही काळ त्यावर राज्य केले. ११९४ मध्ये कनौजच्या जयचंदचा पाडाव झाल्यावर मुसलमानानी हरिराजचा पराभव करून त्यास ठार मारले. अशा प्रकारे शाकंभरी वा सपादलक्ष राज्याचा अंत झाला. सुप्रसिद्ध पृथ्वीराज हा विख्यात निवेदनात्मक काव्य पृथ्वीराज रासोचा नायक आहे.

कीर्तिपालने ११७८ मध्ये स्थापन केलेले जालोरचे राज्य हे आणखी एक चौहान राज्य होय. त्याचे वंशज शूरवीर होते. कान्हडदेव तेथील राजा असताना १२९८ मध्ये अल-उद-दिन खिलजीने जेव्हा गुजरातवर स्वारी करण्यासाठी व सोमनाथचा विध्वंस करण्यासाठी त्यांच्या प्रदेशातून सैन्य नेण्याची परवानगी त्याच्यापाशी मागितली तेव्हा त्याने सपशेल नकार दिला. परिणामी त्याला युद्धास तोंड द्यावे लागले. कित्येक वर्षे ते युद्ध चालू राहिले. १३१० मध्ये खलजीच्या सैन्याने सिवाणा ताब्यात घेतले आणि अखेर १३१४ मध्ये जालोर जिंकले. कान्हडदेव धारातीर्थी पडला. निवेदनात्मक काव्य कान्हडदेव प्रबंधमध्ये या घटनेचे वर्णन आढळते.

पृथ्वीराज तृतीयचा मुलगा गोविंद हा रणथंभोर चौहान वंशाचा मूळ पुरुष होय दिल्लीच्या सल्तनतचा तो मांडलीक होता जैत्रसिंहाचा मुलगा हम्मीर १२८३ मध्ये गादीवर आला. आपल्या सर्व पूर्वजांपेक्षा तो सर्वांत अधिक शक्तिशाली व सुज्ञ होता त्याने दोन मगोल भावांना आश्रय दिला होता. दिलेला शब्द पाळण्या-साठी व किल्ला टिकवण्यासाठी १३०१ मध्ये त्याने अल-उद-दिन खलजीशी युद्ध केले आणि त्यातच प्राण दिले. त्याच्या शौर्याची प्रशंसा करणारी अनेक कवने व निर्वेदनात्मक काव्ये रचली गेली. मध्ययुगीन राजस्थानी काव्यात कान्हड देव व हम्मीर या दोघांची नावे राजपूत शौर्याची प्रतीके समजली जातात.

राजस्थानला गझनवी आणि नंतर महम्मद घोरीच्या आक्रमणाला तोंड द्यावे लागले गोगाजी चौहानला पुढे लोकदेव मानले जाऊ लागले. तो गझनीच्या महमूदचा समकालीन होता. १२०० पर्यंत राजस्थानातील नागौर व अजमेर हे मुसलमानांच्या आधिपत्याखाली आले अल-उद-दिन खलजीने मेवाड, सिवाणा, जालोर, जैसलमेर व रणथंभोरवर विजय मिळवला. त्याच्या अमदानीत मुसल-मानांनी पुन्हा राज्य विस्ताराला सुरवात केली. पुढे राजपूतांनी, विशेषत. मेवाडच्या राजांनी आक्रमणाचा कडवा प्रतिकार करण्यास सुरवात केली आणि पुढील अनेक शतके तो चालू राहिला.

१२०० च्या पुढे मेवाडच्या गुहिलांनी महत्त्वाची कामगिरी बजावण्यास सुरवात केली. १२१३ मध्ये गादीवर असलेल्या जैत्रसिंहाने आपल्या राज्याचा चहू-बाजूंनी विस्तार केला. त्याचा नातू समरसिंह यास रणथंभोरच्या हम्मीर व खलजी दोघांच्या हल्ल्यांना तोंड द्यावे लागले. १३०२ मध्ये तो मरण पावला. त्याच्या मुलाने रत्नसिंहाने खलजीशी शौर्याने युद्ध केले आणि १३०३ मध्यें तो मारला गेला. सौंदर्य व लावण्याचे प्रतीक म्हणून राजस्थानी साहित्यात ख्याती लाभलेली पद्मिनी ही त्याची पत्नी होती. पद्मिनीवर अनेक काव्ये रचली गेली पुढे शिसो-दाच्या लक्ष्मणसिंहाचा मुलगा अजयसिंह सत्तेवर आला. त्याचा पुतण्या हम्मीर याने १३३७ मध्ये चित्तोडवर कब्जा केला. तो धाडसी राजा होता आणि दिल्लीच्या साम्राज्याशी त्याने टक्कर दिली. त्याच्या कारकीर्दीत मेवाडला खूप कीर्ती लाभली. त्याच्यानंतर १३६४ मध्ये त्याचा मुलगा खेतसी गादीवर आला. खेतसीला देखील अनेक युद्धे लढावी लागली. बूंदीच्या हाडाविरुद्धच्या त्याच्या एका युद्धाचे अचलो बाणियो याने आपल्या एका डिंगल गीतात वर्णन केले आहे. १३९० च्या सुमारास खेतसी मरण पावला त्याच्या मुलाचा राणा लाखाचा हांसाबाईशी विवाह झाला. हांसाबाई ही मंडोवरचा राव चूडा याच्या मुलाची, राव रणमल्ल राठोडची बहीण. या विवाहासाठी अट घातली गेली होती की तिला जर मुलगा झाला तर पहिल्या राणीचा मुलगा, राजपुत्र चूंडा राज्यावरचा आपला हक्क सोडून देईल. तिला मुलगा झाला. मोकल त्याचे नाव. त्याच्या कारकीर्दीत राठोडांनी मेवाडमध्ये वर्चस्व गाजवले.

मोकल १४१९-२० मध्ये गादीवर आला. त्याची मुलगी पुष्पाई उर्फ लालाँ हिचा गागरोनगडच्या रवीची अचलदासशी विवाह झाला होता. रवीची १४२३ (वि स १४८०) मध्ये मांडूच्या होशंग शाह घोरी विरुद्ध लढताना मरण पावला गाठण शिवदास विरचित अचलदास रवीची री वचनिकामध्ये याचे वर्णन आढळते चूडा माडूला निघून गेला इकडे चाचा आणि मेरा यांनी १४३३ मध्ये अचानक हल्ला करून दगलबाजीने मोकलला ठार केले खुन्यांना ठार मारून राव रणमल्लाने सूड घेतला मोकलनतर १४३३ मध्ये त्याचा मुलगा कुंभा गादीवर आला. मेवाडचा हा सर्वांत थोर राजा होय. त्याच्या कारकीर्दीत वास्तुकला व साहित्याचा उत्कष झाला तो स्वत देखील खूप विद्वान होता राव रणमल्लवर रात्री तो झोपेत असताना हल्ला झाला आणि चितोडच्या किल्ल्यातच तो मारला गेला. १४३८ ची ही घटना. त्याचा मुलगा जोधा त्यावेळी किल्ल्याबाहेर पायथ्याशी राहत होता. त्याला हे वृत्त समजताच त्याने मारवाडमध्ये आश्रय घेतला.

राणा कुंभाच्या कारकीर्दीने प्राचीन काल सपतो. रणमल्ल त्याचा मुलगा जोधा, राणा मोकल व कुंभा याच्यावर गाडण पसायत, खिडिया चानण इत्यादी-सारख्या तत्कालीन कवींनी कित्येक काव्ये लिहिली

जैसलमेवर भाटीचे राज्य होते.

१३ व्या शतकाच्या अखेरीस इतिहासात महत्त्वाची भूमिका वठविण्यास सुरवात करणारे आणखी एक महत्त्वाचे रजपूत घराणे म्हणजे मारवाडचे राठोड १२३५ च्या सुमारास सीहा मारवाडला गेला आणि १२७३मध्ये मरण पावला तो पाली भाषेचा विद्वान होता त्याचा वारसा आस्थानकडे गेला. त्याने गुहिलाकडून खेड जिंकून घेतले. त्याच्या मुलाने धूहडने नागाणा गावी चक्रेश्वरी (नागणेचीजी) देवीची मूर्ती प्रतिष्ठापित केली ही मूर्ती एका ब्राह्मणाने कन्नौजहून आणली होती १३०९मध्ये तो मरण पावला. त्यानतर राजपाल, कनपाल, जालणसी, छाडा, तीडा हे क्रमश. गादीवर आले. त्याच्याविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. तीडाचा मुलगा सलखा याला चार मुले होती— मल्लिनाथ, जैतमाल, वीरम आणि सोभित. मल्लिनाथ १३७४मध्ये महेवाचा अधिपती झाला. बिरडकोट ही त्याची राजधानी होती. विरम १३८३मध्ये जोहियांशी झालेल्या युद्धात मारला गेला. त्याच्या मुलाने चूडाने १३९४मध्ये मडोवर मिळवले आणि दुसरा मुलगा गोगा हा जोहियांबरोबर झालेल्या युद्धात मारला गेला ओडीटचे मोहिल व भाटी याच्याशी युद्ध करताना चूडा धारातीर्थी पडला. त्याची सर्व चौदा मुले 'राव' म्हणून ओळखली जातात. रणमल्ल हा सर्वांत थोरला होय.

राव चूडा, तीडा आणि त्रिभुवसी याच्यावर डिंगल गीते रचलेली आढळतात गीतातून त्याच्या कार्यांचे वर्णन केलेले आहे. मात्र ही गीते रचणाऱ्या कवींची नावे

माहीत नाहीत. या बादर ढाढीने आपल्या वीरमायणमध्ये मल्लिनाथ, वीरम वगैरेंच्या कामगिरीचे तपशीलवार वर्णन केले आहे. चारण काव्यामध्ये सुरवातीचे राठोड व जोहिया याचे वर्णन करणारे हे पहिले व सर्वात प्राचीन निवेदनात्मक काव्य होय अनेक ज्ञात व अज्ञात कवीनी रणमल्ल, जोधा आणि त्याच्याशी संबंधित घटनाचे वर्णन केले आहे प्राचीन चारण काव्याचा बराच मोठा भाग राठोडानी व्यापलेला आहे.

## प्रकरण दुसरे

# प्राचीन काल (१०५०–१४५०)

राजस्थानी साहित्याच्या इतिहासाचे पुढील कालखंडांत विभाजन करता येते :

१. प्राचीन काल १०५० ते १४५०

२. मध्य काल– १४५० ते १८५० आणि

३. अर्वाचीन काल– १८५० पासून पुढे याचे उपविभाग–
   (अ) १८५०/५७ ते १९४७/५० व
   (आ) त्यानंतरचा.

या साहित्याचे ढोबळ मानाने पुढीलप्रमाणे वर्गीकरण करता येईल :

१. जैन काव्य.

२. लौकिक प्रेम काव्य– (अ) ज्ञात कवी आणि
   (आ) अज्ञात कवी

३ चारण काव्य, उपविभाग असे—
   (अ) ऐतिहासिक व वीर काव्य– 'मरसिया', इशारे याच्यासह.
   (आ) पौराणिक व धार्मिक काव्य– 'नीती काव्या'सह.

४. आख्यान काव्य

५ दोन प्रकारच्या लेखकांनी रचलेले संत काव्य
   (अ) विभिन्न संप्रदायाचे संस्थापक व त्याचे अनुयायी.
   (आ) कोणत्याही धार्मिक वा सम्प्रदायाच्या पारंपरिक बंधनापासून मुक्त असलेले कवी

६. छंद:शास्त्र, अलंकारशास्त्र व शब्दकोश

७. गद्य साहित्य (मध्ययुगीन)

८. लोक साहित्य आणि

९. पद्य व गद्य (अर्वाचीन)
   काव्याचे उपविभाग :
   (अ) पारंपरिक आणि
   (आ) बदलत्या काळाचे व अवस्थेचे प्रतिबिंब असलेले

आशय आणि भाषिक वैशिष्ट्यामुळे वरील प्रत्येक प्रवाह स्वतःची स्वतंत्र शैली घेऊन पुढे गेला आहे. वाङ्मयीन प्रवाह हा अखंड वाहणारा असतो. आशय किंवा भाषेच्या दृष्टीने त्याचे काल विभाजन सयुक्तिक ठरत नाही. पण विशिष्ट कालखडातील वाङ्मयीन सकेताच्या मुख्य वैशिष्टयाचे अध्ययन सोयीचे व्हावे म्हणून असे वर्गीकरण केलेले आहे.

१०५० पासून पुढे सुमारे एक शतकभर मरु-गुर्जर भाषेत सकीर्ण काव्यरचना फक्त झाली. पण १२ व्या शतकाच्या उत्तरार्धानंतर आकाराने लहान का होईना पण पृथक् रचना विपुल प्रमाणावर आढळते. हे साहित्य बहुतांशी जैनानी रचलेले आहे. वज्रसेन सूरीने ११६८ च्या सुमारास रचलेली भरतेश्वर बाहुबली घोर ही मरु गुर्जर भाषेतील आजवर उपलब्ध असलेली सर्वांत पहिली रचना म्हणता येईल. त्यानतर शीलभद्र सूरीने ११८६मध्ये भरतेश्वर बाहुबली रास रचले. १२ व्या शतकाच्या अखेरपर्यंत मरु-गुर्जर काव्यावरील अपभ्रंशाचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो.

मरु म्हणजे राजस्थानीचे, गुर्जर म्हणजे गुजरातीपासून भाषाशास्त्रीय विभाजनाखेरीज साहित्यिक दृष्टीनेही प्राचीन व मध्यकालाचे विभाजन करणारी एक रेषा आखता येईल प्राचीन कालात लौकिक रचना आणि जैन व चारण शैलीच्या रचना आढळतात. पण मध्यकालात सुरवातीपासूनच आख्यान काव्य आणि सत काव्य या दोन नवीन प्रवाहाचा उद्गम व विकास होऊ लागला. कथा अहमनी हे पहिले आख्यान काव्य म्हणता येईल आणि जाभोजी (१४५१–१५३६) हा राजस्थानीतील सतकाव्याचा उगम बिंदू होय.

मध्यकालात चारण शैलीची रचना विपुल प्रमाणावर आढळते तेव्हापासून पुढे अशा शैलीच्या रचना लोकप्रिय होत गेल्या. वचनिका अचलदास खीची री ही या कालखडातील महत्त्वाची पहिली चारण रचना होय. त्यात आपल्याला ललित गद्याचा पहिला नमुनाही आढळतो. या काळात लोकांमध्ये करणीजी देवी व पच पीराची पूजा विशेष लोकप्रिय झाली त्यामुळे तत्कालीन समाज व साहित्याला, विशेषतः लोकसाहित्याला एक नवी दमदार प्रेरणा मिळाली. या सर्व कारणांमुळे हे विभाजन योग्य ठरते १४५० ते १६५०च्या दरम्यान निर्माण झालेल्या साहित्याने प्रत्येक क्षेत्रात वाङ्मयीन दर्जाचा नवा उच्चाक गाठला.

ब्रिटिश राजसत्ता व देशावरील तिच्या आघाताने अर्वाचीन कालखडास सुरवात होते या आघातामुळे तसेच पाश्चात्य शिक्षण, विज्ञान व तत्त्वज्ञान यांच्या प्रसाराने बाह्य जगाशी विस्तृत सपर्क आला. त्यामुळे पारंपरिक मूल्ये, दृष्टिकोन व उद्दिष्टांमध्ये खूप जलद परिवर्तन होऊ लागले. १८५०च्या आसपासच्या कालखडात निर्माण झालेल्या राजस्थानी काव्यात ही सर्व स्थित्यतरे तसेच ब्रिटिश

सत्तेविरूद्ध कटुता व वैराचे स्वर उमटलेले आढळतात. येथूनच अर्वाचीन कालास सुरवात होते.

## जैन काव्य

जैन साहित्याचा मुख्य स्वर आहे धार्मिकता. जैन धर्मात या कालखडात तट पडू लागल्याचे आपल्याला दिसते धर्मग्रंथाचा वेगवेगळा अर्थ लावल्याने विभिन्न संप्रदाय अस्तित्वात आले. इ. स. ७९ वा ८२ मध्ये श्वेताम्बर व दिगम्बर हे दोन सप्रदाय होऊन जैन धर्मात दुफळी झाली मूर्तिपूजा करावी की करू नये या वादावरून त्यांचे आणखी उप-सप्रदाय निर्माण झाले कालांतराने मूर्तिपूजा करणाऱ्या या सप्रदायाचेही आणखी लहान लहान उप-सप्रदायामध्ये विभाजन झाले.

या दोन्ही सप्रदायाच्या साधूना 'निग्रंथ' म्हणत त्यानी सतत प्रवास करीत रहावे आणि कोठेही कायमचे वा तात्पुरते घर, अनुयायी वा मालमत्ता बाळगू नये असा दंडक होता 'निग्रंथ' म्हणजे लौकिक गोष्टीविषयी स्वामित्व वा प्रेम भावना नसणे वैराग्य, इंद्रियनिग्रह, आत्मसयमन आणि पावित्र्य ही जैन साधूची वैशिष्ट्ये होती, पण ३५५मध्ये वा त्याच्याही पूर्वी 'चैत्यवासी'च्या पद्धतीला सुरवात झाली. चित्तोडच्या हरिभद्र सूरी (७०० ते ७७०) या विद्वान आचार्यांनी 'चैत्यवासी'च्या पद्धतीमधील अनेक भ्रष्ट चाली व शिथिलता शोधली होती आणि त्या दुर्गुणाविरुद्ध आपला जोरदार आवाज उठवला होता. जैन जगताचे लक्ष वेधून घेण्यात व त्याच्या विचारसरणीवर परिणाम करण्यात ते यशस्वी झाले होते. कुवलयमाला (७७८) चे लेखक उद्योतन सूरी हे त्याचे शिष्य होते. त्यांनी व सिद्धार्थ सूरीने त्याचा सदेश लोकांपर्यंत पोचविण्याचे कार्य आपापल्या परीने केले असे म्हणतात की उद्योतन सूरीने आपल्या सर्व ८४ शिष्याना एकाच वेळी 'आचार्य'ची उपाधी प्रदान केली होती या आचार्यांमधून ८४ 'गच्छ' स्थापन झाले. पण ही सख्या फक्त रूढार्थाने साकेतिक असावी असे वाटते. 'गच्छ' हे एकाच वेळी एकत्रित स्वरूपात तयार झाले नव्हते, तर वेगवेगळ्या काळी तयार झाले होते. त्याच्या वाईट चालीरीतीवर विध्वंसक आघात करण्याचे कार्य जिनेश्वर सूरीवर आले. ९५७ मध्ये दुर्लभराजाच्या दरबारात एका धार्मिक वादविवादात त्यानी चैत्यवासीना पराभूत केले आणि अशा प्रकारे 'विधिमार्ग' वा ज्याला 'सविग्न' म्हणतात त्यास मान्यता प्राप्त झाली. जिनेश्वर सूरीच्या काळात त्याच्या अनुयायाना 'खरतर'ची पदवी मिळाली तेव्हापासून राजस्थानच्या पश्चिम व उत्तर विभागात 'खरतर गच्छ' अतिशय लोकप्रिय झाले आचार्य व या 'गच्छ'च्या अनुयायानी राजस्थानी साहित्यात बहुमोल कामगिरी बजावली आहे. अर्वाचीन काळात श्वेताम्बर संप्रदायाचे यती वा श्रीपूज्य आणि दिगबर संप्रदायाचे भट्टारक याना मठवासी म्हणतात आणि त्या सर्वांना मिळून 'चैत्यवासी' म्हणतात.

लोका शाहने १४५१ मध्ये लोका नावाचा एक नवीन संप्रदाय सुरू केला. तो अहमदाबादमध्ये ग्रंथ नकलून उपजीविका करीत असे. तो श्वेतांबर संप्रदायाचा होता व मूर्तिपूजेविरुद्ध होता लोंका शाहच्या परंपरेतील लवजी मुनीने १६५२ मध्ये ढूंढिया संप्रदाय स्थापन केला. यालाच हल्ली स्थानकवासी संप्रदाय म्हणतात कालांतराने धर्मदासजी हे या संप्रदायाचे आचार्य झाले. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे शिष्य बावीस शाखांमध्ये विभागले गेले आणि म्हणूनच त्यांच्या परंपरेला 'बाईस टोळा' म्हणतात. हे नाव इतके सर्वतोमुखी झाले की ढूंढिया संप्रदाय देखील याच नावाने ओळखला जाऊ लागला असे असले तरी स्थानकवासी हे नाव अधिक प्रचलित आहे.

तेरापंथीचे मूळ स्थानकवासी संप्रदायात आहे. आचार्य धर्मदासजींच्या शिष्यांमध्ये धन्नाजी नावाचे एक शिष्य होते त्यांच्या परंपरेत रघुनाथजी आचार्य झाले. तेरापंथ संप्रदायाचे संस्थापक आचार्य भीखणजी यांनी रघुनाथजींकडून दीक्षा घेतली हा संप्रदाय आणि दिगंबरांचा तेरापंथ संप्रदाय यात फरक आहे. आगमांच्या तुलनेत स्थानकवासींच्या आचार व विचारात बरेच अंतर असल्याचे भीखणजींच्या लक्षात आले. हे अंतर कमी करण्यासाठी त्यांनी १७६० मध्ये तेरापंथ स्थापन केला. जैन तत्त्वज्ञान व राजस्थानी साहित्यात त्यांनी बहुमोल भर घातली आहे. या संप्रदायाच्या अन्य आचार्यांनी देखील साहित्यात खूप भर घातली आहे.

श्वेतांबरांपैकी विभिन्न 'गच्छ', तेरापंथ संप्रदाय व जतींच्या लेखकांचे साहित्य बहुतांशी राजस्थानीत आहे ते अधिक लोकप्रिय होते आणि राजस्थानच्या पश्चिम, दक्षिण व उत्तर विभागांवर व गुजरातवर त्यांचे प्रभुत्व होते. दिगंबरांचे राजस्थानच्या उत्तर, दक्षिण व नैऋत्य भागात वर्चस्व होते.

राजस्थान व गुजरातचे जैन साधू प्रत्यही एकमेकांच्या प्रदेशांना भेटी देत असत, त्यामुळे दोन्ही प्रदेशांत सांस्कृतिक, भाषिक व वैचारिक एकरूपता निर्माण झाली. ती प्रदीर्घ काळ टिकून राहिली

या एकरूपतेमुळे १५ व्या शतकाच्या उत्तरार्धात व त्यानंतर कित्येक जैन साधूंनी लिहिलेल्या साहित्यावर गुजराती व राजस्थानी या दोन्ही भाषांचे विद्वान आपला हक्क सांगतात.

जैन समाजात अस्तित्वात असलेल्या संघ व गण यांच्यावरून दिसून येते की, प्राचीन काळी हा समाज सांस्कृतिक दृष्ट्या सुसंघटित होता. दिगंबर संप्रदायातील काही संघ राजस्थानात ठराविक काळापुरतेच लोकप्रिय राहिले. ते होते—माथुर, कास्थ आणि मूल संघ. १३ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून पुढे राजस्थानातील काही विशिष्ट विभागात काही जैन मुनींनी धर्मप्रमुखाचे स्थान मिळवले आणि

धार्मिक बाबीमध्ये सर्वोच्च अधिकार गाजवले त्याना 'भट्टारक' म्हणत असत. मूल सघ व बलात्कार व गणाचे भट्टारक प्रभाचद्र (१२५७–१३५१) यांची मुख्य 'गादी' अजमेरला होती त्याचे शिष्य भट्टारक पद्मनंदी (१३२८–१३९३) हे राजस्थान व गुजरातेत अतिशय लोकप्रिय होते पद्मनदी व अन्य भट्टारक यांच्या मत परंपरेचे १८ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत प्रभुत्व व दरारा राहिला. कालांतराने अभद्रपणा, शिथिल व कर्मकाडयुक्त आचार आणि धार्मिक कृत्याची मोडतोड यांच्यामुळे भट्टारकवादाला तीव्र विरोध झाला त्याची सुरवात केली आग्र्याला बनारसीदासने (१५८६–१६४३) पुढे त्याच्या प्रभावाने जयपुरजवळील सागानेर येथील अमरचंद गोदिका आणि जोधराज गोदिका यानी भट्टारक नरेन्द्र कीर्ती (१६४६) यांच्या काळात ते कार्य केले हे विरोधक मूर्तिपूजक दिगबर सप्रदायातील तेरापथ नावाने ओळखल्या जाणाऱ्या विभिन्न मतप्रणालीचे होते. १८ व्या शतकातील विख्यात विद्वान टोडरमल्ल (१७१९–२० ते १७६७) हा या मतप्रणालीचा सर्वांत मोठा समर्थक होता त्याचा 'मोक्ष-मार्ग प्रकाशक', हा अध्यात्मशास्त्रावरील उत्कृष्ट ग्रंथ तर आहेच शिवाय ढूढाडी गद्याचाही तो उल्लेखनीय नमुना आहे टोडरमल्लचा मुलगा गुमानी राम याने त्याच शतकात 'गुमान पथ' स्थापन केला भट्टारकाच्या समर्थकानी एकत्र जमून आपला बीसपंथी हा पथ स्थापन केला. आपण तेरापंथी लोकापेक्षा उच्च आहोत हे प्रतिपादन करण्याचा त्यांचा हेतू होता. पुढे गुमान पथ व बीसपथी याच्यात समझोता घडवून आणण्याचा प्रयत्न झाला. परिणामी तोतापंथी वा साढी सोलाह पथीचा उदय झाला या ठिकाणी नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे दिगबरापैकी या सर्व मूर्तिपूजक पथामध्ये मूलतः फारसा फरक नाही दिगबरामध्ये मूर्तिपूजा न करणारा तारणपंथी नावाचा पंथ तारण स्वामी (१४४८–१५१५) यांनी स्थापन केला होता. त्यांचे साहित्य राजस्थानी भाषेत नाही

दिगबर जैन लेखकाचे साहित्य मुख्यतः हिंदीमध्ये आहे पण कित्येक भट्टारक आणि अन्य काही लेखकानी राजस्थानी व राजस्थानी मिश्रित हिंदीमध्येही साहित्य निर्मिती केली आहे.

जैन आगमांमध्ये चार 'अनुयोग' सांगितलेले आहेत : (१) प्रथमानुयोग, (२) करणानुयोग, (३) चरणानुयोग आणि (४) द्रव्यानुयोग

प्रथमानुयोगात, सद्गुणी व धार्मिक वृत्तीच्या स्त्री-पुरुषांच्या आयुष्यातील घटना, त्याची वर्तणूक आणि स्थित्यतरात व विपरीत परिस्थितीतही धार्मिक नियमाप्रती त्याचे स्थिरचित्त यांचे वर्णन केलेले आढळते. यालाच धर्मकथानुयोग असेही म्हणतात. करणानुयोगात ज्योतिष व गणित शास्त्राचा समावेश आहे. धार्मिक नियम संहिता व आचार यांच्या मूलभूत तत्त्वांची चर्चा चरणानुयोगात केलेली आढळते. द्रव्यानुयोगात अध्यात्मशास्त्राच्या तत्त्वांचे निरूपण आढळते.

या चारापैकी पहिल्या, धर्मकथानुयोगाच्या अतर्गत धार्मिक व्यक्तींच्या आयुष्यातील प्रसंगांचे व त्याच्या चारित्र्याचे जे वर्णन येते त्याने जैन साहित्याचा बराच मोठा विभाग व्यापलेला आहे अशिक्षित वा कमी शिकलेल्या लोकाना मूलभूत विचार कथारूपात समजावून सागणे सोपे होते या धार्मिक व्यक्ती म्हणजे ६३ 'शलाका पुरुष' आणि अन्य स्त्री व पुरुष होत. 'शलाका पुरुष' म्हणजे अद्वितीय गुण व सामर्थ्य असलेल्या व्यक्ती. या 'शलाका पुरुषाच्या' जीवनाचा इतिहास, त्याचे वागणे व चारित्र्य याचे वर्णन जैन पुराणामध्ये आढळते. ते आहेत २४ तीर्थकर, १२ चक्रवर्ती, ९ बलदेव, ९ वासुदेव आणि ९ प्रतिवासुदेव. यांखेरीज अन्य आध्यात्मिक, धार्मिक व सद्गुणसंपन्न व्यक्ती, जसे, स्थूलिभद्र, जबूस्वामी, सुदर्शन, गज सुकुमाल, श्रेणिक, श्रीपाल, धन्ना, आषाढभूती, वल्कलचीरी, इत्यादी आणि जैन जगतात विख्यात १६ सतीच्या जीवन कार्याचे वर्णन केलेले आढळते. या लोकाशी संबधित कथाचे वर्णन जैन कवीनी सोप्या भाषेत, लालित्यपूर्ण शैलीने केले आहे जैन कवी त्यांच्या पौराणिक आधारापासून दूर जात नाहीत की त्याच्याशी मतभेद करीत नाहीत वर्णनात बहुधा नैतिक व धार्मिक भावनाचा उद्रेक आढळतो कवीनी साधी व बोलचालीची प्रचलित भाषा वापरल्याचे दिसते, पण तिचा वापर मात्र पारपरिक शैलीच्या चौकटीतच केला.

जैन साहित्य गद्य व पद्य दोन्हीत आहे गद्याचे २ प्रकार आहेत—(१) मूळ स्वतत्र, रचना आणि (२) भाष्य, टीका, व्याख्या, इत्यादी पद्याचे स्थूल मानाने चार उप विभाग करता येतात.

(१) **चरित काव्य वा कथा काव्य**—या प्रकारच्या काव्यात वर उल्लेखिलेल्या असामान्य व्यक्तींचे जीवन व चरित्राचे वर्णन केलेले असते. यांची अनेक नावे आहेत. जसे, रास, चौपई, ढाळ, पवाडो, संधि, चरचरी, प्रबध, चरित, आख्यानक, कथा इ.

(२) **उत्सव काव्य**– विशिष्ट प्रसग वा उत्सवाशी याचा सबध असतो आणि फागु, धमाल, बारहमासा, विवाहलो, धवल, मगल, इत्यादी नावानी ही ओळखली जातात

(३) **नीती काव्य**– नैतिक मूल्याशी व आचरणाशी यांचा संबंध असून याना संवाद, कक्का, मातृका, बावनी, छत्तीसी, कुलक, हीयाली, इत्यादी नावे आहेत.

(४) **स्तुति काव्य**– तीर्थकर, आध्यात्मिक व्यक्ती आणि तीर्थस्थानाची प्रशस्ती करण्यासाठी ही काव्ये रचलेली असून त्यांना स्तुति, स्तवन, सज्जहाय, वीनती, नमस्कार, बीसी, चौबीसी, इत्यादी नावे आहेत.

जैन कवीचा मुख्य हेतू धार्मिक व आध्यात्मिक होता लोकाचे नैतिक पुनरुज्जीवन करण्याचे त्याचे उद्दिष्ट होते. त्याच्या निवेदनाची सागता 'निर्वेद' वा

भौतिक वस्तूप्रति निरासक्तीच्या उपदेशाने होत असे म्हणूनच 'शांतरस' हा त्यांच्या रचनाचा मुख्य रस होता अधून मधून 'शृंगार' व 'करुण' रसाची छटा आढळत असली तरी त्यावर भर नव्हता व त्या रसाचा संपूर्ण रसपरिपाक केलेला दिसत नाही. अर्थातच या वृत्तीला अपवादही आहेत, पण ते फारच थोडे आहेत.

राजस्थानी भाषेच्या उत्पत्ती व विकासाच्या अध्ययनासाठी जैन साहित्य अत्यंत महत्त्वाचे आहे कारण प्राचीन कालापासून ते चालू शतकापर्यंत ते बव्हंशी अबाधित रुपात उपलब्ध आहे ११ व्या ते १४ व्या शतकातील वाङ्मयीन कृतीसाठी आपल्याला याच साहित्यावर विशेष भिस्त ठेवावी लागते कारण अन्य कुठलेही अस्सल साहित्य उपलब्ध नाही असे असले तरी, भाषेचा अभ्यास करताना फार काळजी घ्यावयास हवी त्यास कारण म्हणजे जैन कवींनी पारंपरिक शैली घेतलेली असली तरी तसे करताना शब्दाच्या रूपात किंचित फरक पडलेला आहे.

काही जैन कवींनी ऐतिहासिक, अर्ध-ऐतिहासिक, धर्मनिरपेक्ष यासारख्या अन्य विषयावरही समर्थ काव्यरचना केली आहे

अपभ्रंश जैन साहित्याची जवळजवळ सगळी वैशिष्टये राजस्थानी जैन साहित्यानेही उचललेली आहेत

वज्रसेन सूरी विरचित 'भरतेश्वर बाहुबली घोर' ही ११६८ च्या सुमारास लिहिलेली मरु-गुर्जर भाषेतील सर्वांत प्राचीन जैन कलाकृती होय ते ४८ पदाचे एक लहानसे काव्य असून त्यात भरत व बाहुबली याच्यातील संघर्षाचे वर्णन आहे. मंदिरात गाण्यासाठी ते रचले असावे असे वाटते त्यात पदद्यामध्ये पुढील कथा सांगितलेली आहे प्रथम तीर्थंकर ऋषभदेव यास भरत व बाहुबलीसह १०० पुत्र होते. आयुष्याच्या अखेरीस ऋषभदेवानी आपले राज्य आपल्या मुलांना वाटून दिले व स्वत संन्यासी झाले सर्वांत थोरला पुत्र भरत याचे आपल्या वाटणीवर समाधान झाले नाही त्याने चक्रवर्ती होण्याचा प्रयत्न केला आणि आपल्या सर्व ९८ भावाचा हिस्सा बळकावला बाहुबलीने मात्र त्यास उघडपणे प्रतिकार केला. भरताने बाहुबलीवर आक्रमण केले, पण त्याला बाहुबलीवर विजय मिळवता आला नाही बाहुबलीला मारण्यासाठी त्याने चक्र वापरले, पण दोघेही एकाच जातीचे असल्याने त्याचा परिणाम झाला नाही अखेर समोरासमोर दोघाची हातानी मारामारी झाली त्यात बाहुबलीला भरताकडून खूप मार खावा लागला पण त्याने मात्र थोरल्या भावावर हात उगारला नाही. परित्यागाच्या भावनेतून तो मुनी झाला आणि त्याने साधना करावयास सुरवात केली. त्याने आपल्या सर्व चित्तवृत्तीवर ताबा मिळवला पण 'अहंकारा'वर मात्र त्याला ताबा मिळवता आला नाही. तो त्याला ऋषभदेवाच्या उपदेशाने मिळवता आला त्याने कैवल्यपद मिळवले. भरतालाही साम्राज्य मिळाल्यावर आत्मबोध झाला

याच विषयावरील अधिक परिणामकारक व हृदयग्राही काव्य म्हणजे ११८४ मध्ये शालिभद्र सूरीने रचलेले 'भरतेश्वर बाहुबली रास' होय. यात २०३ पदे आहेत. जैन साहित्यात त्यास महत्त्वाचे स्थान आहेच, पण मार्मिक शब्दयोजना, ओघवती भाषा आणि काव्यमय लालित्य या दृष्टीने प्राचीन कालच्या वीर गाथा-मध्येही ते उल्लेखनीय आहे त्यात युद्ध व राजनीतीची यथार्थ, वास्तविक वर्णने आहेत, तसेच बाहुबलीच्या मन व चित्ताचे मनोविश्लेषणही आहे अभिव्यक्तीची कल्पकताही प्रशंसनीय आहे. भरताच्या 'चक्रवर्तीपणा'चा त्याच्या दूतासमोर उपहास करीत बाहुबली म्हणतो,

"भरतेश्वराचे सोडाच पण देव आणि दैत्य देखील संग्रामात माझा सामना करू शकत नाहीत तो जर 'चक्रवर्ती' व्हायचा विचार करीत असेल तर माझ्या राज्यातील चाक फिरवणारे कुभारदेखील ते पद मिळवू शकतील

शालिभद्र सूरीची दुसरी रचना आहे बुद्धिरास (६३ पदे). त्यात त्याने सामान्य माणसांच्या उपयोगासाठी सुभाषिते व नैतिक उपदेशाचा संग्रह केलेला आहे नतरच्या अनेक रचनामध्ये, जसे सार सिरतामण रास, हितशिक्षा रास इ. मध्ये रासची हीच शैली वापरलेली दिसते. एका पदामध्ये शिकवण आहे. ' रिकाम्या घरात व खोल पाण्यात शिरू नका. आडवाटेवर बायकाशी भांडू नका आणि मानकऱ्यासमोर स्पष्टवक्तेपणा करू नका.'

आसिग (आसिग्र)ने १२०० मध्ये जीवदया रास (५३ पदे) रचले आणि त्याच समारास चदनबाला रास (३५ पदे) व कृपण-गृहिणी सवाद (९ पदे) रचले यापैकी पहिल्या काव्यात 'धर्म' पालनाची आवश्यकता, प्राण्यावरील दयेचे महत्त्व व त्याचे परिणाम याचे प्रतिपादन केलेले आहे दुसऱ्यात, भगवान महा-वीराला अन्नाची भिक्षा घालण्याच्या प्रसंगाचे वर्णन आहे तिसऱ्यामध्ये, पैशाच्या योग्य उपयोगाबाबत पति-पत्नीचा सवाद आहे.

१३ व्या शतकापासून पुढे विभिन्न प्रकारच्या असख्य रचना आढळतात. त्यांपैकी काही निवडक रचनाचाच फक्त आपण येथे परामर्श घेऊ या

जबूस्वामी चरित्र (४१ पदे) हे महेन्द्र सूरीचा शिष्य धर्म याने १२०९ मध्ये रचले जबूस्वामीच्या मर्मस्पर्शी कथेवर ते आधारित आहे. जबूस्वामीवर अनेक काव्ये लिहिलेली आहेत. मगधाची त्यावेळची राजधानी राजगड येथील ऋषभदत्त नावाच्या एका श्रीमत माणसाचा तो मुलगा होता लग्नाच्या पहिल्या रात्री त्याने आपल्या आठ बायकाना धर्मोपदेश केला. तो उपदेश त्यावेळी तेथे चोरी करण्या-साठी आलेल्या प्रभव नावाच्या चोराने ऐकला. प्रभव आपल्या ५०० अनुयाया-बरोबर आलेला होता. त्या सर्वांनी तो उपदेश ऐकला. जबूस्वामीचा धर्मोपदेश

आणि चोरांचा सर्वसग परित्याग करावयाचा निश्चय ऐकून दुसऱ्या दिवशी सकाळी जबूस्वामीच्या आईवडिलानी व १६ सासूसासऱ्यांनीही दीक्षा घ्यावयाचे ठरवले अशा प्रकारे, जंबूस्वामीने ५२७ लोकासह भगवान महावीरांचा शिष्य सुधर्म याच्याकडून संन्यासाची दीक्षा घेतली ही कथा चरित्रमध्ये सक्षिप्त रूपात सागितलेली आहे

पाल्हणच्या १२३३ मध्ये लिहिलेल्या नेमि बारहमासा (१६ पदे) आणि आबू रास (५१ पदे) या दोन रचना उपलब्ध आहेत नेमिनाथ व राजिमती (राजुल) याची कथा जैन कवीमध्ये फार लोकप्रिय आहे २२ वे तीर्थंकर नेमिनाथ हे महाराज समुद्रविजयचे चिरंजीव व श्रीकृष्णाचे चुलत बंधू होते उग्रसेनाची कन्या राजिमती हिच्याशी त्याचा विवाह ठरला होता लग्नाची वरात उग्रसेनाच्या महालाशी पोहोचली त्यावेळी वऱ्हाडी मडळीच्या मेजवानीसाठी मारण्याकरिता धरून ठेवलेल्या प्राण्याचा व पक्ष्याचा आर्त स्वर नेमिनाथाच्या कानी पडला. त्या निष्पाप मूक प्राण्यावर होणाऱ्या भयकर क्रौर्याच्या विचाराने नेमिनाथाचे मन कारुण्याने भरून गेले सर्वसग परित्याग करून ते अनत मोक्षाच्या शोधात गिरनारला निघून गेले ही बातमी ऐकून राजिमती स्तब्ध झाली, पण तिनेही नेमिनाथ-च्याच मार्गाने जाण्याचे ठरवले आणि त्याच्याकडून आत्मबोधाची दीक्षा घेतली. राजिमतीच्या कोमल भावनाच्या चित्रणामुळे या विषयावरील काव्ये कित्येक ठिकाणी हृदयाचा ठाव घेतात 'मरु-गुर्जर' भाषेतील हे पहिलेच 'बारहमासा' काव्य होय राजिमती कधीही नेमिनाथना भेटली नाही श्रावण महिन्यापासून पुढे वर्षभर प्रत्येक महिन्यातील तिच्या विरहदु:खाचे या काव्यात वर्णन केलेले आहे. अन्य 'बारहमासा'च्या विपरीत या काव्याच्या अखेरीस नायिका संन्यासधर्माची दीक्षा घेते

आबू रासमध्ये विमल व वस्तुपाल तेजपाल या मत्र्यांनी आबू पवनावर मदिरे बांधली त्याचे वर्णन आहे

लक्ष्मीतिलक गणीच्या शातिनाथदेव रास (सुमारे १२५६) मध्ये सोळावे तीर्थंकर शातिनाथ याचे जीवन थोडक्यात वर्णिलेले आहे. तसेच १२०१ मध्ये खेड व १२५६ मध्ये जालोर येथील मदिरामध्ये भगवानाच्या मूर्तींची अनुक्रमे जिनपति सूरी व जिनेश्वर सूरी यांनी केलेल्या प्रतिष्ठापनेचेही वर्णन त्यात आढळते अशा प्रकारे त्यात काही ऐतिहासिक घटनाची नोंद झालेली आहे.

सोम मूर्ती याच्या चार रचना (सुमारे १२७४) उल्लेखनीय आहेत विशेषत: काव्य प्रकाराच्या दृष्टीने त्या महत्त्वपूर्ण आहेत त्या पुढीलप्रमाणे—(१) जिनेश्वर सूरी विवाह वर्णणा रास, (२) जिन प्रबोध सूरी चरचरी (३) गुरावली रेलुआ आणि (४) जिन प्रबोध सूरी बोलिका. यापैकी पहिले रूपक असून त्यात जिनेश्वर

सूरी व सयम श्री याच्या विवाहाचे, तरोच जिनेश्वर सूरीनी दीक्षा घेतली व खेड येथे शिष्यत्व पत्करले त्या घटनेचे वर्णन आहे

उवएशमाल कहाणय छप्पय ही रत्नसेन सूरींचे शिष्य उदयधर्म यानी लिहि-लेली बोधपर रचना ८१ छप्पय छदात आहे

रल्ह वा राजसिंह याचे 'जिनदत्त चरित' १२९७मध्ये रचलेले असून त्यात ५५३ पदे आहेत. जैन लोकामध्ये अतिशय लोकप्रिय असलेल्या जिनदत्त सेठचे चरित्र त्यात वर्णिलेले आहे भाषा राजस्थानी असून त्यात हिंदीचे समिश्रण आहे व अप-भ्रशाचीही किंचितशी छटा आहे. ते एक निवेदनात्मक व रोमाचकारी जैन काव्य आहे. या पद्धतीचे दुसरे सुप्रसिद्ध काव्य म्हणजे सधारु याने १३५४ मध्ये लिहिलेले प्रद्युम्न चरित होय. त्यात ७०१ पदे असून प्रद्युम्नाचे चरित्र सांगितलेले आहे. राजस्थानी व अपभ्रशाचे काहीसे मिश्रण असलेल्या हिंदी भाषेत ते लिहिलेले आहे.

अबदेव सूरीचे समरा रास देखील महत्त्वपूर्ण काव्य आहे त्यात १०५ पदे असून ११ 'भास' मध्ये ते विभागलेले आहे संघपति देशल व त्याच्या अनुयायानी समरसिंहाच्या नेतृत्वाखाली शत्रुजयची यात्रा केली त्याचे सजीव वर्णन यात केलेले आहे. काव्यात लोकप्रिय छदाचा वापर केलेला आहे. या प्रवासाशी संबधित अशी बरीच ऐतिहासिक व भौगोलिक माहिती यातून मिळते.

जिन पद्मसूरीने १३३३मध्ये लिहिलेले थूलिभद्द फाग हे स्थूलिभद्राच्या जीवनातील एका आणीबाणीच्या प्रसगावर आधारलेले आहे.

९ वा मगध राजा नद याचा ब्राह्मण मत्री शकटार (किंवा शकडाल) याचा स्थूलिभद्र हा मुलगा कोश्या नावाच्या एका सुदर गणिकेच्या प्रेमात तो पडला आणि १२ वर्षे त्याने तिच्या सहवासात मजेत घालवली दरम्यान दरबारी कारस्थानापायी त्याचे निष्पाप वडील मरण पावले आणि मृत्युसमयीदेखील मुलाची काही वडिलाशी भेट होऊ शकली नाही. जीवनाच्या व ऐहिक वैभवाच्या क्षणभगुरतेवर त्याने चिंतन केले व सर्वसग परित्याग करायचा निश्चय केला आचार्य सभूतिविजय याच्याकडून त्याने दीक्षा घेतली आत्मसयमनाची परीक्षा पाहण्यासाठी त्याने कोश्याच्या घरी चातुर्मास घालवला. त्यावेळी त्याला मोहात पाडण्याचे हर तऱ्हेचे प्रयत्न तिने करून पाहिले. पण त्यात तिला यश आले नाही. त्याने आपल्या सर्व मनोविकारावर ताबा मिळवला होता तिनेही मग त्याचा मार्ग अनुसरला.

उपलब्ध 'फागु' काव्यांपैकी हे सर्वात पहिले काव्य होय फाल्गुन महिन्याशी सबधित चित्रमय वर्णनामुळे यास 'फागु' म्हणतात अशा प्रकारच्या काव्यात सामान्यत: वसत ऋतूचे वर्णन असते, पण त्या ऐवजी यात वर्षाऋतूचे वर्णन आढळते. हे २७ पदाचे सात 'भासा'मध्ये विभागलेले लहानसे गेय काव्य आहे

भाषा अनुप्रासयुक्त आहे. वर्षाऋतूच्या पार्श्वभूमीवर कोश्याच्या शृंगारिक विलासी विषयक्रीडाचे वर्णन अतिशय सहजसुंदर नैसर्गिक व लालित्यपूर्ण आहे अन्य काव्याप्रमाणेच, या काव्याच्या अखेरीसही नायक सर्वसंग परित्याग करतो

शालिभद्र सूरी ('पूर्णिमा गच्छ' कार) याचे पांच पाडव चरित रासु हे १३५३मध्ये रचलेले आहे ७९५ ओळी व १५ 'ठवणी' असलेले ते वृत्तान्त वर्णनात्मक दीर्घ काव्य आहे महाभारतावर आधारलेली पाडवाची कथा यात निवेदन केलेली आहे, पण ती जैन परपरेला धरून सांगितलेली आहे. काव्याच्या अखेरीस नेम मुनीच्या उपदेशाच्या प्रभावाने पाडव जैन धर्म स्वीकारतात

१३५५ मध्ये उपाध्याय विनय प्रभ रचित गौतम स्वामी रास हे एक सुदर लालित्यपूर्ण काव्य असून इतके लोकप्रिय आहे की जैन श्रावक रोज त्याचे पठण करीत असतात ते मधुर, आलकारिक असून गेय आहे

१४२१पूर्वी लिहिलेले शालि सूरीचे विराट पर्व हे आणखी एक दीर्घ पौराणिक वर्णनात्मक काव्य आहे. त्यात १८३ पदे आहेत. महाभारताच्या विराट पर्वाची कथा यात कवीने आपल्या पद्धतीने निवेदन केली आहे. सपूर्ण काव्यात संस्कृतच्या गणवृत्तांचा वापर केलेला आहे मरु-गुर्जरच्या पद्य रचनामध्ये हे क्वचितच आढळते

राजशेखर सूरी हा त्याच्या विद्वत्तेसाठी प्रसिद्ध होता १३४८ मध्ये त्याने प्रबध कोश हा संस्कृत ग्रथ लिहिला. मध्ययुगीन हिंदू इतिहासाची माहिती मिळविण्यासाठी हा ग्रथ महत्त्वाचा समजला जातो. 'नेमिनाथ फागु' आणि 'त्रिभुवन दीपक प्रबध' ही त्याची दोन विख्यात काव्ये होत. मरु-गुर्जर भाषेत लिहिलेले नेमिनाथ फागु हे २७ पदाचे काव्य असून मागे उल्लेखिलेल्या नेमिनाथाच्या कथेवर लिहिलेले आहे वसतऋतू, राजमतीचे सौदर्य व शृगार, तसेच तिच्या व्यथा या सर्वांचे वर्णन हृदयाला भिडणारे आहे. जिन पद्मसूरीच्या धूलिभद्र फाग वा तत्सम कुठल्या तरी रचनेचा त्यावर परिणाम झालेला दिसतो प्रबंध हे प्रासादिक शैलीतील वर्णनात्मक दीर्घ काव्य, रूपक असून मरु-गुर्जर भाषेतील त्या प्रकारचे पहिले काव्य होय. या काव्यात विभिन्न वृत्तींना विभिन्न मानवी पात्राचे रुपे देऊन अखेरीस सद्‌गुणांचा दुर्गुणावर विजय झाल्याचे दाखविले आहे. मायाने आत्म्याला कैद करून कायानगरीत कैद केले त्याचा म त्री मन सर्वाधिकारी झाला. त्याने प्रवृत्ति व निवृत्ति या दोन स्त्रियांशी लग्न केले. त्याच्यापासून त्याला अनुक्रमे मोह व विवेक ही दोन मुले झाली मोहाने नगरीचा ताबा घेतला पण त्याचा सावत्र भाऊ विवेक याने आपल्या सयमश्री व सुमति या दोन बायकांच्या मदतीने त्याचा पराभव केला आणि आत्म्याला पुन्हा गादीवर बसवले. काव्यात अधून मधन गद्याचीही पेरणी केल्याचे दिसते.

हीरानंद सूरी, महोपाध्याय जयसागर आणि देपाल हे प्राचीन काळचे आणखी काही विख्यात कवी होत

या साहित्यात आपल्याला जैन अध्यात्म, तत्त्वज्ञान, धर्म, विचारसरणी व उपदेश याचे उल्लेखनीय समिश्रण आढळते काव्याच्या दृष्टिकोनातून या साहित्याचे मूल्यांकन करताना या कवीचे जीवनविषयक अंतिम उद्दिष्ट व दृष्टिकोन आपण लक्षात ठेवावयास हवे. त्यानी आपल्या परीने मनुष्य व समाजाची नैतिक पातळी उंचावण्याचा प्रयत्न केला जैन साहित्यात धार्मिक वातावरण प्रामुख्याने आढळते. पद्यमय लोककथा व इतर कथा, निसर्ग, सौंदर्य, शृंगार यांची आकर्षक वर्णने आणि काही विशिष्ट प्रसग अधून मधून दिसून येतात. नेमिनाथ–राजिमती, स्थूलभिद्र–कोशया, जबूस्वामी इ व्यक्तीवर रचलेली काव्ये त्यातील नाजुक मानवी भावनांमुळे अन्य काव्याच्या तुलनेने अधिक चित्ताकर्षक झाली आहेत. एखाद्या विशिष्ट विषयावरील सुरवातीच्या काव्यांची नक्कल नंतरच्या बहुतेक काव्यांमध्ये आढळते. अशा काव्यात तोच तोचपणा असल्याने ते आधुनिक वाचकाचे लक्ष वेधून घेऊ शकत नाही, पण इतर काव्ये मात्र रचनाकाली जितकी आकर्षक होती तितकीच पुढेही राहिली कवीनी त्यात काव्याच्या अनेक प्रकारांचा व अलकाराचा वापर केला.

जैन साहित्य व सस्कृतीशी संबधित गोष्टीचे फक्त संरक्षण करून नव्हे, तर सपूर्ण देशाच्या संस्कृती व साहित्याशी सबधित वस्तूचे सरक्षण करून जैनांनी विद्वज्जगताची फार मोठी सेवा केली आहे. असख्य लोककथा पद्यात सोप्या भाषेत सांगून त्यानी ती परपरा अक्षुण्ण ठेवली. लौकिक प्रेम व चारण शैलीची सर्वात प्राचीन पदे आपल्याला त्याच्या 'प्रबध' ग्रंथात आढळतात.

## लौकिक प्रेम काव्य

आचार्य हेमचद्राच्या व्याकरणातून तसेच प्रभाचंद्र सूरी याचे प्रभावक चरित (१२७७), मेरुतुग याचे प्रवंध चिंतामणी (१३०४), राजशेखर सूरी याचे प्रबध-कोश (१३४८), कुमारपाल प्रतिबोध उपदेश सप्तती या प्रबध ग्रंथातून आणि शुभ शील (१४४२) याच्या विक्रम चरित यासारख्या बाडामधून सोप्या अपभ्रंश भाषे-तील व अपभ्रंश मिश्रित देशी भाषा व मरु-गुर्जर भाषेतील स्फुट पदे आढळतात. अशा रचनांचा सग्रह १२ व्या शतकापासून ते १६ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत प्रामुख्याने झाला त्याचे विषय विभिन्न आहेत प्रेम व वियोग भावना, खेद, शौर्य, शृंगार भावना, शूर स्त्रियांचा अभिमान व वैभव, विचारसरणी, ऐतिहासिक तथ्ये व व्यक्ती, लोकप्रिय म्हणी, सुभाषिते आणि वस्तुनिष्ठ वर्णने त्यात विपुल प्रमाणात आढळतात. ती रूपकात्मक व धार्मिकही आहेत. काही पदे त्याच्या लोकप्रियतेमुळे

वर उल्लेखिलेल्या ग्रंथांपैकी एकाहून अधिक प्रयात दिलेली आहेत. त्यांपैकी काहींचा नतर राजस्थानी रूपात विकास होऊन आजही ती सामान्य लोकात लोकप्रिय आहेत. कित्येकाची मध्यवर्ती कल्पना नतरच्या राजस्थानी कवींनी उचलून त्यास नवीन रूपे दिली अशा प्रकारच्या पदाची दीर्घ परंपरा व विस्तृत लोकप्रियता यावरून दिसून येते या प्रकारची दोन उदाहरणे हेमचद्राच्या 'व्याकरणा'तून येथे देत आहोत . 'उडून जाण्यासाठी कावळ्याचे मन वळवीत असताना स्त्रीला अचानक दीर्घकालापासून परदेशी असलेला आपला पती दिसला. विरहदु:खामुळे तिच्या हातातील बागडचा सैल झाल्याने त्यातील निम्म्या बागडया खाली जमिनीवर ओघळल्या आणि उरलेल्या निम्म्या अचानक पतीला पाहून झालेल्या आनदामुळे तटकन् फुलल्याने कडकड आवाज करीत तडकल्या.' (३५२/१) हे पद राजस्थानीत खूप लोकप्रिय आहे फक्त तिसऱ्या भागाच्या अर्थामध्ये थोडा फरक आहे. 'निम्म्या बागडया कावळयाच्या गळयात ओघळल्या.' आणखी एक पद आहे (३३८/१): 'जे स्वतःचे गुण लपवतात आणि दुसऱ्याच्या किंचितशा गुणाचा उदो उदो करतात ते खरोखरच महान होत. अशा दुर्मिळ महानतेसाठी मी स्वतःचे बलिदान करावयास तयार आहे.'

याखेरीज बारहमासा (बारा महिन्याची) षट् ऋतु (सहा ऋतूंची) आणि फागु (वसत ऋतूची) म्हणून ओळखली जाणारी काव्येही लिहिलेली आहेत विक्रमादित्य, भोज, हसराज-बच्छराज, विद्याविलास, सदयवत्स, अबड इत्यादींच्या लोककथादेखील असख्य कवींनी पद्यबद्ध केल्या. त्यापैकी काही महत्त्वाच्या काव्याचा येथे परामर्श घेऊ या.

नरपति नाल्हविरचित बीसलदेव रासच्या तीन वेगवेगळचा प्रती प्रसिद्ध झालेल्या आहेत याच्या रचना कालाविषयी वाद आहे, पण १४ व्या शतकाच्या पूर्वार्धात ते रचले असावे असे म्हणावयास हरकत नाही. याची कथा साधी आहे. भोज परमार राजाची कन्या राजमती हिचा अजमेरच्या बीसलदेवशी विवाह झाला होता. पहिल्याच भेटीत एक विलक्षण घटना घडली बीसलदेवने मोठ्या घमेंडीने फुशारकी मारली की, त्याच्यासारखा दुसरा कोणी राजा नाही, राजमतीने यावर आक्षेप घेत म्हटले की त्याच्यासारखे आणखीही खूप राजे आहेत. ओडिसाचा राजा त्यांपैकी एक असून त्याच्या राज्यातील खाणीमधून हिरे निघतात. पण त्याच्या (बीसलदेवच्या) सांभार तलावातून मात्र फक्त मीठ मिळते बीसलदेवला हे बोलणे झोंबले आणि ओडिसाला जाऊन बारा वर्षे तेथे राहून हिरे गोळा करावयाची प्रतिज्ञा त्याने केली. त्याला या निश्चयापासून परावृत्त करावयाचा राणीने खूप प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला अखेरीस त्या कालावधीनंतर राजमतीने राजास परत येण्याचा निरोप पुरोहिताकरवी पाठविला आणि राजा परत आला.

हे एक शृंगारिक वर्णनात्मक काव्य असून गेय आहे. कार्तिक महिन्यापासून सुरू होऊन पुढील बारा महिन्यांच्या 'बारहमासा'तील विरह दुःखाची अभिव्यक्ती हृदयस्पर्शी आहे काव्यातील राजमतीचे पात्र अविस्मरणीय आहे जिभेने ती तिखट असून स्वतंत्र वृत्तीची आहे पोकळ वल्गना व घमेंड तिला मान्य नाही, पण त्याच-बरोबर स्त्रीसुलभ प्रेमाचा कमकुवतपणा तिच्या ठायी आहे. तिच्या कोमल भावनांचे अनेक प्रकारे वर्णन केलेले आहे. बीसलदेव जायला निघतो तेव्हा ती म्हणते, 'मला मारून टाका नाहीतर स्वतःबरोबर घेऊन जा नाथ ! सकाळ सध्याकाळ मला दोन दोन दुःखे छळत असतात एक क्लेशकारक तारुण्य, ते माझा जीव घेईल आणि दुसरे, वांझोटी ठरण्याचे दुःख.' (४२ गुप्ताची प्रत)

वसत विलास फागुने कित्येक विद्वानांचे लक्ष वेधून घेतले आहे आणि त्याच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत प्रस्तुत काव्याचे दोन पाठभेद— लहान व मोठे, अनुक्रमे ५२ व ८४ वा ८६ पदे असलेले— उपलब्ध आहेत लोकप्रियता व पदरची पदे दडपून घुसडण्याची वृत्ती हे त्या मागचे कारण असावे काव्य पूर्णतया लौकिक असून गेय आहे. प्रत्येक पदानतर तीच भावना व्यक्त करणारे एखादे सस्कृत वा प्राकृत पद दिलेले आढळते ही पदे नैषधीय चरित, शिशुपाल वध, कुमारसभव, शाकुतल, अमरुशतक, कर्पूर मजरी, प्रबोध चंद्रोदय, सुभाषितावली, सारंगधर पद्धति, सदुक्ति कर्णामृत, इ. मधून घेतलेली आहेत या दोन प्रतींपैकी फक्त एक अस्सल असावी तिचा लेखक अज्ञात आहे मात्र तो जैन कवी नसावा हे निश्चित, कारण जैन तत्त्वज्ञान वा धर्माची पुसटशी देखील छटा यात नसून वर्णन शुद्ध लौकिक आहे. १३५० च्या सुमारास ते रचले असावे. रचनेची एक ठराविक पद्धत दिसते. संगीत परिणामकारक व गतिमय करण्यासाठी प्रत्येक पदात एक अतर्यमक दिलेले आहे वसंतऋतू व त्याच्या शृंगारक्रीडा, कामदेवाने संपूर्ण वर्चस्व व प्रभाव, विरह दुःख, प्रेमी युगुलाचे पुनर्मीलन, स्त्रीचे शारीरिक सौंदर्य याचे तपशीलवार वर्णन केलेले आहे. वसतऋतू व त्याची शृंगारिक सुखे हा काव्याचा मुख्य विषय आहे नादमधुर व प्रासादिक भाषेत याचे वर्णन केलेले आहे. कवी एका पदात म्हणतो,

दोन्ही उन्नत स्तने चागल्या योद्ध्याप्रमाणे युद्धात शरण गेली नाहीत या शृंगार युद्धात स्वामी जरी प्रचड प्रतिस्पर्धक असला तरी योद्ध्यानी आपली चिलखते (म्हणजेच) स्तन प्रावरणे, टाकून दिली आहेत.

शृंगार शत हे १०५ पदाचे काव्य कोणा अज्ञात कवीने १३५० च्या सुमारास रचलेले आहे हे शृंगार काव्य 'सामान्य नायिके'च्या वर्णनाने सुरू होते पुढे मग त्यात वसंतऋतूपासून प्रारभ करून सहा ऋतूचे चित्रमय वर्णन केलेले आढळते

वर्षातील ऋतूप्रमाणे बदलणाऱ्या निसर्गाच्या रूपानुसार व वैशिष्ट्यानुसार

वियोगाचे दुःख आणि व्यथा व शृंगारसुख हे लालित्यपूर्ण भाषेत अभिव्यक्त केले आहे मुख्य विषय वसत विलास फागुला थोडाफार जवळचा आहे. कवीने गणमात्रा वृत्ताचा वापर केला आहे

मरु-गुर्जर भाषेत पद्यबद्ध केलेली सर्वांत प्राचीन लोककथा म्हणजे जैन कवी विजयभद्र याने १३५४मध्ये लिहिलेले 'हंसराज बच्छराज चउपई' काव्य होय

या कथेवरील अधिक लोकप्रिय काव्य आहे आसाइत या ब्राह्मण कवीने १३७०मध्ये लिहिलेले हंसावली. त्यात ४३८ पदे (मुख्यत. चौपई व दोहे) असून त्याचे चार भाग आहेत. पहिठाणचा राजा नरवाहन याने पाटणचा राजा सनक भ्रमची मुलगी हंसावली हीस स्वप्नात पाहिले ती अतिशय पुरुषद्वेष्टी म्हणून विख्यात होती, पण तिचे मन वळवून आपल्या राजाशी तिचे लग्न जमविण्यात नरवाहनाचा मंत्री यशस्वी झाला. या जोडप्याला पुढे बच्छराज व हंसराज ही दोन मुले झाली एकदा तरुण हंसराजाने कामांध पट्टराणी लीलावतीच्या कामुक मागणीला नकार दिला. परिणामी विरस झालेली राणी चिडली आणि दोन्ही मुलाना ठार मारण्याची शिक्षा ठोठावण्याचे कारस्थान तिने केले मात्र त्या शिक्षेची अमलबजावणी झाली नाही आणि त्याना रानात सोडून देण्यात आले. तेथे त्याचे अवर्णनीय हाल झाले पुढे बच्छराज हा सनक भ्रमची मुलगी चित्रलेखा हिच्या प्रेमात पडला आणि अनेक साहसी कृत्ये केल्यावर त्याने तिला जिंकले. त्याचा प्रतिस्पर्धी पुष्पदत याने कपटाने त्याला समुद्रात फेकून दिले पण तो वाचला. हंसराजला सुदैवाने कातिनगरचे राज्य लाभले त्या राज्याचा निपुत्रिक राजा मरण पावला होता. बच्छराजची तेथेच त्याच्याशी भेट झाली.

कल्पना विलास, भाषा, प्राचीनत्व व तत्कालीन समाजाचे चित्रण या दृष्टींनी हे काव्य महत्त्वपूर्ण आहे. काव्यगत मूल्य फारसे नाही शृंगार मुख्य रस असून जोडीला अद्भुत रसही आहे.

सदयवत्स वीर प्रबंध हे ७३० पद्यांचे निवेदनात्मक काव्य असून १४०९मध्ये भीमने ते रचले सदयवत्स सावलिंगाची कथा राजस्थान, गुजरात व त्या लगतच्या भागात प्रसिद्ध आहे अब्दुल रहमानच्या संदेश रासक आणि जायसीच्या पद्मावत-मध्ये या कथेचा उल्लेख सापडतो राजस्थान व गुजरातमध्ये या कथेचे विभिन्न पाठभेद आढळतात त्याचे मुख्यतः दोन प्रकार आहेत : पद्य आणि गद्यपद्य-मिश्रित. राजस्थानातील कथा बहुश. संमिश्र स्वरूपाची आहे त्यात सावलिंगाला प्रेयसी दर्शविले आहे. हल्लीच्या काव्यात मात्र तिला पत्नीपद दिलेले आहे शौर्यापेक्षा ते शृंगारात्मक अधिक आहे. प्रस्तुत प्रबंध हे कथेवरील सर्वांत प्राचीन काव्य होय सदयवत्स हा उज्जैनचा राजा प्रभुवत्स याचा मुलगा होता. प्रतिष्ठानचा राजा शालिवाहन याची मुलगी सावलिंगा हिने स्वयंवराचे वेळी पती म्हणून त्यास

निवडले. एकदा सदयवत्साने राजाच्या जयमंगल नावाच्या मदोन्मत्त हत्तीच्या तडाख्यातून एका गरोदर ब्राह्मण बाईस वाचवले. यावर राजा इतका खूष झाला की, त्याने सदयवत्सास युवराजपद देण्याचे ठरवले, पण मंत्र्याने राजाचे कान फुकले. परिणामी राजाने सदयवत्सास हद्दपार केले. सावलिंगाही त्याच्या-बरोबर गेली. यानंतर, सदयवत्साच्या अनेक साहसी व अचाट कृत्यांचे वर्णन कवीने केले आहे. काही मनोरंजक कथाही मधूनमधून गुफल्या आहेत. अखेरीस, सदय-वत्सास त्याचे वडील गादीवर बसवतात.

काव्याच्या नावावरून सूचित होते त्याप्रमाणे त्यात सदयवत्साच्या शौर्याचे वर्णन आहे. रोमांचकारी व उदात्त स्वभावामुळे तो शौर्याची कृत्ये करतो. काव्याच्या सुरवातीस कवी नवरसामध्ये कथा सांगण्याचा निश्चय व्यक्त करतो, पण मुख्य रस वीर' असून त्या खालोखाल शृंगार व अद्भुत रस आहेत. मुळात ही एक प्रेमकथा असून शौर्याची कृत्ये दुय्यम आहेत. अपभ्रंशाची छटा असलेली मरु-गुर्जर ही त्याची भाषा आहे. काव्यगत सौंदर्य, कल्पनावैभव, भाषा व तत्कालीन समाजाचे चित्रण या दृष्टीने या कालखंडातील विख्यात काव्यांमध्ये त्याची गणना होते. हे काव्य रचले गेले त्यावेळी उच्च वर्गात बहुपत्नीत्व प्रचलित असल्याचे दिसते. राजेलोक स्वतःच्या बुद्धीपेक्षा त्यांच्या मंत्र्याच्या सल्ल्यानुसार वागत होते.

निर्जन रानात तहानेने सावलिंगाच्या घशाला कोरड पडते, पण हे ती उघडपणे व्यक्त करीत नाही. ती म्हणते—

" नाथ, हरण रानात पाण्याशिवाय कशी जिवंत राहतात ?" तत्काळ उत्तर मिळते, " ते प्रेमजल पितात, प्रेमयुक्त नयनाची तळी त्या जलाने भरलेली असतात. "

वाटेत हरीण हरिणीची जोडी मरून पडलेली दिसते. त्यावर ती विचारते :

" त्यांना कुणा शिकाऱ्याने मारलेले दिसत नाही. कारण रक्तस्राव होत नाहीये की बाण दिसत नाहीये. सुदा, हे कसे मरण पावले सांग बघू. " त्याचे उत्तर होते, " पाणी इतके कमी होते की, त्यात दोघांची तहान भागणे शक्य नव्हते. प्रत्येकजण स्वतः पाणी न पिता दुसऱ्यास पाणी पिण्याचा आग्रह करू लागला. कोणीच पाणी प्यायले नाही. दरम्यान पाणी सुकून गेले. म्हणून हे मरण पावले. "

'पृथ्वीचंद्र वाग्विलास'चा लेखक माणिक्य-सुंदर सूरी याने १४२१ च्या सुमारास मलयसुंदरी कथा रचली. चंद्रावतीचा राजा वीरधवल याची मुलगी राज-कन्या मलयसुंदरी आणि पृथ्वीस्थानपुरचा राजा सूरजपाल याचा मुलगा महाबल याची ही प्रेमकथा. महाबलने राजकन्येला ती गवाक्षात बसलेली असताना पाहिले, दोघेही परस्परांच्या प्रेमात पडले आणि विवाह करावयाचे त्यांनी ठरवले. त्यांना अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले शौर्य, परिश्रम व धीराने त्यांनी त्यावर विजय मिळवला. अनेक चमत्कारिक घटना यात आहेत. प्रस्तुत काव्य म्हणजे पद्यबद्ध

प्रेमकथा असून जैन कवींमध्ये ती लोककथा अतिशय लोकप्रिय होती अशा कथांना, त्यात अर्थातच या कथेचाही समावेश आहे, या कवींनी धार्मिक छटा दिली.

हीरानंद सूरीने 'विद्याविलास पवाडउ' हे रोमँटिक काव्य १४२८ मध्ये रचले यात १८९ पदे आहेत विनयचंद्र याच्या मल्लिनाथ काव्य या संस्कृत काव्यावर ते आधारलेले आहे. मूर्खचट्ट व विनयचट्ट याची कथा कवीने घेतलेली आहे धनवाह नावाच्या श्रीमंत व्यापाऱ्याचा चौथा मुलगा घनसागर याला घरातून हाकलून देण्यात आले होते कारण आपण उज्जैनचे राजे होणार असे तो म्हणत असे तो श्रीपुरला आला तेथे तो एका शाळेत जाऊ लागला. त्या शाळेत सोहागसुंदरी ही राजकन्या आणि लच्छीनिवास हा प्रधानाचा मुलगाही शिकत असे. घनसागर मूर्ख असला तरी विनम्र होता. म्हणून अगोदर त्याला मूर्खचट्ट आणि नंतर विनयचट्ट ही टोपण नावे मिळाली. राजकन्येची लच्छीनिवासशी लग्न करायची इच्छा होती, पण त्याला ते पसंत नव्हते. आपल्याऐवजी तिने विनयचट्टशी विवाह करावा असे असे त्याला वाटत होते लच्छीनिवासने राजकन्येच्या भेटीचे एक संकेतस्थळ ठरविले नियत जागी पोहोचल्यावर कपटाने तिचे विनयचट्टशी लग्न लावण्यात आले लग्नानंतर ते जोडपे उंटाच्या पाठीवर बसून उज्जैनला गेले. तेथे दिवस उगवल्यावर तिला दिसले की, आपले विनयचट्टशी लग्न झाले आहे तिला खूप वाईट वाटले. विनयचट्टला पूर्वी सरस्वती देवीने वरदान दिले होते तो मोठा विद्वान झाला. विद्याविलास हे नामाभिधान त्याने मिळवले. अनेक साहसी कृत्ये केल्यावर अखेर तो उज्जैनचा राजा झाला.

पूर्वजन्माचे ज्ञान ही जैन कवींची आवडती संकल्पना आहे तिचाही येथे वापर करण्यात आलेला आहे. काव्य गेय असून गीताची चाल सांगितलेली आहे राजदरबार, व्यापार-उद्योग, स्त्रियावरून भांडणे आणि आदर-सत्काराच्या पद्धती वगैरेंचे वर्णन यात आढळते त्या दृष्टीने हे काव्य महत्त्वपूर्ण आहे.

हीर भाट याने १३ व्या शतकाच्या पूर्वार्धात कधीतरी मान कुतुहल वा मानवती विनयवती प्रबंध लिहिला. इडरच्या राव गंपाची पत्नी विललकुँवरी उर्फ मानकुँवरी हिचे गर्वहरण करण्यासाठी हे लिहिले होते. डूंगरपुरच्या अधिपतीच्या विललकुँवरी आणि लालकुँवरी उर्फ विनयवती या दोन कन्या त्यांचा विवाह अनुक्रमे रावगंपा आणि टोडाचा नथराज याच्याशी झाला होता. नथराजला अफूचे व्यसन होते व तो नेहमी त्या नशेत असे. म्हणून लालकुँवरी राव गंपाबरोबर पळून गेली. बहीणच सवत झाली याचा भयंकर मत्सर वाटून विललकुँवरीचा राग अनावर झाला पतीला तिने जिणे नकोसे करून टाकले

एकदा हीर भाट कवी रावकडे दान घ्यावयास आला असता त्याला रावच्या दु:खाचे कारण कळले. तेव्हा त्याने वर उल्लेखिलेले ११४ पदांचे काव्य रचून विलल

कुँवरी व राव यांच्यात समझोता घडवून आणण्याचा प्रयत्न केला. काव्याची भाषा राजस्थानी मिश्रित अपभ्रंश आहे. एक पद आहे :

" लालकुँवरीने रावला विललकुँवरीकडे जाण्यासाठी सांगितले. त्याने उत्तर दिले, ती भयंकर गर्विष्ठ आहे आणि मला गर्विष्ठपणा सहन होत नाही. कानाला जखम करणारी सोन्याची कर्णफुले कशाला परिधान करायची ?"

मयण छंद नावाने मयण भट्ट (वा मरण बम्भ) याने कवित्त छंदात लिहिलेली सुमारे ४० शृंगारिक पदे विभिन्न हस्तलिखितात आढळतात. रमणीचे शारीरिक सौंदर्य आणि शृंगारिक भावना, हावभाव व क्रीडा यांचे मोठे चित्ताकर्षक वर्णन त्यात केलेले आहे. भाषा वसंतविलासच्या भाषेइतकी मधुर व कोमल आहे. अन्य जैन कवींची रचना– 'लावण्य समय'वर या कवित्तमधील काही पदांची स्पष्ट छाप दिसून येते यावरून याची लोकप्रियता सिद्ध होते. १८ व्या शतकाच्या सुरवातीला गुजराती कवी सामल याने रचलेल्या नंद बत्तीसीवरही या पदाचा ठसा दिसून येतो. यावरून मयण भट्टाचा रचनाकाल १५ व्या शतकाचा पूर्वार्ध असावा असे म्हणता येईल.

मयण भट्टाने कवित्तमध्ये बरीच पदे रचली अशी त्याची ख्याती आहे परिणामी रणधवलला त्याची पूर्वीची प्रतिज्ञा मोडावी लागली. कोणाही भाटाला दान देणार नाही अशी रणधवलची प्रतिज्ञा होती या घटनेचे वर्णन रणधवल री वात या राजस्थानी कथेत आलेले आहे प्रस्तुत कवीच्या काही पदाचाही त्यात समावेश आहे. गणपती कायस्थ याच्या माधवानल-कामकंदलामध्येही मयण पुराणाचा उल्लेख आढळतो, पण जोवर ते पुराण आणि वस्तुस्थितीविषयक अन्य पुरावे मिळत नाहीत तोवर मयणच त्याचा लेखक असल्याचे ठामपणे म्हणता येत नाही.

घाग आणि भड्डरी यांच्या हवामानाच्या अंदाजविषयक म्हणी व संवाद याचा काटेकोरपणे काव्यांतर्गत समावेश होत नसला तरी ते मेघमाल-भड्डरी, ढाक-भड्डली अशा विभिन्न नावांनी अत्यंत लोकप्रिय होते व आजही आहेत. १५ व्या शतकाच्या पूर्वार्धापूर्वी लिहिलेली त्याची मूळ प्रत उपलब्ध असून त्याची भाषा राजस्थानी मिश्रित अपभ्रंश आहे. मूळ म्हणी ११ व्या ते १३ व्या शतकाच्या दरम्यान रचल्या होत्या असा निष्कर्ष काढावयास हरकत नाही. एका पदात म्हटले आहे,

" तित्तरच्या पंखाच्या रंगाची छटा असलेला मेघ आणि डोळ्यात काजळ घालणारी विधवा, हे अनुक्रमे निश्चितच वर्षातील व पुनर्विवाह करतील."

## चारण काव्य

११ व्या ते १४ व्या शतकापर्यंत, चारण शैलीचे काव्य स्फुट पदांच्या स्वरूपात

हेमचंद्राच्या अपभ्रंश व्याकरणात व जैन प्रबंधामधून दिलेले आढळते. ते बहुशः पश्चिम अपभ्रंशात आहे. पण काही मात्र त्यावेळी विकसित होत असलेल्या व अपभ्रंशाची किंचित छटा असलेल्या राजस्थानीला जवळचे असल्याचे आढळते. प्रशंसनीय ऐतिहासिक व शौर्याची कृत्ये शृंगारिक, भावना, वस्तुनिष्ठ वर्णन, नैतिक व धार्मिक विषय यावर ही पदे रचलेली आहेत अशा प्रकारच्या काव्याच्या सुरवातीला खालील पद्धतीची पदे असतात

प्रारंभी ज्ञात वा अज्ञात चारण वा भाटाचे स्मरण केलेले असते काही चारणाची नावे आहेत— दुमण, रामचंद्र, गागिल आणि हट्टी प्रविष्ट पुरातन प्रबंधमधील रामचंद्र चारणचे एक पद आहे—

'सुंदरी ! शत्रूच्या संख्येच्या मोठेपणाची व स्वतःच्या लहानपणाची भित्र्या लोकानाच फक्त काळजी वाटते एक चंद्र आभाळ उजळून टाकतो, असंख्य तारागणे नव्हे.'

भित्र्या रुक्मिणीला कृष्ण आश्वासन देत असल्याचे हे पद कुमारपाल प्रतिबोधमध्येही आढळते किंचित फरकाने हेमचंद्राच्या व्याकरणातही हे आढळते या दोन्ही पदामध्ये कवीचे नाव आलेले नाही अशाच प्रकारे अन्य कित्येक पदामध्ये कवीचे नाव आढळत नाही त्यामुळे अशा प्रकारच्या या पदांमध्ये चारण काव्याची वैशिष्टये जरी स्पष्टपणे असली तरी त्यापैकी किती खरोखरच चारण कवींनी लिहिलेली आहेत ते निश्चितपणे सांगता येत नाही शृंगार व दु ख याचे वीर भावनांशी संमिश्रण हे चारण काव्याचे वैशिष्टय होय. अशा प्रकारच्या काव्यात शृंगाराच्या वेगवेगळया छटाही बहुधा आढळतात. हेमचंद्राच्या व्याकरणात एक पद आहे.

'रणांगणातून शत्रूची दाणादाण उडाली असल्यास ते निश्चितच माझ्या पतीच्या शौर्यामुळे झाले आहे आपल्या फळीची वाताहत झाली असल्यास माझ्या पतीने मृत्यूला कवटाळल्यानंतरच ते शक्य झाले आहे.' (३७९/२)

या शैलीच्या कवींनी शौर्य भावना व्यक्त केल्या आहेत व पारंपरिक विधानांचा भरपूर वापर केला आहे. सिंह, अस्वल, हत्ती, बैल, गरूड व नाग यांचा ठामपणा, विशालपणा, कष्टाळूपणा, जोम, चपळ हालचाली आणि आक्रमण व रोष यांचे प्रतिक म्हणून उपयोग केला आहे व्याकरणातील आणखी एक पद आहे :

'बैलाच्या धन्याने ओझे गाडीत ठेवता न आल्याने ते अंगावर घेतले. दुसऱ्या बैलाला हे बघून वाईट वाटले. आपल्या शरीराचे तुकडे होऊन दोन बैल व्हावेत म्हणजे धन्याला आराम मिळेल असे त्याच्या मनात आले.'

आनंद व करमानंद हे या दोन चरणांनी मिळून समस्यापूर्ती करणारी रचना

केलेली आहे. म्हणजे एकाने पहिल्या ओळीत प्रश्न विचारायचा व दुसऱ्याने दुसऱ्या ओळीत त्याचे उत्तर द्यावयाचे आनद (४०१/३)चे नाव असलेले अशा प्रकारचे पद 'व्याकरणा'त आहे माधौदास दढ्वादिया याने १५९३ च्या सुमारास रचलेल्या रामरासौमध्ये मुनी करमानदचा मोठ्या आदराने उल्लेख केला आहे. करमानदने रचलेले एक भक्तिगीतही उपलब्ध आहे; पण करमानंद एक की दोन हा वादग्रस्त मुद्दा आहे कदाचित दोन असावेत.

दूहा विद्या (अपभ्रंश काव्य) च्या स्पर्धेत भाग घेण्यासाठी अण्हिलपूर पाटणला सोरठचे दोन चारण कवी आल्याचा उल्लेख सापडतो. निर्णय देण्याचे काम हेमचद्राकडे होते 'प्रबध चिंतामणि' मध्ये दोघांचे प्रत्येकी एकेक पद दिलेले आहे सिद्धराज जयसिंह याने बाधलेल्या रुद्र महालयाचे चित्रमय वर्णन लल्ल (वा हल्ल) भट्ट याने १० स्फुट पदांमध्ये (९ कवित व १ दोहा) दिलेले आहे ते अत्यत ऐतिहासिक महत्वाचे आहे

या कालखंडाच्या ज्ञात डिंगल गीतकारांमध्ये अचलो बणियो व हरसूर रोहडियो हे प्राचीनतेच्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत अचलोची गीते मेवाडचा राणा खेतसी (१३६४–१३८२) वर असून त्यात खेतसीचे बूदीच्या हाडा लालसिंहाशी झालेल्या युद्धाचे वर्णन आहे. जोहिया देपालचा वध केल्यावर राव चिरम मरण पावला त्याच्या मृत्यचे (१३८३ मध्ये) वर्णन हरसूरने केलेले आहे या गीतामध्ये दिलेल्या घटना ऐतिहासिक घटनाशी जुळतात. हे कवी १४ व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले असे म्हणता येईल.

चारण काव्याच्या दोन्ही प्रमुख प्रकारामध्ये म्हणजे ऐतिहासिक व वीररसात्मक आणि पौराणिक व धार्मिक दोन्हींमध्ये रचना करणारा या कालखडाचा एक सर्वांत प्राचीन प्रमुख कवी म्हणून श्रीधर व्यासचे नाव घेता येईल. त्याची काव्ये आहेत— 'रणमल्ल छंद' (७० पदे), सप्तसतीरा छंद (१२० पदे) आणि 'कवित्त भागवत' (वा भागवत दशम स्कंध) (१२७ पदे व अपूर्ण)

रणमल्ल छंद हे ऐतिहासिक काव्य आहे. ऐतिहासिक व्यक्तीवर ते लिहिलेले आहे गुजरातचा झफरखान याने ईडरवर १३९८ मध्ये आक्रमण केले असता ईडरच्या राव रणमल्ल राठोडने त्याच्याशी केलेल्या युद्धाचे त्यात वर्णन आहे. प्रस्तुत काव्य १४००मध्ये रचलेले आहे.

अनुप्रासात्मक व नादमय भाषा व युद्धाचे हुबेहूब वर्णन यामुळे हे काव्य अद्वितीय झाले आहे युद्धाचे कारण फक्त राजनैतिक नसून धार्मिक व नैतिकही असते

ईडरच्या डोगर पायथ्याशी राजाच्या शक्तिशाली मुसलमान सैन्याचा गज–

बजाट ऐकून शूर कमधज (राठोड) गो, ब्राह्मण, स्त्रिया व मुले यांच्या रक्षणार्थ उभा ठाकला (५५).

काही पर्शियन व अरेबिक शब्दही वापरलेले आहेत. खरे म्हणजे युद्धाच्या वर्णनात व मुसलमानाशी होणाऱ्या सभाषणात अशा शब्दाचा वापर हे या काव्याचे एक सामान्य लक्षण होते पहिली दहा पदे–आर्या सस्कृतमध्ये आहेत. जातिवृत्ते आणि गणमात्रावृत्ते तसेच समिश्र मात्रा वृत्ताचा उपयोग केलेला आहे भाषा प्राचीन काळच्या या प्रकारच्या काव्याचा प्रातिनिधिक नमुना आहे. युद्धाचे वर्णन करताना कवी म्हणतो : मुसलमान सैन्यात सैनिक त्याच्या शस्त्राचा खणखणाट करीत होते. रणमल्लने भाला परजित युद्धात उडी घेतली. त्याच्या शस्त्रांचा नाद ऐकून शत्रू सैन्य लुटालूट करायचे सोडाच पण जेवायचे देखील विसरले त्याने निडरपणे व शूरपणे त्याच्या माकडासारख्या दिसणाऱ्या सरदाराना पकडले.

त्याच्या भव्य तेजस्वी चेहऱ्यावर पिळदार मिशा व मुसलमानाशी हाडवैराचे भाव होते. सतप्त रणमल्ल युद्धात हाती तलवार घेतलेल्या यमदूतासारखा भासत होता (६४).

सप्तसती हे वीररसात्मक काव्य मार्कंडेय पुराणातील दुर्गा सप्तशतीवर आधारित आहे. त्यामुळे विषयात मौलिकता नाही, पण प्राचीनत्व, भाषा, शैली व परपरा या दृष्टीने ते अतिशय महत्त्वपूर्ण आहे. यातील कथेचा भाग कमकुवत असून कवीला सर्व प्रकारच्या वर्णनात अधिक गोडी असल्याचे दिसते हे वैशिष्ट्य आणि संस्कृत शब्दयोजनेची आवड हे नतरच्या पृथ्वीराज राठोड लिखित 'वेलि क्रिसन-रुक्मणी री' या काव्यातही दिसून येते सप्तशतीची भाषा व वृत्त योजना रणमल्ल छंदासारखी आहे

कवित्त भागवत हे भागवत पुराणाच्या दशम स्कधावर आधारलेले आहे
चारण शैलीतील पौराणिक काव्याचे हे सर्वांत प्राचीन नमुने होत.

१५ व्या शतकाच्या पूर्वार्धात बादर व बहादुर नावाच्या मुसलमान ढाढीने नीसाणी व दोहा छदात वीरमायण रचले. त्यात प्रारभीचे राठोड सरदार व जोहिया याच्याशी संबंधित अनेक घटनाचे व युद्धाचे वर्णन आहे राठोड आहेत— राव सलखाची मुले जैतमाल, मल्लिनाथ, वीरमदेव; मल्लिनाथचा मुलगा जगमाल, वीरमदेवची मुले चूडा आणि गोगा. जोहिया आहेत— कुलप्रमुख दला, त्याचे भाऊ मदु, जसा, देपाल आणि अन्य भाऊबद. वर्णित घटनाचा कालखड आहे– मल्लिनाथ जेव्हा महेवा आणि खेडचा अधिपति झाला म्हणजे १३७४ च्या थोडया पूर्वीपासून ते जोहियानी गोगाचा वध केला तेथपर्यंतचा म्हणजे १४०२ पर्यंतचा. घटनास्थले आहेत— बारमेर, माडू, सहवाण वा जोहियावाटी (सूरतगड आणि श्रीगंगानगर, राजस्थानातील जिल्हा अनूपगड यांच्या आजूबाजूचा प्रदेश),

भावलपूर (पाकिस्तान), लाडनून, जांगलू, फलोदी, मंदीर इ. नैणसी री ख्यात वरून दिसून येते की अखेरच्या वर्णित घटनेच्या वेळी कवी हजर होता. ख्यातमधील 'गोगाजी री वार्ता' मध्ये नैणसीने दोन ओळी नोंदलेल्या आहेत. त्यावेळी तेथे हजर असलेल्या एका ढाढीने घोडयाविषयी त्या म्हटलेल्या आहेत. प्रस्तुत काव्याच्या नीसाणीमध्ये त्याचा समावेश केलेला आहे.

प्रस्तुत काव्य राठोडाच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे त्यात १४ व्या शतकातील राठोड सत्तेच्या अभ्युदय व विस्ताराची आणि जोहियाच्या पतनाची नोंद आढळते राजपूत सरजामशाही समाजाची सर्व उदात्तता व वैगुण्ये यात व्यक्त झाली आहेत. या विषयावरील हे एकमेव निवेदनात्मक काव्य होय अस्तित्व टिकवण्यासाठी संघर्ष, 'आन, मान व शान' साठी प्राण देण्याची तयारी, सतत युद्धरत राहणे आणि महत्त्वाकांक्षी सरदाराची कामगिरी याचे वर्णन यात केलेले आढळते.

मुख्य घटना वीरम व जोहिया भोवती घडत जातात आणि कारण व परिणामाच्या साखळीने जुळलेल्या आढळतात हळूहळू त्या उलगडत जातात आणि कवी त्याचे क्रमबद्ध जोमदार वर्णन करतो. वीरमदेव, त्याची पत्नी मांगलियाणी, जगमाल, गोगा आणि जोहिया दला ही सर्व पात्रे तत्काल लक्ष वेधून घेतात. त्या सर्वांची वैयक्तिक गुण-वैशिष्टये आहेत त्यांचे चरित्र-चित्रण करताना कवीने अतिशयोक्ती केलेली नाही काव्य वीररसाने ओथंबलेले आहे. ते इतके लोकप्रिय झाले की नंतरच्या काळात त्यापैकी कित्येक ओळींना म्हणीचे स्वरूप प्राप्त झाले· कित्येक वात (कथा)नी त्याचा आधार घेतला कित्येक काव्ये, फार काय साङ्माला (१५३३–१६२३)ने लिहिलेले झूलणा महाराजा रायसिंघजी रा काव्यही त्यावर आधारलेले आहे. कालातराने, काव्याच्या वाढत्या लोकप्रियतेमुळे त्याच्या भाषेत किंचित फरक पडल्याचे दिसून येते. भाषा राजस्थानी असून पंजाबी व खडी बोलीची सूक्ष्म छटा त्यात आहे काव्याच्या काही पंक्ती आहेत :

'शूर जगमाल गींडोली घेऊन आला आणि त्याने ती स्वत:जवळ ठेवली. जिवात जीव असेपर्यंत तो तिला अंतर देणार नाही. तो जिवंत असेपर्यंत ती कशी कुणाला परत मिळेल ?'

'जगमालचा भाला चहू दिशांना चमकताना दिसत होता. त्याची ढाल सर्वत्र दिसत होती. त्यामुळे भ्रम होऊन बेगमने खानला विचारले की जगमाल एकच आहे की अनेक ?'

'भूमी घालवून फक्त जिवत राहणारे पुत्र कशाला हवेत ? अशा मुलांचे पालनपोषण करून त्याना भित्रट करण्यापेक्षा त्यांच्या मातानी त्याना जन्मताच विष दिले असते तर अधिक बरे झाले असते.'

'मृत सैनिकाच्या शवांनी व मेलेल्या घोड्यांनी रणांगण भरून गेले होते जणू भटक्या जातीचे लोक मैदानात उघड्यावर तळ ठोकून नतर निघून गेले होते.'

चारण गाडण सिवदास याने लिहिलेले अचलदास खीची री वचनिका हे एक ललित गद्य व पद्यात लिहिलेले लहानसे वर्णनात्मक काव्य आहे. पदे व गद्य चरण मिळून एकूण ११९ आहेत. भाषा, वाङ्मयीन परपरा, प्राचीनत्व आणि इतिहास या दृष्टीनी ते अत्यत महत्त्वाचे आहे.

यात माडूच्या सुलतान होशग घोरीने गागरोनगडच्या भोजचा मुलगा अचलदास खीचीवर केलेल्या आक्रमणाचे, आक्रमणास खीचीने मृत्यूपर्यंत केलेल्या प्रतिकाराचे आणि वीर राजपूत रमणींनी किल्ल्यामध्ये केलेल्या 'जोहर'चे वर्णन आहे आक्रमण १४२३मध्ये झाले कवी अचलदासचा समकालीन किंबहुना राज-कवी असावा त्याने हे काव्य त्या घटनेनतर म्हणजे १४३०-३५ च्या सुमारास लिहिले असावे. काव्यातील वर्ण्य विषयावरून ते स्पष्टपणे दिसून येते आणखीही काही मुद्द्यावरून हा निष्कर्ष काढता येतो. या काव्याच्या मूळ अस्सल प्रतीत १५७४ ची नोंद आहे (हस्तलिखित क्र. ९९, अनूप संस्कृत लायब्ररी, बीकानेर). प्रस्तुत हस्तलिखिताचे ग्रथशोधन करण्यासाठी वाङ्मयीन टीकेचे निकष लावले असता आपल्याला आढळते की—(१) गद्याचा एक उतारा ('अस्त्री जन सहस चालिस कौ सघाट आई सप्राप्ती हुवौ —तौ बाई पुहपाई राणी मोकल की सारधू गोत सवासिणी तौ बाई अडी) हा एकापेक्षा अधिक वेळा दिलेला आहे. ('क्र ६४, ६५ आणि ८०) त्यापैकी एक तर अप्रासगिक आहे, (२) वृत्त व त्याचे क्रमाक यांचे काही सदर्भ अनावश्यक आहेत, (३) माहिती संबंधित काही ओळींची कम-तरता असल्याचे सारखे वाटते यावरून असे दिसते की हस्तलिखितास आजचे स्वरूप प्राप्त होण्यासाठी दोन टप्प्यामध्ये विषय-विस्तार करण्यात आला असावा याची लोकप्रियता लक्षात घेता आणि प्रत्येक टप्प्यासाठी सरासरी ५० वर्षे लागली असावीत असे निश्चित करता, आपण १४७४ पर्यंत येऊन ठेपतो त्यावेळी मूळ प्रतीवरून पहिली नक्कल तयार करण्यात आली असावी म्हणूनच आमचा निष्कर्ष आहे की रचनाकाल खूप पूर्वीचा म्हणजे १४३०-३५ च्या सुमाराचा असावा.

युद्धात देह ठेवण्याचा निश्चय केल्यावर अचलदासने त्याच्या मुलाला पालहणसीला, वंश टिकावा, शत्रूचा सूड घेता यावा व किल्ला पुन्हा जिंकता यावा यासाठी किल्ला सोडून जाण्यास सांगितले. पालहणसी जेव्हा निरोप घेऊन जाऊ लागला तेव्हा वातावरण दुःखाने काळवडून गेले. सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. स्त्रियांनी 'हरि-हरि' आणि 'विसन-विसन' चा जप करीत अग्नीत उडी घेतली, जोहार केला आणि अचलदास व त्याच्या सैनिकांनी जिवात जीव असेपर्यंत युद्ध करीत धारातीर्थी देह ठेवले काव्यात सुलतानाच्या सैन्याचे व 'जौहर'चे वर्णन प्रामुख्याने आढळते

चरित्रचित्रणात सखोलता व भावनांची उदात्तता आढळते साहित्यिक अलंकरण तितकेसे लक्षवेधक नाही. राजपूताच्या प्रत्येक कृतीमागे स्वातंत्र्य, मान व गौरवाच्या रक्षणाची प्रेरणा असे. कवीने हे अन्योक्तीच्या रूपात पुढीलप्रमाणे सांगितले आहे :

'वाघ आणि हत्ती दोघे एकाच रानात राहतात. मग दोघामध्ये इतका फरक का ? वाघासाठी कोणी पै देखील देत नाही पण हत्ती मात्र लाखानी विकला जातो हत्तीच्या गळयात साखळदंड अडकवून त्याला वाटेल तेथे नेता येते वाघ अशी गुलामगिरी सहन करू शकला असता तर त्यालाही लाखोंची किंमत मिळाली असती.'

भाषाशास्त्रीय दृष्टीने हे काव्य तितकेच किंबहुना त्याहुन अधिक महत्त्वाचे आहे 'डिंगल'चे जुनी व नवीमध्ये विभाजन आणि डॉ तोस्सितोरीने मांडलेला व इतरानी मान्य केलेला तिचा १६०० हा काल याचे यामुळे आपोआपच खंडन होते. अपभ्रंशाच्या प्रभावापासूनही ते मुक्त आहे गुजराती व राजस्थानी भाषा या सुमारास वेगवेगळया झाल्या हे यावरून निस्संशयपणे सिद्ध होते. गद्याचे नमुने असलेले, चारणकृत हे पहिले अस्सल निवेदनात्मक काव्य होय

याच्या ऐतिहासिक महत्त्वाची नोंद अजून घ्यावयाची आहे. घटना घडल्या त्याच सुमारास हे काव्य लिहिले गेले आहे या वस्तुस्थितीच्या दृष्टीकोनातून चित्तोडच्या राणा मोकलची जन्मतारीख, त्याच्या सरदाराची नावे इत्यादींचा विचार व्हावयाचा आहे. चारण काव्यात वचनिका हा महत्त्वाचा टप्पा आहे काव्य रचना आणि त्यात वर्णिलेल्या घटना जवळजवळ समकालीन आहेत

चारण शैलीतील पौराणिक व धार्मिक काव्याविषयी बोलावयाचे तर असे म्हणता येईल की श्रीधर व्यास निर्मित दोन काव्येच काय ती प्राचीन कालातील उपलब्ध काव्ये होत

या शैलीखेरीज १३९६ मध्ये जाखो मणियारने रचलेल्या हरिचंद पुराणाचा येथे उल्लेख करता येईल. हरिश्चंद्र महाराजाच्या पौराणिक कथेवरील हे एक निवेदनात्मक काव्य आहे याची भाषा प्राचीन हिंदी असून त्यात काही अपभ्रंश रूपाचे अवशेष आढळतात. तसेच मरु-गुर्जरचेही किंचित मिश्रण आढळते. कवीने त्यास 'पयडो' (पवाडो) नाव दिले आहे.

## प्रकरण तिसरे

# मध्यकाल ( १४५०–१८५० )

### स्वरूप व वैशिष्टये

सुरवातीच्या कालात चित्तोडचे गुहिलोत व शिसोदिया आणि अजमेर व नागौर येथे केन्द्रित झालेले मुस्लीम यांचे राजस्थानच्या इतिहासावर बरेच वर्चस्व राहिले. मध्यकालात (१४५०–१८५०) आणखी काही रजपूत सत्तांचा उदय, मोगल साम्राज्याची स्थापना व अकबराचे राजकारण, ब्रिटिश राज्य व राजस्थानातील संस्थानिकांशी त्यांचे तह या सर्वांचा राजस्थानच्या इतिहासावर प्रभाव आढळतो.

सत्तेवर येणाऱ्या राजपूत घराण्यात मारवाडचे राठोड प्रमुख होत १४व्या शतकाच्या अखेरीस राठोडाच्या उदयास सुरवात झाली १३९४मध्ये चूंडाने मंडोवर घेतले; पण तो व त्याचे वंशज राज्यास एकसंघ आणि बळकट करू शकले नाहीत ते कार्य मंडोवरमध्ये १४५८मध्ये राज्याभिषेक झालेल्या राव जोधावर आले. त्याच्या पुढच्याच वर्षी त्याने मंडोवरजवळच जोधपूरचा किल्ला बांधला व शहर स्थापन केले. त्याच्या कर्तृत्ववान मुलाने, राव बीकाने राजस्थानच्या उत्तर भागात स्वत:साठी आणखी एक राज्य स्थापन केले. त्याने १४८५मध्ये बीकानेरचा किल्ला बांधला व १४८८मध्ये बीकानेर शहर वसविले. जोधाची अन्य मुले वरसिंह व दूदा हे मेडताला गेले व त्याच्या आजूबाजूची ३६० हून अधिक गावे त्यांनी ताब्यात घेतली अशा प्रकारे मांडलिक राज्याखेरीज जोधपूर व बीकानेर ही दोन मोठी राज्ये १५ व्या शतकात अस्तित्वात आली. अकबराच्या काळात पुढे आलेले आणखी एक राजघराणे म्हणजे आमेरचे कछवाहा. भारमलने १५६२ मध्ये सम्राटास आपली लेक दिल्यावर हे घराणे पुढे आले. त्याच्या वंशजाना मोगल साम्राज्यात उच्च पदे मिळाली पुढे मुहब्बतसिंहचा मुलगा प्रतापसिंहने १७७५ मध्ये अल्वर राज्याची स्थापना केली. तो नरूचा पंथ होता म्हणून कछवाहांच्या या शाखेला नरूका म्हणतात.

चौहान राजपूताच्या हाडा शाखेच्या राव देवाने १३४३ मध्ये बूंदी राज्याची स्थापना केली कोटा हा सुरवातीला बूंदीचाच भाग होता; पण १६३१ मध्ये शाहजहान बादशहाने माधोसिंहला कोटाचा वेगळा अधिपती म्हणून मान्यता दिली. सिरोही हे चौहानांच्या देवडा शाखेच्या अधिपत्याखाली होते. समरसिंह (११८२–

११८५) हा सिरोही चौहानाचा पूर्वज असल्याचे सांगतात. १७१५ मध्ये अस्तित्वात आलेले भरतपूर राज्य जाट लोकांचे होते. जैसलमेरवर भाटींचे शासन होते.

गुहिल वंशाच्या भचूडचा मुलगा डूगरसिंह याने १३५०मध्ये डूगरपूर राज्याची स्थापना केली. त्याचा वंशज महारावल उदयसिंहने १५१४ मध्ये त्या राज्याचे दोन विभाग करून ते आपल्या पृथ्वीराज व जगमाल या दोन मुलांना वाटून दिले.

अनेक कारणामुळे राजस्थानातील राज्यांच्या सीमा वेळोवेळी बदलत राहिल्या. नवी राज्ये स्थापन होत राहिली व मध्यवर्ती राजसत्तेकडून, अगदी ब्रिटिशांकडूनही त्याना मान्यता मिळत गेली. राजस्थानच्या, इतकेच नव्हे भारताच्याही इतिहासात निर्णायक भूमिका पार पाडणारे अनेक शूर वीर वेळोवेळी येथे होऊन गेले मध्यवर्ती सत्तेत बदल झाला की त्याचा राजस्थानातल्या राज्यांवरही परिणाम होत असे.

१५२६मध्ये बाबर व राणा सांगा याच्यात खानवा येथे झालेल्या युद्धाने भारताचे, विशेषत. राजस्थानचे राजकीय भवितव्य अक्षरशः निश्चित करून टाकले. राजपूत फळीला मोठाच धक्का बसला आणि तिचे तुकडे तुकडे झाले. अकबराचे राजकारण व कूट नीतीमुळे मेवाड वगळता बहुतेक सर्व राज्ये कोणत्या ना कोणत्या स्वरूपात अकबराच्या अधिपत्याखाली आली. या राज्यांचे शासनकर्ते व सैनिक हे मोगल साम्राज्याचे आधारस्तंभ होते हे सांगायला नकोच.

मोगल साम्राज्याच्या पूर्ण पतनानंतर १८व्या शतकाच्या उत्तरार्धात राजस्थानात मराठा सत्तेचे वर्चस्व होते जैसलमेर व बीकानेर खेरीज सर्व राजस्थान मराठ्यांच्या ताब्यात आला होता. एकी व राजकीय दूरदर्शित्वाच्या अभावामुळे आणि आपसातील अंतर्गत दुफळी, लढाया, हेवेदावे व वैर यांच्यामुळे राजपूत राज्यकर्त्यांना मराठ्यांच्या लुटालुटीपुढे व पैशाच्या सतत मागणीपुढे मान तुकवावी लागली. ब्रिटिश सत्तेवर आले तेव्हा स्वतःच्या सुरक्षिततेसाठी हे राज्यकर्ते त्याच्याशी तह करायला तयार झाले आणि १८१८ पर्यंत सिरोही सोडून राजस्थानच्या बाकी सर्व संस्थानानी ब्रिटिशांशी तह केला. अशा प्रकारे १८१९ पासून १९४७मध्ये भारत स्वतंत्र होईपर्यंत राजस्थानातल्या संस्थानांवर ब्रिटिशांचा राजनैतिक वरचष्मा राहिला. या संस्थानामध्ये दुबळ्या स्पर्धकाला राज्यसत्ता हस्तगत करण्यासाठी ब्रिटिशानी आधार व सैनिक साहाय्य दिले म्हणून १८५७मध्ये जेव्हा 'बंड' झाले तेव्हा हे राज्यकर्ते ब्रिटिशांच्या बाजूला होते. कित्येक लहान जहागीरदारानी मात्र उठावाला सक्रिय पाठिंबा दिला

तत्कालीन कित्येक प्रतिभाशाली चारणानी व कवींनी शूर वीराना व त्यांच्या शौर्याच्या कृत्याना अमर केले आहे. त्यांचे ऐतिहासिक मूल्य निर्विवाद आहे. या

साहित्यिक रचनांचा चारण शैलीच्या ऐतिहासिक व वीररसात्मक काव्यात समावेश होतो स्वत:च्या मातृभूमीचे तसेच आश्रयार्थ आलेल्याच्या जिवाचे व दौलतीचे रक्षण करण्यासाठी करावी लागलेली बहादुरीची कार्ये हा या काव्याचा मुख्य विषय आहे कवींनी या गुणाची प्रशंसा केली आहे भित्रेपणा व अत्याचाराची त्यांनी कडक शब्दात निंदा केली आहे. निंदा व उपहास करणाऱ्या या अशा काव्याला 'विसहर' म्हणतात. काव्याच्या अन्य प्रकारामध्येही हा कल दिसून येतो विशेषत: पौराणिक व धार्मिक काव्यामध्ये ! नृसिंह, राम व कृष्ण यांचे शौर्य आणि रक्षण मुक्तीचे अभयदान हा या काव्याचा प्रमुख विषय आहे

नीती, सदाचार व सुज्ञपणा ह्यावर लिहिलेल्या कविताही आढळतात. ही 'नीती' काव्ये म्हणजे तशाच प्रकारच्या संस्कृत कतीची नक्कल नसून ह्यातून लोक-नीतीचा पुरस्कार त्यांनी केला आहे. अशा प्रकारच्या काव्यामध्ये राजियै रा सोरठा हे मूर्धन्यस्थानी आहे

## संत काव्य

मध्यकालात राजस्थानातील लोकांच्या जीवनमूल्यांना महत्त्वाशी वळण लावणाऱ्या तीन महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे राजा, धर्म आणि परंपरा. धर्मावरील श्रद्धा, सहिष्णुता आणि निष्ठा ही सामान्य माणसाची वैशिष्ट्ये होती धार्मिक बाबतीत राजपूत शासनकर्ते उदार व सहिष्णु होते आज आपण ज्याला धर्मनिर-पेक्षता म्हणतो तशा प्रकारची त्यांची वृत्ती आढळते. परधर्मीय संस्थेलाही त्यांनी संरक्षण व आश्रय दिला. त्राता, हुतात्मा, वीर किंवा संतांची त्यांच्या थोर कार्या-मुळे व्यक्तिपूजा होऊ लागली. अशा प्रकारच्या कित्येक महापुरुषांना लोकदेवतेचे उच्च पद लाभले आणि त्यांच्या कामगिरीची स्थळे तीर्थस्थाने झाली. पंच'पीर' आणि करणीजी व तेजोजी ही अशा प्रकारची देवपद लाभलेल्या व्यक्तींची उदा-हरणे म्हणून सांगता येतील

वर सांगितलेल्या भौतिक बाबींमुळे आणि अन्य कारणांमुळे कित्येक धार्मिक पंथ अस्तित्वात आले, रुजले आणि फुलले. या पंथाची स्वत:ची संत परंपरा आहे आणि त्या परंपरा अजूनही चालू आहेत. या संतांनी त्यांच्या धर्ममताचे प्रतिपादन करताना काव्यजगत् समृद्ध केले.

'नाथ' वर्चस्वाचे क्षेत्र गहन व व्यापक होते. आजही त्यांची केन्द्रे स्थाने आहेत. त्यांची कित्येक काव्ये लोकप्रिय असून गोरख, चर्पट व पूर्वीच्या कालातील अन्य नाथांच्या नावावर प्रचलित आहेत त्यांची भाषा बहुधा राजस्थानी मिश्रित खडी बोली आहे. बरीचशी काव्ये ज्यांच्या नावावर ती प्रचलित आहेत त्यांनी रचलेली नाहीत हे निश्चित. 'संत काव्या'वरील प्रकरणात आपण त्याचा अधिक विचार करू या

कित्येक संतांनी हठयोगाच्या उल्लेख केला आहे आणि तसे करताना 'नाथ' भाषेचा वापर केला आहे योगाचा कोणत्या ना कोणत्या स्वरूपात अंतर्भाव केल्याचे संत काव्यात सर्रास दिसून येते. अपवाद वगळता काही प्रमुख धर्मपंथांच्या काव्यामध्ये दशावतार लोकप्रिय असल्याचे आढळते. नामदेव (१२७०–१३५०) हा पहिला संत कवी असून त्याच्यापासून सुरू झालेल्या संप्रदायाचा लवकरच राजस्थान व इतरत्रही प्रसार झाला. राजस्थानातील संत काव्याच्या भाषेविषयी आम्ही ह्या पूर्वी थोडे सांगितले आहेच. भाषेच्या तीन रूपांचा—ब्रज, पिंगल आणि राजस्थानी यांचा बहुधा वापर केलेला आहे. काही काव्ये राजस्थानी मिश्रित खडी बोलीमध्येही लिहिलेली आहेत. राजस्थानीकडे कल असलेल्या पिंगलमधील आणि राजस्थानी मिश्रित खडी बोलीमधील काव्याचाही आम्ही विचार करणार आहोत.

एखाद्या धार्मिक संप्रदायाशी निगडित असलेल्या संताचे आणि मीरा, दीन दरवेश इत्यादीसारख्या विरक्त व संयमी संताचे काव्य म्हणजे संत काव्य ! या दोन वर्गातून निर्माण झालेल्या काव्यामध्ये काही तात्त्विक फरक असल्यासारखे वाटते.

काही पंथ मूर्तिपूजा मानीत नाहीत पण अवतार कल्पनेला मान्यता देतात काही पंथाचा दोन्हीवर विश्वास नाही, पण ते ईश्वर एक असल्याचे मानतात काही मूर्तिपूजा व अवतार दोन्ही मानतात.

साहजिकच वरून समान दिसणाऱ्या मतप्रणालीमध्ये खरे पाहता फरक होता अवतार मानणाऱ्यांना अभिव्यक्तीसाठी विस्तृत क्षेत्र उपलब्ध झाले. देवाच्या अवतारांच्या लीला हा देखील या प्रकारच्या काव्याचा विषय झाला.

मध्यकालात आख्यान काव्येदेखील निर्माण झाली. जैन कवी त्यांच्या परंपरागत विषयावर काव्यलेखन करीत राहिले. त्यांनी काही उल्लेखनीय ऐतिहासिक काव्ये आणि किंचित धार्मिक छटा असलेली लौकिक प्रेमाख्याने देखील लिहिली ज्ञानाच्या अन्य क्षेत्रातही त्यांनी उपयुक्त कार्य केले. लौकिक प्रेमाचे वर्णन करणारी अनेक काव्ये या कालखंडात लिहिली गेली.

## चारण काव्य

### ऐतिहासिक वीररसात्मक काव्ये

गाडण पसायन, खिडिया चानण आणि सिढायच चौमुजा हे प्रारंभीचे कवी होत. हे सर्व मारवाडचे राठोड राव रणमल्ल आणि जोधाचे समकालीन होते या तिघांच्या काव्यात निदान एक सामान्य विषय आढळतो. तो म्हणजे रणमल्लाचा चित्तोडमध्ये १४३८ साली झालेला मृत्यू

गाडण पसायन (१४०० ते १४८७–८८) याची पुढील काव्ये उपलब्ध आहेत—

(१) कवित्त राव रणमल्ल, चूंडे रै वैर मै भाटियाँ नै मारिया, तै समै रा (५ पदे)

(२) कवित्त राव रणमल, नागौर रा धणी पेरोज नै मारिया तै समै रा (७ पदे).

(३) कवित्त राणा मोकल मुआँ री खबर आयाँ रा (५ पदे)

(४) राव रणमल रो रूपक (७१ पदे) आणि

(५) गुण जोधायाँ (७५ पदे).

पहिली तीन काव्ये स्फुट पदे आहेत. त्यांचे विषय आहेत—

(१) रणमल्लाने आपले वडील चूंडाच्या मृत्यूचा भाटींवर घेतलेला सूड. (२) मोकलच्या आक्रमणात नागौरच्या फिरोज खानाचा त्याने केलेला वध आणि (३) राणा मोकलचा वध करणाऱ्या चाचा आणि मेराचा वध करण्याची त्याने केलेली प्रतिज्ञा.

राव रणमल रो रूपक आणि गुण जोधायाँ ही निवेदनात्मक काव्ये असून त्यात अनुक्रमे राव रणमल्ल व राव जोधा यांच्या शौर्याच्या कृत्यांचे व त्याच्याशी संबंधित ठळक घटनांचे वर्णन आहे. ही सर्व काव्ये ऐतिहासिक दृष्टया बहुमूल्य आहेत.

कवित्त राणा मोकल मुआँ री खबर आयाँ रा मध्ये रणमल्ल पुढील शब्दात प्रतिज्ञा करतो—

'ते (चाचा आणि मेरा) आकाशात जरी गेले तरी मी त्याना खेचून खाली आणीन. ते पाताळात जरी गेले तरी मी त्याना तेथून बाहेर काढीन ते कुठेही गेले तरी पकडले जातील कृतघ्न चाचा जिवंत कसा राहू शकतो ? वीरमचा वंशज असलेल्या माझ्या विरूद्धच्या युद्धात बावन्न 'वीर' देखील त्याचे रक्षण करू शकणार नाहीत.' अशा प्रकारे मोकलचे मारेकरी, ते कुठेही असले तरी त्याना मारण्याची प्रतिज्ञा रणमल्लाने केली

इतिहासात नोंद आहे की १४३८ मध्ये त्या दोघाचा वध केल्यावरच त्याला स्वस्थता लाभली.

पसायत लोकप्रिय कवी होता. याला पुरावा म्हणजे नैणसीने आपल्या ख्यातमध्ये विधानाचे समर्थन करण्यासाठी आधार म्हणून पसायतची पदे उद्धृत केली आहेत.

मारवाडमधील पाधडी गावाचा खिडिया चानण हा लुंबटचा मुलगा होता आणि त्या काळचा लोकप्रिय व सन्मान्य कवी होता. राणा मोकल आणि राव जोधा यानी त्याला अनुक्रमे दोन व चार गावे इनाम दिली होती. बीकानेर राज्य स्थापन

करणाऱ्या राव बीकाने त्याला 'लाख पसाव'चे इनाम दिले होते. राव रणमल्लाची बहीण हंसाबाई आणि राणा लाखाचे लग्न खिडिया चानणने जमवून दिले होते. त्याने रणमल्लाच्या पार्थिव देहावर अग्निसंस्कार केला आणि गंगेत अस्थि विसर्जन केले त्याने रचलेली पुढील स्फुट पदे उपलब्ध आहेत : (१) दूहा राव रणमल रा (२०), (२) दूहा राव रिणधीर रा (१४), (३) दूहा सत्ता भाटी रा (६), (४) भीमोतों के सोरठे (१७), (५) गीत (डिंगल) (१) आणि (६) माताजी रा छंद.

१४३८ मध्ये राव रणमल्लाबरोबरच त्याचा भाऊ रणधीर आणि त्याचा सहयोगी जैसलमेरचा सत्ता भाटी हे देखील रणांगणात धारातीर्थी पडले. पहिल्या तीन काव्यात त्या तिघाच्या शौर्याचे व ते कसे पडले याचे वर्णन आहे. चौथ्यामध्ये भिमोत राठोडांच्या युद्धाचे वर्णन आहे. बैरसलचाही त्यात समावेश आहे राव बीकाने अजमेरच्या मल्लूखानवर आक्रमण केले. त्याचे गीतामध्ये वर्णन आहे माताजी रा छंद देवीची स्तुती करण्यासाठी रचलेले आहे.

खिडिया जग्गाच्या वचनिकामध्ये उल्लेख आलेले राव रणमल रा दूहा बहुधा खिडिया चानणने रचलेले असावे सत्ता भाटी मरताना म्हणतो .

'मेवाडने रणमल्लाचा घात केला पण त्याचे काय ? मी एकटा त्यांच्या हल्ल्याला तोंड देईन नाहीतर माझ्या "माड" (जैसलमेर) ची अब्रू जाईल '

'अरे सत्ता, तू युद्धात कट्यारीसारख्या धारदार शब्दाबरोबर कट्यार (घराण्याची मान) शत्रूवर फेकलीस.'

याचप्रकारे, सिढायच चोभुजा रणमल्लावरील एका डिंगल गीतात म्हणतोः

'एक अपूर्व गोष्ट निकिवात आली आहे. युद्धात योद्धे रात्रदिवस लढत असतात जागे असताना ते त्याची कट्यार काढतात, पण शत्रूवर हल्ला करण्यासाठी; तू (रणमल्ल) झोपेत असतानाही ती चालवलीस '

रणमल्ल निद्रेत असताना त्याला पलंगाशी बाधून त्याच्यांवर हल्ला केला, होता. तरी देखील त्या तशाही अवस्थेत त्याने मरण्यापूर्वी अनेकांना मारले

१४५५मध्ये पद्मनाभ या नावर ब्राह्मणाने कान्हड दे प्रबंध रचला. यात वर्णिलेल्या घटना घडून गेल्यावर १४१ वर्षानंतर हा प्रबंध लिहिला गेला. कान्हड दे च्या पाचव्या पिढीतील वंशज जालोरच्या अखयराज याच्या इच्छेवरून त्याच्या पदरी असलेल्या पद्मनाभाने हा ग्रंथ लिहिला. महाकाव्याच्या शैलीत रचलेले हे निवेदनात्मक काव्य आहे. जालोरच्या सोनगिरा शाखेचा चौहान कान्हड दे आणि त्याचा पुतण्या समियाणाचा सातल याच्यावर अल–उद–दिन खलजीने केलेल्या कतिपय आक्रमणांचे यात वर्णन आहे. काव्याचे चार भाग असून, १००० पदे आहेत. कवीने मात्र हा आकडा ११०० असल्याचा उल्लेख केलेला आहे. स्वाभिमान

देश व स्वातंत्र्य प्रेम, धर्म, संस्कृती व आदर्शाचे रक्षण, वचनपालन, मध्यकालातील राजपूत शूर वीराची उच्च मानवी मूल्ये व परोपकारादी उदात्त कृत्ये याची ही कथा आहे याच्या विपरीत आक्रमकाची निर्घृणता व क्रौर्य आणि येनकेन प्रकारेण विजय मिळवण्याची त्याची धडपड यातून स्पष्टपणे दिसून येते वैयक्तिक हित-संबंधापायी झालेल्या क्षुल्लक भाडणामुळे मोठाली, उत्कर्ष होत असलेली राज्ये कशी धुळीस मिळाली याची दु खद नोंद यात आहे. काव्यावरून आपणास दिसून येते की राजपुताना सुसंघटित होऊन युद्ध करता आले नाही. ऐतिहासिक मूल्य असलेले हे वीररसात्मक काव्य आहे. सामाजिक चालीरीती, लोकप्रिय समजुती, शहरे, सैन्य, युद्ध आणि त्यांचे नंतरचे परिणाम या सर्वांचे सजीव आणि परिणामकारक वर्णन यात केलेले आहे पात्राचे व्यक्तिचित्रण विशेषतः कान्हड दे, वीरम आणि फीरोझा याचे चरित्रचित्रण अत्यत प्रभावी आहे मनातील अंतरग भावभावना आणि मानवाची थोरवी व दौर्बल्य याचे शब्दचित्र हृदयस्पर्शी आहे. काव्य वाचताना आपल्याला शौर्याचा आणि वीरानी स्वातंत्र्य, उच्च आदर्श व महान परंपरांसाठी केलेल्या बलिदानाचा अभिमान वाटतो आणि त्याचबरोबर ही राज्ये उद्ध्वस्त झाल्याचे जाणवून मन व्यथित होऊन जाते कवीने त्या कालाचे मोठ्या समर्थपणे चित्रण केले आहे.

१५ व्या शतकाच्या सुरवातीला 'ऐ' आणि 'औ' ही नवी रूपे जरी आली आली होती तरी प्रस्तुत काव्याच्या भाषेत मात्र जुनी रूपे अ + इ आणि अ + उ दिसून येतात. हे जैनाच्या प्रभावामुळे झाले असावे. यास आणखी एक पुरावा म्हणजे फीरोझा आपल्या पूर्वीच्या सहा जन्माची हकीगत फक्त सांगत नाही तर पुढच्या जन्माविषयीदेखील सांगते पुनर्जन्माची ही कल्पना जैन काव्यात अत्यंत लोकप्रिय आहे. काव्य दुःखान्त आहे. पुढील जन्मी वीरम पती म्हणून लाभावा यासाठी फीरोझा अखेर सती जाते.

१५ व्या शतकाच्या उत्तरार्धातील आणि १६ व्या शतकाच्या पूर्वार्धातील आणखी काही महत्त्वाचे चारण कवी आहेत—खंगार, मेहडू, वीठू, सूरा, बारहट हरिसूर, बारहट चौहथ, लालजी मेहडू, चारण हरिदास केसरिया, आणि सोदा बारहट जमनाजी. त्यानी समकालीन राज्यकर्ते सरदार आणि त्यांची शौर्याची कृत्ये, महदशी जोधपूर व बीकानेरचे राठोड, तसेच मेवाडच्या राज्यकर्त्यांवरही स्फुट डिंगल गीते लिहिली खानवाच्या युद्धात राणा सागाचा पराभव झाल्यावर जमनाजी बारहटने लिहिलेल्या एका डिंगल गीताच्या काही ओळी पुढीलप्रमाणे आहेत :

'असा निराश का होतोस ? कृष्णाने जरासंधासमोर रणभूमीतून शभर वेळा पळ काढला होता; पण अखेर त्याचा वध करण्याची संधी कृष्णाला मिळालीच.

द्रौपदीला भयंकर संकटात पाहूनही अर्जुनाला हस्तिनापुरात स्वतःला एकदा आवरावे लागले होते. दुर्योधनाने काय केले आणि नंतर अर्जुनाने कौरवाचे काय केले ते सर्वांना ठाऊक आहेच रावणाने एकदा सीतेला पळवून नेले; पण समुद्रावर सेतू बांधल्यावर रामाने काय केले ? एकदा पराजय झाल्याने असा नाउमेद का होतोस ? अरे सांगा, तू तर शत्रूच्या शय्येतील काटा आहेस. '

कान्हड दे प्रबंधाच्या शैलीचे अनुकरण करून भांडो व्यासने १४८१ मध्ये हम्मीरायण लिहिले. हे निवेदनात्मक काव्य असून त्यात ३२७ पदे (चौपई, दोहा, गाहा, वस्तु, छप्पय आणि पदधडी) आहेत आणखीही काही बाबतीत या दोहोंमध्ये साम्य आहे. यात विख्यात चौहान वीर रणथंभोरचा हम्मीर आणि अल-उद-दिन खलजी याच्यातील युद्धाचे वर्णन आहे. युद्धाचे तात्कालिक कारण होते–आश्रयार्थ आलेल्या दोन मोगोल मीराना परत देण्यास हम्मीरने दिलेला नकार । रणमल्ल व रायपाल या त्याच्या अनुयायांनी दगा दिल्याने विजयाची आशा उरली नाही. तेव्हा स्त्रियांनी 'जौहर' केला, वीरांनी लढता लढता प्राण दिले आणि हम्मीरने स्वहस्ते आपले शीर धडावेगळे केले. रणमल्ल व रायपाल हे आपल्या अनुयायांसह शत्रूला जाऊन मिळाले. तेथून पुढे (२४० पदांनंतर) कथानकाला वेग येतो काव्यसौंदर्याच्या दृष्टीने हा भाग सर्वोत्कृष्ट होय व्यक्तिचित्रणात विलक्षण सूक्ष्मदृष्टी दिसते. हम्मीरची तळमळ, दोन मीराचे हम्मीरला समर्पण व त्यांची निष्ठा, जाज आणि वीरमचे आवेशयुक्त भाषण, 'जौहर' आणि हे सर्व प्रत्यक्ष पाहणाऱ्या नल्ह भाटाने चातुर्याने घेतलेला सूड या सर्वांचे हुबेहूब व हृदयस्पर्शी वर्णन केलेले आहे किल्ल्यातील अंतर्गत जीवनाचेही ओझरते दर्शन घडवलेले आहे. प्रसंगानुरूप मानवी भावनाचे केलेले सूक्ष्म निरूपण आश्चर्यकारक आहे.

रणांगणावर स्वारीला निघाल्याचे दृश्य पहा : किल्ला व किल्ल्यातील लोकांचा मोहत्याग करून हम्मीरने त्याच्या लढाऊ घोड्यावर मांड ठोकली त्याचा धाकटा भाऊ वीरम आदर दर्शविण्यासाठी देखील कधी पायी चालत नसे, तोच युद्धात पायी लढत असलेला त्याला दिसला या दृश्याने विलक्षण हेलावून राव हम्मीरच्या मनात आले, 'माझा भाऊ पायी लढत असताना मी का म्हणून लढाऊ घोड्यावर स्वार व्हावे ?' रावाने देखील घोडा सोडून दिला आणि पायी युद्ध केले त्याच्या पायांना दगड बोचले आणि ते रक्तात भिजून गेले.

वीराचे आयुष्य कसे असावे याचे कवी गुणवर्णन करतो :

' ज्याच्यापाशी संपत्ती आहे त्यांनी त्याचा उपभोग घ्यावा किंवा सत्कार्यासाठी ती खर्च करावी. संपत्तीने तुम्हाला कैद करू नये कारण ती शाश्वत नाही की क्षयापासून मुक्त नाही.

कान्हड दे ला श्रीमतांचा पाठिंबा होता, पण श्रीमतांच्या दुर्गुणाकडे कवीने दुर्लक्ष केलेले नाही कारण हम्मीरच्या पतनात त्याचाही हात होता.

हम्मीरवरील प्रारंभीच्या निवेदनांपैकी एक या दृष्टीनेही हम्मीरायण महत्त्व-पूर्ण आहे हम्मीरवर अनेक काव्ये रचलेली आहेत.

बाबरच्या मुलाने, लाहोरच्या कामरानने १५३४ मध्ये बीकानेरच्या राव जैतसीवर आक्रमण केले. त्यात रावकडून त्याचा पराभव झाला. या घटनेवर १५३४ ते १५४१ च्या दरम्यान तीन समकालीन कवींनी तीन उल्लेखनीय निवेदनात्मक काव्ये रचली त्यापैकी एक कवी होता वीठू सूजो. बाकीच्या दोघाची नावे अज्ञात आहेत.

राव जैतसी रो पाघडी छद (४०१ पदे) वीठू सूजोने लिहिलेले आहे सूजो हा नगराजाचा मुलगा होता आणि राव बीका व राव लूणकरण याचा समकालीन होता. राव जैतसीने त्याला खिलेरियो गाव बहाल केले होते. कवी अगोदर राव, चूंडा, रणमल्ल, जोधा, बीका, लूणकरण यांच्या पूर्वजांनी केलेल्या महत्कृत्यांचे वर्णन करतो आणि मग जैतसीच्या कार्याकडे वळतो. भटनेर जिंकून कामरान बीकानेरच्या सीमेपाशी येऊन धडकतो. अधिक चांगली तयारी करून आक्रमणाची संधी घेण्या-साठी राव किल्ला सोडून जातो. किल्ल्यात मागे तो आपले विश्वासू सैनिक अधि-कारी सोडून जातो मध्यरात्रीला तो आपल्या निवडक सैनिकांसह घोड्यांवर स्वार होऊन शत्रूवर हल्ला करतो मुगल त्या हल्ल्याला तोंड देऊ शकत नाहीत आणि त्याना रणांगणातून पळ काढावा लागतो. रावाचा विजय होतो.

राव जैतसी छद किंवा राव जैतसी रो पाघडी छद (४८५ पदे) हे कोणा अज्ञात कवीने रचलेले आहे. काव्याची सुरवात राव चूंडाचे आजोबा राव सलखा-पासून होते सलखा, वीरम व गोगा यांच्याशी संबंधित वर्णन त्यात अधिक आहे. बाकीचे सर्व वर्णन सूजोच्या काव्यासारखे तरी आहे, नाहीतर त्याला पूरक तरी आहे. दोन्ही काव्ये स्वतंत्र असून ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहेत. बीकानेरचे प्रारंभीचे राज्यकर्ते व त्यांचे पूर्वज याची विश्वसनीय माहिती त्यातून मिळते वीरमायणामध्ये आणि गाडण पसायतच्या काव्यामध्ये केलेल्या प्रस्तुतोचित विधानाचा आपण या काव्यातील विधानाशी संबंध जोडला तर राठोड, त्याचा उदय आणि अन्य काही घराण्याचा उदय, तसेच राजस्थानच्या इतिहासातील इतर घटनांची प्रमाणभूत माहिती आपल्याला मिळते. काव्यमूल्य दोन्हीचे समानच आहे युद्धाचे रोमांचकारी वर्णन आहे दोन्ही कवींनी राव जैतसीच्या हल्ल्यापूर्वी सैनिक व त्यांचे रणघोडे यांचे वर्णन करण्यात १०९ पदे खर्ची घातली आहेत. (सूजो, २४४ ते ३५२ पदे आणि अज्ञात कवी ३२० ते ४२८ पदे). ऐतिहासिक दृष्टीने ती

महत्त्वाची असली तरी काव्याच्या दृष्टीने ती निरर्थक व कंटाळवाणी आहेत यात काहीच सशय नाही

अशा पद्धतीच्या विस्तृत निवेदनात्मक काव्याची एक परंपरा आहे. ती म्हणजे काव्याच्या नायकाच्या पूर्वजांची माहिती देणे. बारहट आसाच्या रावल माला रो गुण मध्ये सारांशरूपाने ही माहिती दिल्याचे सर्वप्रथम आढळते. तिचाच पुढे विकास झाल्याचे या काव्यामध्ये दिसून येते या ठिकाणी एक लक्षात घेतले पाहिजे अज्ञात कवीनी शब्दाच्या जुन्या रूपाचा अ + इ आणि अ + उ चा वापर केला आहे. सूजोच्या भाषेत ही जनी रूपे आढळत नाहीत.

जैतसी रासो या तिसऱ्या काव्याचा कवी अज्ञातच आहे. या काव्यात इतर तपशील सोडून फक्त सैन्य, युद्ध व रावच्या विजयाचे वर्णन आहे. काव्यसौंदर्याच्या दृष्टीनेही हे तितकेच महत्त्वाचे आहे.

राव जैतसीच्या विजयाने अन्य समकालीन कवींचेही लक्ष वेधून घेतले, त्यांनी तो तुरळक पदांमधून व गीतांमधून साजरा केला. त्यात गोरा, शिवा आणि बीठू बाघजी हे विख्यात होत.

राव जैतसीचे वडील राव लूणकरण याच्यावरही गोराने कवीत्त रचले. त्याची पदे खऱ्या राजपूत वीराच्या वृत्तीचे प्रतिनिधित्व करतात राव नंतर मुस्लिमांशी झालेल्या नारनौलच्या युद्धात मरण पावला. राव एका पदात म्हणतो :

'लंकेचा ताबा मिळावा म्हणून बिभिषण रामाला येऊन मिळाला त्याला जे हवे होते ते करण्यासाठी त्याने रामाचे मन वळवले. कोट्यावधी राक्षसाच्या जिवाची किंमत देऊन त्याने स्वत.चा बचाव केला. घरची गुपिते सागून त्याने रावणाचा वध करविला. मी शूर वीर राजांच्या घराण्याचा आहे. शत्रूच्या सैन्याची मला अजिबात भिती वाटत नाही.

मी बीकाचा पुत्र आहे बिभिषणाने जे केले ते मी कधीही करणार नाही. महान कर्ण आणि माझे पूर्वज राव रणमल्ल व जोधा यानी जे केले त्याप्रमाणे मी देखील रणांगणात खंबीरपणे पाय रोवून उभा राहीन. मी जर रणांगण सोडून गेलो तर माझ्या थोर पूर्वजाची मान लाजेने खाली जाईल. जगात अमर कोणीही नाही दान, शौर्य, सत्य व विनम्रता हेच तेवढे साक्षीदार म्हणून माणसाबरोबर जातात'

भाद्रेस गावच्या गीधाचा मुलगा बारहट आसा (१४९३–१५९३) हा त्या काळचा सुप्रसिद्ध कवी होता कित्येक राज्यकर्त्यांशी त्याचे चांगले सबंध होते जोधपूरच्या राव मालदेव (१५३१–१५६२) ने त्याला जैसलमेरला पाठवले होते. मालदेवाची मानी राणी उमादे लग्नाच्या पहिल्याच रात्री त्याच्यावर रूसली होती. कारण तिने मालदेवाला तिच्या दासीशी भारमलीशी प्रेम करताना पाहिले होते त्यामुळे

रागावून ती माहेरी जैसलमेरला जाऊन बसली होती मालदेवाने राणीची समजूत घालून तिला परत आणण्यासाठी आसाला पाठवले. परत येताना वाटेत राणीच्या प्रश्नाला उत्तर देताना आसाने पुढील दोन ओळी म्हटल्या त्या ऐकताच राणी परत जैसलमेरला निघून गेली.

'(उमादे), स्व मान राखावयाचा असेल तर तुला पतिपासून दूर व्हावे लागेल आणि पति हवा असेल तर स्व-मान सोडावा लागेल. एकाच ठाण्यावर एकाच खुंट्याला दोन हत्ती बांधून राहू शकत नाहीत.'

आसाला जैसलमेरच्या रावलने देखील भागमतीला आणण्यासाठी पाठवले होते. ती कोटडाच्या बाघाला दिलेली होती. बाघाच्या आदरातिथ्याने कवी प्रसन्न झाला आणि ज्या कामासाठी आला होता ते सोडून तो बाघाचा अतरंग मित्र झाला. उमादे आणि बाघा याच्या मृत्यूवर कवीने अतिशय भावस्पर्शी पदे लिहिली आहेत राजस्थानीत ती प्रसिद्ध आहेत आसाची काव्यरचना खालीलप्रमाणे आहे.

(१) रावल माला रो गुण (८७ पदे) यात रावल मल्लीनाथ याचा आठवा वंशज मेघराज याच्या शौर्याचे वर्णन आहे त्याचबरोबर त्याच्या पूर्वजाचे व त्याच्या कार्यांचेही थोडक्यात वर्णन आहे

(२) गोगाजी री पेडी (४५) यात गोरखनाथाच्या आशीर्वादाने वाचल मातेच्या पोटी गोगाजीच्या जन्माची कथा सांगितलेली आहे

(३) राव चंद्रसेन रो रूपक (२६) यात राव मालदेवचा मुलगा चद्रसेन-विषयी सांगितलेले असून २६ वृत्ताची उदाहरणे दिलेली आहेत.

(४) रावल जाम रा दूहा (५), दादू रा दूहा आणि अन्य स्फुट पदे अनुक्रमे त्या त्या व्यक्तीची प्रशसा करण्यासाठी रचलेली आहेत.

(५) उमादे भटियाणी रा कवित्त (१४).

(६) बाघजी रा दुहा (सुमारे ३५).

(७) गुण निरंजन प्राण हे एक भक्तिकाव्य आहे.

चारण शैलीच्या दोन्ही प्रकारामध्ये विपुल काव्यरचना करणारा आसाजी हा या कालखंडातील पहिला कवी होय.

भावनाच्या तीव्रतेच्या दृष्टीने उमादेवरील कवित्त आणि बाघाजीवरील दूहा याचा बराच वरचा क्रमांक लागतो. कवित्तमध्ये स्वाभिमान व उदात्तता याची छटा दिसून येते तर दूहामध्ये तळमळ व करुण व्यथा आढळते. या काव्यानी उमादे आणि बाघजीला अमर करून टाकले. एक कवित्त असे आहे .

'मंदोदरीने रावणाला एकटे जाऊ दिले. कुशाग्र बुद्धीची कुंती पंडू राजाच्या मागे राहिली. कृष्ण निघून गेल्यावर गोपींनी त्यांचे हात आधारासाठी अजिबात

पुढे केले नाहीत. कौसल्येने दशरथाची चितेवर काही सोबत केली नाही. मरणोत्सवाच्या दिवशी या सर्व थोर महिला पातिव्रत्याच्या अखेरच्या कर्तव्यापासून विन्मुख राहिल्या. कारण अग्निज्वाळाची मिठी कोण सहन करणार? पण मी तो महान उत्सव कसा विसरू? उमा म्हणाली '

बाघजीवरील काही दोहे पुढीलप्रमाणे आहेत :

' ज्याने आलिंगनासाठी हात पुढे केले आणि घोडे देऊन टाकले तो आत येण्याच्या दारात दिसत नाही. बाघाखेरीज कोटडा हे परित्यक्ता स्त्रीसारखे आहे.

उच्च स्वरात मी त्याच्यासाठी शोक करू की वेडयासारखा स्वतःशीच हसत बसू ? चितेवर माझे शरीर भस्म होईल तेव्हाच काय ते त्याला विसरणे मला शक्य होईल राजमार्गावर मी एक झोपडे बांधीन आणि येणाऱ्या-जाणाऱ्या प्रत्येकाकडे चौकशी करीन, म्हणजे कोणी तरी कधी तरी भेटेल आणि मला माझ्या गत मित्रा विषयी बाघाविषयी सांगेल.

फुले कोमेजतील; पण बाघाच्या कीर्तीचा सुवास मात्र सदैव दरवळत राहील. '

वीठू मेहाने १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात काव्यरचना केली. जोधपूरच्या राव मालदेवाने त्याला खेडी गाव इनाम दिले होते. वीठू मेहाची काव्यसंपदा पुढीलप्रमाणे आहे · (१) गोगाजी रा रसावला (२) पाबूजी रा छंद (३) भाटी सोमसी रतनावत रो छद (४) करणजी रा छद (५) कवित्त चौहान करमसी आणि साँवलदास (६) कूम्पा मेहराजोतवरील पदे (७) चाँदाजी री वेल.

कवीने शूरवीराच्या कार्याचे व गौरवाचे वर्णन केले आहे. गोगाजी, पाबूजी आणि भाटो सोमसी यानी गोरक्षणार्थ प्राण दिले. लोकदेवतांचे पद लाभलेल्या गोगाजी, पाबूजी आणि करणीजी याच्यावरील काव्यरचना याच कालखंडात निर्माण झाली हे लक्षणीय होय. गोगाजी री पेडीमध्ये आसाजीने घेतलेल्या गोगाजी या विषयावरच वीठू मेहीनेही काव्य लिहिले आणि त्याचा एक समकालीन कवी बारहट नादण यानेही चहुवान गोगाजी रा छंद (एकूण ५७ पदे) लिहिले

राजपूत वीर नेहमी मानाने जगतो आणि त्याहीपेक्षा अधिक मानानेच मरण्याची त्याचीइच्छा असते. मेवाडच्या सैन्याच्या हल्ल्याला तोंड देताना डूंगरपूरचा वीर करमसी चौहान म्हणतो :

' मृत्यूच्या भीतीने पाण्यात आश्रय घेणाऱ्या कौरवाचा राजा दुर्योधन कुठे उभा आहे ? प्राण रक्षणार्थ सूर्य किरणाच्या मागे लपणाऱ्या रावणाचा प्रताप कोठे आहे ? दीर्घायु लाभण्यासाठी कावळयाचे मास खाणारा विक्रमादित्य कोठे आहे ? आणि कोठे आहे जीव बचावण्यासाठी रणांगण सोडून गंगेत उडी घेणारा

कनौजचा राजा जयचंद ? अशा प्रसंगी आपले प्राण वाचवायचा प्रयत्न करणाऱ्या राजांना कायमचा कलंक लागला हे लक्षात घ्या. म्हणून आम्ही आमचा मृत्यू गौरवशालीच करणार आहोत.

वीरदास रोहडियो उर्फ रंगरेलो वीठू (सुमारे १५२० – १६०८) याची उपरोधिक पदे चारण काव्यातील एक नवे दालन उघडतात त्याच्या जैसलमेर रो जस काव्याची उपलब्ध असलेली काही पदे आणि अशीच इतर पदे पाहण्यासारखी आहेत. एका पदात म्हटले आहे :

'राणी अवजड प्राण्यासारखी आहे तलावावरून पाणी आणताना तिला कुणाचीही सोबत नसते. राज्यात (जेसलमेर) कोठेही मोर नसल्याचे सहज दिसण्यासारखे आहे (पण) 'जरख' 'सेह' आणि 'गोह' हे प्राणी मात्र भरपूर आहेत '

या उलट गोढवाडच्या समृद्धीचे असे वर्णन केलेले आहे :

'प्रदेश जर बहरलेल्या दाट आमरायानी भरलेला असेल, नद्या गोड पाण्याने दुथडी भरून वाहत असतील, कोकिळा मधुर स्वराने आगताचे स्वागत करत असतील तर हे प्रवाशा, तू गोढवाडच्या भूमीवर पाय ठेवलेला आहेस, असे समज '

सिरोहीच्या राव सरताणचा आवडता कवी दूदो आसियो अमरावत (१५२८–३३ ते १६१३) आणि बारहट इसरदास (१५३८–१६१८) हे दोन उल्लेखनीय कवी होत अन्य कवी बहुधा युद्ध व त्याच्याशी निगडित घटनांवर भर देतात, पण हे दोघे मात्र तसे न करता शौर्यावर भर देतात. त्यांनी केलेले वीरांचे व्यक्तिचित्रण स्वाभाविक व प्रामाणिक आहे. दोघांनी अन्योक्ती शैलीचा उपयोग केला आहे. काव्ये निवेदनात्मक नाहीत. विषय फक्त पार्श्वभूमीदाखल आहे.

सिवाणाचा कल्ला रायमलोत १५८८ मध्ये मोगल सैन्याशी झालेल्या युद्धात मारला गेला होता. त्याच्यावर दूदो आसियोने कुंडलिया छदात २१ पदे लिहिली

बारहट इसरदास विरचित हाला झाला रा कुंडलिया (एकूण ५० पदे) मध्ये हळवडचा झाला रायसिंह आणि धरोलचा हाला जसाजी यांच्यातील युद्धाचे वर्णन आहे काव्याच्या खालील उदाहरणावरून शौर्यावर कशा प्रकारे भर दिला आहे ते स्पष्टपणे दिसून येईल.

हरणाची शिंगे लांबलचक असली तरी तो लढाईपासून दूर पळतो वराह मात्र त्याच्या लहान सुळ्यानी शत्रूला जखमी करतो व त्याचे प्राण घेतो. राजा जसवतसिंह हा वराहासारखा आहे तो एकट्याने युद्ध करीत वैरी टोळ्याना ठेचून काढतो. तो एकटा पाचशे घोडेस्वाराशी लढतो. तो स्वतःबरोबर वराहाप्रमाणे झगडणाऱ्या सैनिकाना बाळगतो, हरणाप्रमाणे पळ काढणाऱ्याना नव्हे.

या दोन्ही कवीनी समकालीन वीरावर लिहिलेली सुटक पदेही उपलब्ध आहेत

इसरदासच्या भक्तिकाव्याचा इतरत्र विचार केलेला आहे. नुकतेच एक मत पुढे आले आहे की, बारहट इसरदासाच्या ५० कुडलियापैकी २४ त्याच्या चुलत्याने बारहट आमाने लिहिलेल्या आहेत. सर्व उपलब्ध हस्तलिखित साहित्य बारकाईने तपासून पाहता हे मत ग्राह्य वाटत नाही

अनेक समकालीन राज्यकर्त्यांनी, तसेच बीकानेरचा राजा रायसिंह, जोधपुरचा मोठा राजा उदयसिंह व त्याचा मुलगा सूरसिंह यांनीही सांडू माला अदावत (सुमारे १५३३–१६२३) याला अनेक देणग्या व इनामे दिली. ह्या झूलणा वृत्ताचा कवी समजला जातो. त्याची काव्ये आहेत : (१) झूलणा महाराज रायसिंघजी रा (२९८ ओळी), (२) झूलणा अकबर पातसाहजी रा (अकबराच्या गुजरातमधील विजयाचे १०८ ओळींतील वर्णन), (३) झूलणा दीवान श्री प्रतापसिंघजी रा प्रामुख्याने हल्दीघाटीच्या युद्धाचे ३०२ ओळींमध्ये वर्णन करणारे), (४) झूलणा अचल तिलोकदास रा (अपूर्ण, १९८ ओळी), आणि (५) स्फूट रचना–६७ गीते, नीसाणी आणि कवित्त ३.– समकालीन व पूर्वीच्या विभिन्न वीरांवरील.

वीरांचे गुण, त्यांचे पराक्रम व महत्कृत्ये यांचे ओघवत्या भाषेत वर्णन केलेले आहे. झूलणा हे निवेदनात्मक काव्य असून त्यात वर्तमानाचे वर्णन असते. तसेच भविष्याविषयीचे भविष्यकथन असते बरेच वेळा कवीने उपमा देण्यासाठी ऐतिहासिक घटनाचा उपयोग केलेला आहे. यापूर्वी अन्य कुठल्याही कवीने तसे केलेले नाही. ही दोन उदाहरणे पहा :

'रायसिंहाने आजूबाजूचा सर्व प्रदेश व किल्ला हस्तगत केला, जसा पूर्वी राव चूंडाने केला होता.' (झूलणा महाराज रायसिंघजी रा)

'राणा प्रतापने हिंदूचा गत गौरव पुन्हा भरून काढला, सूर्य जसा रात्रीनंतर पुन्हा प्रकाश उजळतो' (झूलणा दीवान श्री प्रतापसिंहजी रा)

सादू मालापेक्षा दुरसा आढा (१५३८ – १६५१) अधिक प्रसिद्ध होता. त्याच्या काव्यासाठी त्याला कित्येक समकालीन राजे व सरदारांकडून देणग्या मिळाल्या होत्या. त्याचे ग्रंथकर्तृत्व पुढीलप्रमाणे आहे : (१) विरुद छिहत्तरी (राणा प्रतापवरील दोहे), (२) दूहा सोलंकी वीरमदेवजी रा, (३) झूलणा राव सुरताण रा, (४) मरसिया राव सुरताण रा, (५) झूलणा राजा मानसिंघ कछवाहा रा, (६) झूलणा रावत मेघा रा, (७) गीत राजि श्री रोहितासजी रो, (८) झूलणा राव अमरसिंघ गजसिंघोत रा, (९) किरतार बावजी आणि विविध वृत्तामधील स्फूट रचना, जसे कवित्त, नीसाणी आणि राणाप्रताप, देवीदास जैतावत, हाथी गोपालदासोत, नवाब मोहब्बत खान, तोग सुरताणोत, भाटी भीम, भीम अमरसिंघोत, राव सुरताण इ. वरील दोहे, तसेच विभिन्न समकालीन वीर व प्रसंगावरील सुमारे १२० डिंगल गीते.

विरुद छिहत्तरीतील सर्व दोह्यामध्ये राणा प्रतापच्या गुणाची प्रशसा केलेली आहे; पण आढा दुरसाच्या नावावर असलेल्या दोह्यापैकी कित्येक दोहे त्याने रचलेले नसावेत असे वाटते कारण त्यात ऐतिहासिक क्रमबद्धतेचा अभाव आढळतो, तसेच जे शब्द नतरच्या चारण काव्याचे समजले जातात ते येथे वापरल्याचे दिसते, जसे, 'आरज कुल', 'आरज भाण', 'भारत वर्ष', इत्यादी.

सोलकी वीरमदेववरील दोह्याप्रमाणे कवीने सुमारे ३०–३५ दोहे रचले असावेत आणि बाकीचे दोहे व नावांचा नंतर त्यात प्रक्षेप झाला असावा असे वाटते

किरतार बावनी वगळता बाकीच्या सर्व काव्यामध्ये वीराचे गुण, पराक्रम व महत्कार्याचे वर्णन केलेले आहे

एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याने परस्परविरुद्ध असलेल्या व्यक्तींची प्रशंसा केलेली आहे, जसे, राणा प्रताप आणि अकबर, राव सुरताण आणि जगमाल उदयसिंघोत, रायसिंह आणि चद्रसेन, वीरमदेव आणि मोहब्बतखान इ. अशी काव्ये व्यक्तींचा व त्याच्या गुणाचा आदर्श पुढे ठेवतात, त्याच्या मतप्रणालीचा नव्हे. दुर्दैवाने हे चारण वैशिष्ट्य असून दुरसाजी देखील त्याला अपवाद नव्हता असे असले तरी, सर्वसामान्य वीर आणि इतरावरील काव्यांमध्ये किंचित फरक आढळतो. हिंदु धर्माच्या व हिंदुस्थानाच्या रक्षणासाठी ज्यांनी मुगलाचा प्रतिकार केला, त्याना कवी वदन करतो. हा मान तो इतरांना देत नाही. सिरोहीच्या राव सुरताणाविषयी तो म्हणतो :

'चागले आणि वाईट समजणे, योग्य आणि अयोग्य यामधील फरक ओळखणे, हिंदु धर्माची वृद्धी करणे आणि कवीचे मन जाणणे हे तुमचे उपजत गुण आहेत.'

त्याची काव्ये वैयक्तिक गुणांचे वर्णन करतात; पण एकजूट होऊन शत्रूशी मुकाबला करण्यासाठी कोणताही संदेश देत नाहीत तो राज्यकर्त्यांना न्याय्य राहण्याची आठवण करून देतो :

'अन्याय्य लढायासाठी घोडे दौडवू नका, जग तुम्हाला हसेल. भविष्यकाळात वारा कोणत्या दिशेला वाहणार आहे ते कुणालाही ठाऊक नसते. पण न्याय करण्यासाठी ईश्वर असल्याचे सर्वांना कळू द्या. अन्यायाचा पराभव झाल्याचे आणि न्यायाचा विजय झाल्याचे तो ईश्वरच पाहील.' (झूलणा राव सुरताणा रा).

सादू मालाप्रमाणे दुरसाजी देखील रणांगणाचे व वीराच्या शौर्याचे हुबेहूब वर्णन करतो. असे करताना एखादी गोष्ट अधिक विशद करण्यासाठी रामायण, महाभारत व राजपूत इतिहासातील उपमा त्याने गुफलेल्या आहेत आग्र्यात सलाबत खानला मारल्यानतर नागोरच्या राव अमरसिंहचा जो गाडाग्र झाला त्याचे पुढीलप्रमाणे वर्णन केलेले आहे

'देव आणि दानव एकमेकांना अंतरिक्षात फेकीत लढत असल्यासारखे वाटत होते. भीमाने दुर्योधनाच्या सैन्यातील हत्ती गरगरा फिरवीत फेकावेत, जणू राक्षसाच्या क्रोधाची तमा न बाळगता हनुमानाने 'अशोक वाटिका' उद्ध्वस्त करावी, हनुमानाने रावणाच्या लंकेला आग लावावी, तद्वत राव अमरसिंहाने दिल्लीच्या टोळधाशी अखेरच्या क्षणापर्यंत युद्ध केले आणि अखेरीस तो पडला. जणू लंकेची महाद्वारे त्याने जमीनदोस्त केली.

वीररसात्मक व ऐतिहासिक चारण काव्याची सर्व वैशिष्ट्ये दुरसाजीच्या काव्यात अभिव्यक्त झालेली आहेत. त्याचे 'झूलणा अमरसिंघजी रा' हे निवेदनात्मक काव्य असून या शैलीचे सर्वोत्कृष्ट काव्य होय.

किरतार बावनीमध्ये जीवनाची काळी बाजू दर्शवलेली आहे. कवीने कित्येक उदाहरणे देऊन जीवनाविषयीचा वास्तववादी दृष्टिकोण मांडला आहे– 'व्यापारी सुंदर, तरुण पत्नीला मागे सोडून परदेशी जातो, सैनिक प्राण पणाला लावतो, 'तळपत्या उन्हात गरीब माणूस रानात लाकूड गोळा करतो'— हे सर्व कशासाठी तर पोटासाठी.'

किरतार बावनीच्या लेखकाविषयी मात्र शंका वाटते

दुरसाजी हा त्याच्या डिंगल गीतामुळे अधिक लोकप्रिय झाला.

१५४३–१५६३च्या सुमारास काव्य रचना करणाऱ्या आसिया करमसी खीवसरोत याला त्याच्या काव्यासाठी मेवाडच्या राणा उदयसिंहाकडून पसूंदा गाव देणगीदाखल मिळाले होते. त्याची काव्ये आहेत ' भरसिया राव रार्यासिंघ सिरोही रा, सूजा बालेचा रा कवित्त (६१) आणि काही मेवाड डिंगल गीते.

'सूजा बालेचा रा कवित्त' हे एक निवेदनात्मक लहानसे काव्य आहे. सूजा बालेचा हा सामंतसिंहचा मुलगा तो तितकासा प्रसिद्ध नाही. तीन युद्धात त्याने जो पराक्रम गाजवला त्याच्या वर्णनामुळे प्रस्तुत काव्य महत्त्वाचे आहे. राणा उदयसिंह आणि जोधपुरचा राव मालदेव याच्यासाठी तो लढला आणि १५५६ मध्ये हरमाडाच्या युद्धात मारला गेला. एक कवित्त असे आहे :

' स्वतःची भूमी जिंकून घेतल्यावर सिंहासनावर बसलेला सूजा असा भासत होता—जणू सिंहाने नैसर्गिक सोनेरी चिलखत घातले असावे किंवा 'मणिधर' सापाला पंख फुटले असावेत किंवा अग्नीत तूप ओतले असावे किंवा सहस्त्रकिरणे पसरीत सूर्य सागरातून उदित होत असावा किंवा विष्णूकडून वर मिळवलेला वीर हनुमानच बसलेला असावा.'

१६ व्या शतकाच्या उत्तरार्धाचे व १७ व्या शतकाच्या पूर्वार्धाचे आणखी काही उल्लेखनीय कवी म्हणजे उदयसिंघ री बेलीचा रचनाकार सादू रामा

धरमसियोत, देवीदास जैतावत री वेलीचा रचयिता बारहट अखो भाणोत, सानढायच पूना आणि जाडा मेहडू पूना आणि जाडा यांनी निवेदनात्मक काव्ये लिहिली. पूताने १५७४ मध्ये झालेल्या कालिंद्री (सिरोही) च्या युद्धाचे ७६ पदा-मध्ये वर्णन केले जाडाने सादूल परमार रो छंद (११२) मध्ये रावत मालदेवचा मुलगा सादूल परमार याच्या मर्दुमकीचे वर्णन केले तत्कालीन परंपरेनुसार या सर्व कवींनी समकालीन वीर आणि विविध प्रसंगावर स्फुट पदे व डिंगल गीते-देखील लिहिली.

या कालखंडातील आणखी एक उल्लेखनीय काव्य म्हणजे राठौड रतनसिंह री वेलि हे ७२ पदाचे काव्य होय. हे बहुधा दूदो विसराल याने रचले असावे. जैतारणच्या रतनसिंहाचे, शाद कुलिखानच्या सेनापत्याखालील मुगल सैन्याशी १५५७ मध्ये युद्ध झाले. त्या युद्धाचे यात वर्णन आहे. युद्धानंतर काही कालाने हे हे काव्य रचले असावे या काव्याची एक लक्षणीय गोष्ट म्हणजे युद्ध व लग्न यांचे रूपक सबंध काव्यात मांडलेले आहे. शत्रू सैन्य ही तरुण 'विष-कन्या' नवरी असून, रतनसिंह हा नवरदेव आहे त्याच्या विवाह आणि दांपत्यसहवासाचे रूपक कायम चालू ठेवून वर्णन केलेले आहे. यात वीर-शृंगार आणि वीर-बीभत्स रसाचा सयोगही आहे. एका पदात म्हटले आहे :

'युद्धात वीराचे मरण लाभल्यावर रतनसिंह स्वर्गात राज्य करीत आहे तो आता देवासह आहे– इतके सांगून व आशीर्वाद देऊन मासभक्षक पक्षी ऊर्ध्व दिशेला उडून गेले' (लग्नात ब्राह्मण, चारण इ. ना जेवू घालतात आणि ते हात वर उचावून आशीर्वाद देतात.)

१७ व्या शतकाच्या प्रारभीचा विशेष प्रख्यात कवी म्हणजे केसोदास गाडण होय. त्याचा लेखन काल १५८३ ते १६४४ च्या दरम्यानचा धरता येईल जोधपुरचा राजा सूरसिंहाने १५९६मध्ये चिंडियो गाव दान दिलेल्या सदमल दूदावतचा तो मुलगा होता केसोदास हा जोधपुरच्या महाराज गजसिंहाच्या मर्जीतला होता. त्यानी त्याला १६२६ मध्ये सोसडावास (सोजन) गाव इनाम दिले होते. नीसाणी विवेक वार या भक्तिपर काव्यामुळे मुख्यतः तो लोकप्रिय झाला होता. या काव्याचा आणि त्याच्या अन्य काव्यांचा– छंद महादेवजीरो (किंवा शकर छंद) आणि छद श्री गोरखनाथ याचा अन्यत्र विचार केलेला आहे. त्याच्या गज गुण रूपक बंध, राव अमरसिंघजी रा दूहा आणि विविध समकालीन व्यक्तीवरील स्फुट कविता, दोहा व गीत यांची येथे दखल घेऊ या.

गज गुण रूपक बध हे १६२५मध्ये लिहिलेले निवेदनात्मक काव्य आहे. त्यात १३०१ पदे असून ४५ वेगवेगळी वृत्ते आहेत. मुगल सैन्याचा सेनापती म्हणून जोधपुरच्या महाराजा गजसिंहाने १६२४ मध्ये बडखोर राजपुत्र खुर्रमच्या सैन्याचा

सेनापती भीम सीसोदिया याच्याशी हाशीपुर (पतना जवळ) येथे युद्ध केले, त्याचे प्रस्तुत काव्यात वर्णन आहे

महाराजाने विजय मिळवलेल्या हाशीपुरच्या युद्धाचे तपशीलवार वर्णन केलेले आढळते. युद्धाची तयारी, सैन्य, निरनिराळ्या छावण्यातील फौजा हलवून त्या एकत्र जमविणे, कार्यरत करणे, सैन्याच्या तुकड्या, सैन्यदल, रणनीती, सैन्याने पुढे कूच करणे, युद्धपिपासू सैनिकाची अवस्था, संग्राम आणि समरणांगणावरील रक्ताळलेली दृश्ये या सर्वांचे जोमदार वर्णन केलेले आहे. युद्धाच्या ठळठळीत वर्णनामुळे काव्य लक्षणीय झाले आहे. भाषा व शब्दयोजना सांस्कृतिक दृष्टचा महत्त्वपूर्ण आहे नाथ जोगीच्या समेलनाशी सैन्याचे केलेले रूपकात्मक वर्णन आणि हठयोगाच्या शब्दाचा वापर हे नाविन्यपूर्ण आहे. बाकीची सर्व काव्ये व्यक्तींची प्रशस्तिवाचक आहेत

बारहट शंकर (१५४३ – १६२३) व त्याची पत्नी, पदमा सांदू, दल्ला आसिया (१५५३ – १६४३) व त्याची पत्नी, देपाँ, सिंढायच गैंपो 'टुकारो', बारहट लक्खा आणि त्याचा मुलगा बारहट नरहरिदास (१५९१ – १६७६) हे या कालखंडातील अन्य उल्लेखनीय लेखक होत. नरहरिदासच्या अवतार चरित्र या पिंगल व ब्रजमध्ये असलेल्या निवेदनात्मक काव्याचे अध्ययन चारणामध्ये अत्यावश्यक समजले जात असे

रुपावास (जोधपुर) गावचा बारहट अजन हा बारहट नरहरिदासचा समकालीन होता. त्याची कवित्त सोलंकी जीवराजजी रा ही पदे ऐकून रूपनगर (किशनगढ) च्या ठाकुर जीवराजच्या विधवा बायका ठाकुराच्या मृत्युनतर सहा महिन्यांनी सती गेल्या. मेवाडचा जहागीरदार राठोड मोहकमसिंहला दूषणे देणारी पदेही त्याने लिहिली आहेत.

चतरा मोतीसर (१५९३ – १६७८), जोगीदास कुँआरिया (१६१३–१६८८), चारण भूधरदास पाल्हावत, कल्याणदास मेहडू जाडावत, गाडण चोलो मेहावत उर्फ चौथजी, हेन सामौर आणि आढा किसना (मृत्यू १६४७), दुरसा आढाचा मुलगा, (१७ व्या शतकाच्या पूर्वार्धातील हे सर्व कवी) यांनी बहुतेक समकालीन शूर वीर आणि विविध प्रसंगावर काव्ये लिहिली.

भूधरदासाच्या शेखावतों राजावतों की वारमध्ये अमरसर (शेखावाटी) च्या राव अमरदास आणि आमेरचा राजा पहिला मानसिंह यांच्यातील संग्रामाचे वर्णन आहे कल्याणदासच्या राव रतन री वेलिमध्ये वाराणसीजवळच्या चारणाद्री येथे झालेल्या युद्धाचे वर्णन आहे राजपुत्र खुर्रमच्या बंडाचा बीमोड करण्यासाठी शहनशाह जहाँगीरच्या वतीने बूंदीच्या राव रतनने हे युद्ध केले होते. पावसाचे रूपक घेऊन केलेले युद्धाचे वर्णन थक्क करून टाकणारे आहे चोलोचे सूरसिंघर्जा

री वेलि हे बीकानेरच्या महाराज सूरसिंहाची प्रशस्ती करणारे आहे. हे सामौरच्या गुण भारवा चरित्रमध्ये भीम सीसोदिया विरुद्ध हाझीपूर (पतना) येथे जोधपुरच्या महाराजा गजसिंहाने केलेल्या युद्धाचे व त्याच्या विजयाचे वर्णन आहे. त्याने हेमी नाम माला नावाचा शब्दकोश पद्यामध्ये लिहिला असे मानतात, पण तो उपलब्ध नाही. खालील काव्ये पहिल्या आढा किसनाच्या नावावर आहेत

नीसाणी महेस दलपतोत री, नीसाणी रतन महेसदासौत री, नीसाणी साहजहाँ पातिसाह री, राणा जगतसिंध री वेलि, भाखडी महाराजा गजसिंघ री, गज रूपक, झूलणा महाराव राजसिंघ सिरोही आणि काही समकालीन वीरांवरील स्फुट डिंगल गीते.

यापैकी, झूलणा महाराव राजसिंघ सिरोही आणि काही गीते फक्त उपलब्ध आहेत.

राव बाघजी लाखनौतचा मुलगा महेसदास राव याने १७ व्या शतकाच्या उत्तरार्धात साहित्य रचना केली. शाहजहानचा एक विश्वासू अधिकारी अर्जुन गौडची त्याच्यावर मर्जी होती त्याचे उपलब्ध साहित्य पुढीलप्रमाणे आहे :

राव अमरसिंघ नागौर का साका (३४ पदे), बिन्है रासौ, राणा राजसिंघ का गुण रूपक (५८ पदे), गौडाँ की वंशावली, राजा जयसिंघ के छप्पय, रघुनाथ चरित नव रास वेलि, आणि काही समकालीन वीरावरील डिंगल गीते.

वेलि या पौराणिक काव्याचा अन्यत्र विचार केलेला आहे. बाकी सर्व काव्ये शूरवीर व त्याच्या पराक्रमावरील आहेत. बिन्है रासौ हे निवेदनात्मक काव्य सर्व काव्यामध्ये सर्वोत्कृष्ट होय. शाहजहानच्या तीन बडखोर मुलानी— मुराद, औरंगजेब आणि शाह मुराद यानी शाही फौजाविरुद्ध धरमाट (उज्जैन), धौलपूर (शामूगढ) आणि बनारस ( बहादुरपूर ) येथे केलेल्या युद्धाचे चित्रमय वर्णन यात केलेले असून, त्यात गौड वीरानी जी मर्दुमकी गाजवली त्यावर विशेष भर दिलेला आहे बिन्है रासौमध्ये दिलेल्या गौड वीरांच्या तपशीलवार माहितीचा त्याने वंशावलीमध्येही बरेच वेळा उल्लेख केला आहे. युद्ध, योद्धे व तत्संबधित घटनाचे जोमदार पद्धतीत बारकाव्याने वर्णन केले आहे शेखावाटीतील काही वीर आणि गौड, हाडा व कछवाहा वंशातील इतर वीर हे इतिहासात नवीनच आहेत. अशा प्रकारच्या अन्य काव्यांप्रमाणेच यातही मृत्यू हा उत्सवाचा व युद्धाचा प्रसंग असून, वीरांच्या मोक्षप्राप्तीचे ते साधन आहे. 'वचनिका' व 'दवावाइत' याच्या गद्य भागाखेरीज एकूण एकोणतीस वृत्ताचा वापर केलेला आहे गज गुण रूपक बध प्रमाणे येथेही वीराची गोरखशी आणि सैन्याची जोगींच्या समुदायाशी तुलना केलेली आहे.

गिरधर आसिया (१६३३–१७१८) चे सगत रासौ हे ९४३ पदांचे प्रदीर्घ निवेदनात्मक काव्य आहे. शक्तिसिंह (राणा प्रतापचा धाकटा बंधू), त्याचा पुत्र अचलसिंह आणि नातू नरहरी यांच्या शौर्याची प्रशंसा करणारे ते एकमेव काव्य आहे. या काव्यानुसार, वडील नाखूष झाल्याने शक्तिसिंह मुगलांस जाऊन मिळाला. अकबराने त्यास चित्तोडचा राजा होण्यास सुचवले, पण त्याने ते मान्य केले नाही. अकबराचे आक्रमण अगदी जवळ येऊन ठेपल्याची सूचना आपल्या लोकांना देण्यासाठी तो चित्तोडला आला होता पण त्याला किल्ल्यात येऊ दिले नाही खमनौर (हल्दीघाटी) च्या युद्धानंतर गोगूंडा राजवाड्यातील भिंतीवरील 'भाड' व 'विदूषकां'च्या नाचाची चित्रे पाहून मानसिंहाने उपहास केला तेव्हा शक्तिसिंह संतापला आणि भैंसरोडगढला निघून गेला अशा प्रकारे ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनेही ही अमूल्य वाङ्मयीन कृती आहे.

उदयपुर जवळील चिकलवास गावचा किसोरदास राव (भाट) हा दासोजीचा धाकटा मुलगा होता. महाराणा जगतसिंह (१६२७–१६५२) त्याचा आश्रयदाता होता त्याने १६५८–५९च्या सुमारास लिहिलेल्या 'राज प्रकाशा'त १३२ रूपके असून ३७७ पदे आहेत. महाराणा राजसिंहाने मालपुरावर केलेल्या हल्ल्याचे व लुटीचे आणि नंतर उदयपुर येथील त्याच्या स्वागताचे यात प्रामुख्याने वर्णन आहे, त्याच्या पूर्वजांची वंशावळ, उदयपुरचे भव्य सौंदर्य आणि वापरलेल्या चौदा वृत्तांची वैशिष्ट्ये यानेच काव्याचा दोन तृतीयांश भाग व्यापलेला आहे राणा प्रताप व मानसिंह, राणा अमरसिंह आणि जहांगीर आणि राजसिंहाचे मालपुरावरील आक्रमण याच्या वर्णनात पराकाष्ठेचे लालित्य आहे. कवीने प्रतापचे मानसिंहावरील आणि अमरसिंहाचे जहांगीरवरील विजयाचे वर्णन केले आहे.

राज प्रकाशाचे एक लक्षणीय वैशिष्ट्य म्हणजे एका 'रूपका'ची अखेरची ओळ किंवा त्याच्या एखाद्या भागाची पुनरावृत्ती नंतरच्या रूपकाच्या सुरवातीला केलेली आहे. सर्व रूपकांमध्ये हीच पद्धत पाळलेली आहे. अगदी क्वचित आढळणारी ही पद्धत आहे कवीने समरसिंहाचे वर्णन करताना पृथ्वीराज रासोचा संदर्भ देण्याची करामत केली आहे. रासौमध्ये ही पद्धत आढळते आणि या पद्धतीच्या अनुषंगाने असलेले पद मूळ पदाला जवळचे असल्याचे दिसते याचा अर्थ असा की, मध्ये आलेली वृत्ते ही नंतर त्यात घुसविण्यात आलेली आहेत. त्याचा लेखक चंद वरदायी हा जातीने भाट होता. ही पद्धत उचलण्याची प्रेरणा किसोरदासाला रासौवरून मिळाली असावी. हे जर खरे असेल तर, रासौच्या मजकुराचा अस्सलपणा सिद्ध करण्यासाठी आपल्याला निदान एक भक्कम पुरावा मिळतो.

खिडिया जग्गाचे वचनिका राठौड रतन सिंघजी महेसदासौत री (१६५८ च्या सुमारास रचित) हे एक कलापूर्ण निवेदनात्मक काव्य आहे बंडखोर राजपुत्र

औरंगजेब आणि मुराद यांच्या संयुक्त फौजा आणि जोधपूरच्या महाराजा जसवंतसिंहच्या नेतृत्वाखालील शाही फौजा याच्यातील युद्धाचे आणि सेनापतीच्या पलायनानंतरही युद्ध चालू ठेवणाऱ्या रतलामच्या रतनसिंहाच्या पाडावाचे यात वर्णन आहे सैन्य, व्यूहरचना, योद्धयांचा गर्व, त्यांची युद्धे व मृत्यू आणि राजपूत स्त्रियाचे सती जाणे या सर्वांचे कवीने तपशिलाने वर्णन केले आहे. तुलना, उपमा आणि लालित्यपूर्ण भाषा ही या काव्याची वैशिष्टये होत 'राठोड कौरवाप्रमाणे रणांगणात आले आणि राजपुत्र पाडवाप्रमाणे ! राठोडानी हरिनाम घेतले तर त्यांनी (औरगजेबाच्या मुसलमान सैन्याने) रहमान व अल्लाचे नाव घेतले' विरुद्ध ध्वनी असलेल्या शब्दांचा वापर जाणीवपूर्वक केलेला आहे.

आडण शिवदास याच्या अचलदास खीची री वचनिका, पहिल्या आढा किसनाचे गज रूपक, वीठू सूजोचे 'राव जैतसी रो' पाघडी छंद आणि जैतसी छंद (लेखक अज्ञात) या काव्यांवरून कवीला स्फूर्ती मिळाली व त्याच्या लेखनावर या काव्यांचा परिणाम झालेला आहे असे म्हणतात. हे काही अंशी खरे आहे. यावरून आणि अनेक वीरांशी सबधित, त्यापैकी सतराची नावे त्याने दिलेली आहेत. गायिल्या जाणाऱ्या पदांच्या उल्लेखावरून कवी बहुश्रुत विद्वान असल्याचे दिसून येते वचनिका ललित गद्याचा उत्कृष्ट नमुना आहे

जग्गाच्या भक्तिपर कवित्ताचा अन्यत्र विचार केलेला आहे

शाहजहानच्या मुलांनी गादीसाठी केलेल्या युद्धानी अनेक कवीचे लक्ष वेधून घेतल्याचे दिसते पहिला आढा किसना, महेसदास राव आणि जग्गा याच्या रचनांची दखल आपण घेतली आहेच. याखेरीज आणखी दोन कवी आहेत १६६३ च्या सुमारास रचलेल्या आपल्या काव्यामध्ये— दोहा वा नीसाणी (१७६ पंक्ती), आणि केसरसिंघजी रा, झूलणा, यामध्ये कविया लूणकरणने बीकानेरच्या महाराजा करणसिंहाच्या मुलाचे केसरसिंहाच्या पराक्रमाचे वर्णन केलेले आहे केसरसिंहाने चार लढाया केल्या— धरमाट, धौलपूर, अजमेर आणि चौथी, औरगजेबाचा विश्वासू योद्धा या नात्याने राजपुत्र सूजाविरुद्ध केलेली लढाई कवीने दिल्लीच्या राजाची कालक्रमानुसार माहिती दिलेली आहे, मग ते कोणत्याही वंशाचे असोत लेखक बहुधा फक्त एखाद्याच घराण्याची वंशावली देतात, तसे याने केलेले नाही.

दुसरा कवी आहे कुंभकरण सादू त्याने सुमारे १६६३ ते १७२३ च्या दरम्यान पुढील काव्यरचना केली. रतन रासौ, जयचंद रासौ, महाराजा रायसिंघजी रा सतियों रा कवित्त (३३) आणि समकालीन शूरवीर व प्रसगांवरील दोहा, गीत वगैरे स्फुट पदे, रतन रासौ मध्ये धरमाट युद्धाचे पिंगलमध्ये वर्णन केलेले आहे. जयचंद रासौ उपलब्ध नाही महाराजा रायसिंघजी रा सतियों रा कवित्त

मध्ये, नागौरचा राठोड राव रामसिंग १६७६ मध्ये शोलापुरजवळील मेड येथे मृत्यू पावल्यावर त्याच्या राण्या सती गेल्या त्याचे हृदयस्पर्शी वर्णन आहे.

गाडण वीरभाण ठाकरसीयोत आणि द्वारकादास दढवाडिया हे १७ व्या शतकाच्या उत्तरार्धाचे अन्य कवी होत. त्यांच्या रचना– कुंवर श्री अनूपसिंघजी री वेलि (१६६९ पूर्वीची) आणि अजितसिंघजी री दुवावैत (१७१५ मध्ये रचलेली). यांमध्ये त्यांच्या नायकाची प्रशस्ती केलेली आहे.

असे म्हणतात की, जोधपुरच्या महाराजा अभयसिंहाने गुजरातचा राज्यपाल सर बुलदखान याच्याविरुद्ध १७३० मध्ये अहमदाबाद येथे केलेल्या युद्धाचे वर्णन करण्यास आपल्या दरबारातील तीन राजकवी— रतनू वीरभाण भोजराजोत (१६८८–१७३५), कविया करणीदान विजयरामोत (१६९३–१७८३) आणि खिडिया बखता यांना, सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी अनुक्रमे राज रूपक, सूरज प्रकास आणि अहमदाबाद रा झगडा रा कवित्त (एकूण १६५) रचले.

'राज रूपक' आणि 'सूरज प्रकास' ही निवेदनात्मक दीर्घ काव्ये आहेत. रूपकाचे ४६ प्रकास (प्रकरणे) असून त्यात ३३१७ पदे आणि २५ वचनिका (लयबद्ध गद्य) आहेत कवीने म्हटल्याप्रमाणे, त्याच्या प्रकासमधील पदांची संख्या सात हजार पाचशे 'अनुष्टुभ' चरणाइतकी आहे 'रूपकमध्ये सेतराम ते महाराजा जसवंतसिंह पर्यंतची वंशावली थोडक्यात सांगून नंतर महाराजा अजितसिंह व अभयसिंह यांची तपशीलवार माहिती दिलेली आहे, पण प्रकासमध्ये मात्र पौराणिक व ऐतिहासिक आधारावर, रामायण कालापासून ते अजितसिंहापर्यंत राठोड घराण्याची माहिती देण्यात निम्मे काव्य खर्ची घातलेले आहे दोन्ही काव्ये मिळून राठोड घराण्याची, त्यातल्या त्यात अजितसिंह व अभयसिंह यांची बरीच उपयुक्त माहिती मिळते. दोघे राजकवी असल्याने त्यांनी अजीतसिंहाच्या लाजिरवाण्या मृत्यूसारख्या घटनांचा उल्लेख कटाक्षाने टाळला आहे. दोन्ही काव्ये वीररसात्मक असून शूरवीर व संग्रामाच्या वर्णनांनी परिपूर्ण आहेत. चारण काव्याच्या ऐतिहासिक व वीररसात्मक प्रकाराची सर्व वैशिष्ट्ये या काव्यांमध्ये आढळतात, जसे शूरवीरांची नामावली, मृत्यूनंतर त्यांना स्वर्गात कोठे स्थान मिळाले, स्वर्गातील अप्सरांशी त्यांची लग्ने, प्रामुख्याने 'वीर' रस, त्यात मधून-मधून शृंगार, बीभत्स, करुण आणि अद्‌भुत यांच्या छटा, इ रूपक हे त्यामानाने अधिक सोप्या भाषेत लिहिलेले आहे. रूपक आणि प्रकास दोन्हीही चारण शैलीची अभिजात काव्ये आहेत. त्यातही प्रकास हे काहीसे कोशाच्या स्वरूपाचे आहे.

रतनू वीरभाण यांच्या अन्य रचना आहेत—एकाक्षरी नाम माला (एकावयवी शब्दकोश), भागवत प्रकाश (या पुराणाच्या १० व्या सर्गावरील काव्य) आणि विभिन्न वीरांवरील तुरळक पदे.

सूरज प्रकाश व्यतिरिक्त करणीदानची अन्य प्रसिद्ध काव्ये आहेत—विडद सिंगार (१३८ पदे), महरी मजेज (१२८), जैन जवार किंवा जती रासौ आणि फुटकळ पदे, दोहे व गीते.

अभय भूषण आणि महाराणा सग्रामसिंह रा कवित्त हे देखील त्याने लिहिले असे म्हणतात पण ते उपलब्ध नाही.

विडद सिंगारमध्ये अहमदाबाद येथे अभयसिंह व सर बुलंदखान यांच्यात झालेल्या सग्रामाचे मोठ्या जोमदार शैलीत वर्णन केलेले आहे महरी मजेज हे शृंगार भावना व अनिबंध प्रेमावरील काव्य आहे 'जती रासौ' मध्ये काठियाडच्या जैन जतीच्या ढोंगीपणावर आघात केलेला आहे

सांदू पृथ्वीराज (१८ वे शतक) याचे 'अभैविलास' हे निवेदनात्मक काव्य नानाविध वृत्तांमध्ये लिहिलेले आहे, जसे, पद्धरी, कवित्त, दोहा, भुजगी, उधोर, सजुता, गाथा, त्रोटक, आर्धनाराज, नाराज, मोतीदाम, हणूफाल, इ यात मुख्यत: १७२४ ते १७४९च्या दरम्यान गादीवर असलेल्या जोधपुरच्या महाराजा अभयसिंहाच्या जीवनाचे व त्याने केलेल्या युद्धाचे वर्णन आहे. जयचंदापासून सुरवात करून वशावलीही दिलेली आहे. शिकार, वसत ऋतू, 'फाग' इत्यादींची सुरेख वर्णनेही केलेली आहेत. कवी महाराजाच्या समकालीन होता खुमासदार भाषेमुळे काव्य परिणामकारक झालेले आहे अभयसिंह व त्याच्या वेळच्या माहितीमुळे काव्य महत्त्वपूर्ण आहे ठळक घटनाच्या काव्यात दिलेल्या तारखांमुळे ते ऐतिहासिक माहितीचे साधन ठरले आहे

कविया करणीदान व अन्य काही कवींप्रमाणे सादू पृथ्वीराज देखील, धरमाट (उज्जैन)च्या निर्णायक लढाईतून महाराजा जसवतसिंहाने पळ काढला होता या वस्तुस्थितीकडे डोळेझाक करतो राठोड राव रतन महेसदासौत समरागणी पडल्याचे वर्णन ऐकल्यावर कवी सक्षेपात प्रसंगाचे वर्णन करीत इतकेच फक्त म्हणतो .

' राजा (जसवंतसिंह) जोधपूरच्या किल्ल्यात परतला आणि औरंगजेब उरलेल्या सर्वांसह दिल्लीला पोहोचला खऱ्या वारसाला दाराला जीव बचावण्यासाठी पळ काढावा लागला आणि दिल्लीचे राज्य नियतीने औरगजेबाला दिले '

दुर्दैवाने काव्याचे उपलब्ध हस्तलिखित अपूर्ण आहे. काव्याच्या नामकालपूर्वक परिसमाप्तीवरून असे वाटते की कदाचित कवीच हे काव्य पूर्ण करू शकला नसावा.

जोगीदासने (१७१२ च्या सुमारास) वरसलपूर गढ विजय किंवा सुजान रासौ लिहिला. बीकानेरच्या महाराजा सुजानसिंहाने (१७००–१७४६) वरसलपुरच्या

भाटींवर केलेल्या आक्रमणाचे यात वर्णन आहे या आक्रमणाचा अन्यत्र कोठेही उल्लेख सापडत नाही. त्यामुळे ऐतिहासिक दृष्टया हे काव्य महत्त्वाचे आहे.

राधा कृष्णजी रा दूहा आणि वैद्यकसार ही जोगीदासाची अन्य काव्ये होत.

माधव यस प्रकास (१७११–१७१४ च्या सुमारास रचलेले) यात कवी मानसिंह आसियाने १७११ च्या बाधनवाडाच्या युद्धाचे वर्णन केले आहे. त्यात कानोड (मेवाड)च्या रावत माधवसिंहाने शाही फौजांचा सेनापती रंबाझखान मेवातीशी युद्ध करून त्यास ठार केले होते.

पत्ताजी आसियाच्या सुरताण गुण वर्णन (१७१५)मध्ये बेदला (मेवाड)च्या रावत चौहान सुरताणसिंहाच्या कामगिरीचे वर्णन आहे.

मारवाडमधील घडोइ गावच्या हम्मीरदान रतनू (१८ व्या शतकाचा पूर्वार्ध) याला पहिला महारावल देसलजी (१७१७–१७५१) आणि त्याचा मुलगा कच्छचा लखपत याचा आश्रय होता. त्याची प्रतिभा बहुमुखी असल्याचे समजतात. त्याने सुमारे १७५ ग्रंथ लिहिले. त्यात शब्दकोश व छंदःशास्त्रावरील ग्रथांचाही समावेश आहे. त्याने रचलेले 'देसलजी री वचनिका' हे वीररसाचे निवेदनात्मक काव्य आहे. त्यात देसलजी आणि गुजरातचा राज्यपाल सर बुलंदखान याच्यात १७२८ मध्ये झालेल्या लढाईचे वर्णन आहे कवीने अन्य वचनिकाप्रमाणे लयबद्ध गद्याचा येथे वापर केलेला नाही हम्मीरदान रतनूच्य बहुतेक रचना हस्तलिखिताच्या स्वरूपात असून सहजासहजी मिळत नाहीत.

१७१८ ते १७४८च्या दरम्यान लेखन करणारे पुरोहित आसकरण आणि पुरोहित सोभाचंद हे डिंगलगीत व स्फुट पदासाठी प्रसिद्ध आहेत. ऐतिहासिकदृष्टया ते महत्त्वाचे आहेत

आढा पहाड खानने १७२३ ते १७५४च्या दरम्यान लेखन केले. त्याचे गोगादे रूपक हे बादर ढाढीच्या वीरमायणमध्ये सांगितलेल्या राठोड-जोहिया प्रकरणावरील आणखी एक महत्त्वाचे निवेदनात्मक काव्य आहे. यातही वाचकांची सहानुभूती अखेरपर्यंत जोहिया दल्लाशीच राहते.

गुणमाल शाह देव करण री (१७३३) हे राव वेणा आणि गुण शिवचरित प्रकास (१७४४) हे नाथाने लिहिले आहे. यांपैकी पहिल्यात शाह देव करण (द्वितीय महाराणा संग्रामसिंह (१७१०–१७३३)च्या कारकिर्दीत मेवाडचा मंत्री असलेला) याच्या कार्याचे वर्णन आहे. दुसऱ्यात सीकरच्या राव शिवसिंह (१७२१–१७४८) याने फतेहपुर (शेखावाटी) आणि गगराणा (अजमेरजवळ) येथे केलेल्या दोन लढायांचे वर्णन आहे.

बीकानेरच्या महाराजा गजसिंह (१७४६–१७८७) च्या जीवनाने अनेक कवींचे लक्ष वेधून घेतले, विशेषतः गाडण गोपीनाथ, सिंढायच फतेह राम आणि

आसिया दाना याचे त्यांनी अनुक्रमे 'ग्रथराज', 'महाराजा गजाहि रो रूपक' आणि विरुद प्रकास लिहिले.

ग्रथराज हे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धातील वीररसात्मक काव्य आहे. गाडणचे पारपरिक चारण काव्याचे सखोल ज्ञान, भाषाप्रभुत्व आणि छदातील नैपुण्य हे या कालखडातील अन्य कवीमध्ये क्वचितच दिसून येते.

सगता सादू (१८ व्या शतकाचा उत्तरार्ध) चे 'इंद्रसिह रूपक' हे ५९७ पदाचे निवेदनात्मक काव्य आहे. त्याला खैरवाच्या ठाकूर इद्रसिह जोधाचा आश्रय होता. त्यात ठाकूर व त्याच्या पूर्वजानी, जोधपूर सैन्याचे विश्वासू योद्धे म्हणून केलेल्या लढायाचे (१७३० मधील अहमदाबादच्या विख्यात लढाईसह) वर्णन आहे

महाराजा श्री शिवसिंधजी रा कवित्त (एकूण सख्या १९२, रचनाकाल—१७९० पूर्वी कधीतरी) यात इडरचा राज्यकर्ता राठोड शिवसिंह याच्या व त्याच्या स्वामिभक्त सैनिकांच्या पराक्रमाचे, गुणाचे व महत्कार्याचे वर्णन आहे. त्याच्या पूर्वजाची, मारवाडच्या राव सीहोजीपासून पुढची वंशावलीदेखील दिलेली आहे. ऐतिहासिक दृष्टया अतिशय महत्त्व असलेले ते एक प्रभावशाली काव्य आहे. महाराजा अजितसिंहाची पाच मुले म्हणतात :

' चारणाची ईश्वरावर भक्ती असेल तरच त्याच्या जीवनाला अर्थ आहे, राजा जर स्वागताला उभा राहिला तर भाटाच्या जीवनाला अर्थ आहे. भागवत तोड-पाठ म्हणता आले तरच पडिताच्या जीवनाला अर्थ आहे. मन स्थिर राखू शकला तरच जोगीच्या जीवनाला अर्थ आहे. तलवार चालवता आली आणि दानधर्म करता आला तरच राजपूताच्या जीवनाला अर्थ आहे आणि राजकुळात जन्मलेल्या व्यक्तीला इतराची भूमी जिंकून घेता आली तरच त्याच्या जीवनाला अर्थ आहे. '

या कृतीचा लेखक अज्ञात आहे.

१७४३ ते १८२३ च्या दरम्यान लेखन करणारा खिडिया हुकमीचंद हा विभिन्न वीर व घटनांवर त्याने लिहिलेल्या डिंगल गीतातील कलात्मक गुणवत्तेसाठी विख्यात आहे. त्याच्या गीतांमध्ये जिवंतपणा, चित्रमयता असून छदःशास्त्राच्या दृष्टीने ती बिनचूक आहेत. त्याने नीसाणी वृत्त घेतलेले आहे. त्याची गीते पाठ करण्याची परपरा प्रचलित आहे

बारहट उम्मेदराम पाल्हावत (१७४३–१८२१) चे बहुतेक लेखन ब्रजमध्ये आहे. उदा ब्रह्म, कवच, वाणी भूषण, भाषा चाणक्य, भाषा राजनीति आणि सत्योपदेश; पण मरसिय मात्र राजस्थानीत आहे अल्वरच्या रावराजा बख्तावर-सिंहचा १८१४मध्ये मृत्यू झाल्यावर ते लिहिलेले आहे. रावराजाच्या आठवणीनी राणी मूसीला होणाऱ्या व्यथाची तीव्रता अणि तिने सती जाणे याचे हृदयस्पर्शी वर्णन केलेले आहे.

'राणीने षोडश शृंगार केले. मुक्त सर्पासारखे तिचे केस सळसळत होते. गळ्यात घातलेल्या मोत्याच्या माळा एकमेकावर आपटून वाजत होत्या. हातात फुलांचा हार घेऊन राणी धीमेपणाने चालू लागली. जमलेल्या समुदायाने अत्यंत आदराने 'खमा-खमा'चा गजर केला. रावराजाच्या मृतदेहासह सती मूसीने मृत्यूला कवटाळले. सतीला पाहण्यासाठी प्रेमपूर्वक आदराच्या भावनेने सूर्याने देखील आपला रथ थाबवला.

रामदान लालस (१७६१–१८२५) ने भीम प्रकाश, करणी रूपक आणि खिचियो का इतिहास लिहिले. भीम प्रकाशमध्ये मेवाडच्या महाराणा भीमसिंहाच्या प्रतापाचे वर्णन आहे. करणी रूपकमध्ये करणीजी देवीची कथा सांगितलेली आहे. इतिहासमध्ये चौहान जातीच्या रवीची शाखेची पद्धतशीर माहिती दिलेली आहे.

मंछ (१७७०–१८३३) हा त्याचा छंदःशास्त्रावरील ग्रंथ रघुनाथ रूपक गीतां रो साठी सुप्रसिद्ध आहे. त्याच्या घाणेराव री गझलमध्ये गोडवाडच्या घाणे-राव गावाचे व तेथील राजकीय वातावरणाचे वर्णन केलेले आहे.

'देव गुण प्रकाश' हे निवेदनात्मक काव्य चिमनजीने १७८० ते १७९५ च्या दरम्यान लिहिले त्यात एकूण ५३६ पदे आहेत. सीकरच्या राव देवीसिंह (१७६३–१७९५)ने सिरोहीच्या नजफ कुलिखान आणि शाही फौजांचा सेनापती मुर्तझा अलीविरुद्ध खाट् येथे केलेल्या युद्धाचे त्यात वर्णन आहे. रावच्या पूर्वजांची राजा कुतिलदेवपासूनची माहिती कवीने दिलेली आहे. सैन्यांचे व युद्धाचे वर्णन जोमदार व चित्तवेधक आहे.

महादान मेहडू (१७८१–१८४३) डिंगल गीतासाठी प्रसिद्ध आहे. त्याच्या 'महाराणा भीमसिंह रा झूलणा' मध्ये पिछोला सरोवर आणि महाराणाच्या मिरव-णुकीचे वर्णन आहे.

द्वितीय आढा किसनाचे पिंगलमध्ये लिहिलेले 'भीम विलास' हे महाराणा-वरील आणखी एक निवेदनात्मक काव्य आहे. त्यात महाराणाची वंशावलीही दिलेली आहे.

रायसिंह देवडाची कन्या राणी देवडी ही जोधपूरचा महाराजा मानसिंह १८४३मध्ये मरण पावल्यावर इतर स्त्रियासह कशी सती गेली त्याचे हुबेहूब वर्णन महादान बाईने तिच्या सती सुजस (१८४३) मध्ये केलेले आहे.

१८२८ ते १८४८ च्या दरम्याव लेखन करणारा देशनोकचा बीठू भोमा, बीकानेरचा महाराजा रतनसिंह व त्याचा पुत्र सरदारसिंह याचा आवडता कवी होता. त्याचे साहित्य पुढीलप्रमाणे आहे

'कुवर सरदारसिघजी रो विदोतौ', 'महाराजा सुरतासिघजी रा मरसिया', 'महाराजा रतनसिघजी रो रूपक', 'महाराजकुवर सरदारसिघजी रा कवित्त', 'रतन विलास', 'महाराज गणपतसिघजी रा कवित्त आणि स्फुट गीते' या सर्व प्रशसात्मक कविता आहेत. त्यातल्या त्यात 'रतन विलास' हे जरा बऱ्यापैकी काव्य आहे

१८ व्या शतकाच्या अखेरीस कविया करणीदानच्या काव्यांनी चारण काव्य पद्धती विकासाच्या चरम शिखरावर पोहचली आणि तेथून पुढे मग तिच्या वैभवास उतरती कळा लागली. व्यक्ती, घटना, योद्धे, युद्धे व त्याचे परिणाम, या सर्वांचे वर्णन करण्याच्या पद्धतीत तसेच भाषा व शैलीत तोचतोचपणा येऊ लागला या प्रवृत्तीची बीजे पूर्वीही दिसू लागली होती; पण नंतरच्या वर्षांमध्ये त्यात निर्जीवता आणि विकृती येऊ लागली सतत होणाऱ्या राजकीय परिवर्तनामुळे, उत्क्षेप व अस्थैर्यामुळे, त्याच किंवा तशाच प्रकारच्या विषयातील व शैलीतील पारपरिक पद्धती तितकीशी परिणामकारक राहिली नाही बाकीदासच्या काव्यामध्ये काय तो आपल्याला उल्लेखनीय बदल दिसून येतो आणि नव्या युगाची चाहूल ऐकू येते तो अधुनिक कालाचा अग्रदूत होय.

जोधपूरच्या महाराजा मानसिहाचा राजकवी कविराज बाकीदास आसिया (१७८१–१८३३) हा अतिशय विद्वान व इतिहासज्ञ होता त्याने लिहिलेला 'ख्यात' हा स्फुट ऐतिहासिक नोदीचा गद्य संग्रह आहे. त्याच्या २७ रचना बाकीदास ग्रथावली या शीर्षकाने ३ भागामध्ये प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्याची अन्य साहित्य-संपदा पुढीलप्रमाणे आहे– थलवट बत्तीसी, ठाकूर रुपसिघ रायपुर री क्षमाल अन्योक्ती पनचासिका आणि सकीर्ण पदे याखेरीज आणखी डझनभर ग्रथ त्याने लिहिले असे म्हणतात पण ते उपलब्ध नाहीत. तो एक निष्णात कवी होता. आणि राष्ट्रीय भावना व्यक्त करणाऱ्यामध्ये सर्वांत पुढे होता.

त्याच्या अनेक कविता सामाजिक दोष व त्यांच्या उपायावरील आहेत काही वेळेला त्या उपरोधात्मक असून समकालीन सामाजिक दोषाचा धिक्कार करताना दिसतात. वैसक वार्ता, मावडिया मिजाज, कृपण दर्पण, चुगल मुख चपेटिका वैस वार्ता, कुकवि बत्तीसी, विदुर बत्तीसी, कायर बावनी इ. काव्य अशा प्रकारची आहेत.

शूरवीरांचे त्याने केलेले सूक्ष्मदर्शी चित्रण स्फूर्तीदायक व महत्त्वपूर्ण आहे. राजस्थानीतील जवळजवळ सर्व राज्यकर्त्यांमध्ये ब्रिटिशांना शरण जाण्यासाठी लागलेली अहमहमिका व त्यांचा ऱ्हास पाहून, लोकांना जागृत करण्यासाठी कदाचित बाकीदासने हे हत्यार हाती घेतले असावे अशा प्रकारची काव्ये कोणा एका व्यक्तीला उद्देशून लिहिलेली नसून हे वर्णन लागू होणाऱ्या संपूर्ण वर्गासाठी आहेत. ही पद्धत इतकी परिणामकारक सिद्ध झाली की बाकीदासच्या नंतर महान कवी

सूर्यमल्ल यानेदेखील हीच पद्धत उचलली. त्याची 'सूर छत्तीसी', 'सीह छत्तीसी', वीर-विनोद, धवल पच्चीसी इ. अशा प्रकारची काव्ये आहेत.

बांकीदासची अन्य काव्ये जसे, भुरजाल भूषण, जेहल जस जडाव, सिद्धराव छत्तीसी, हमरोट छत्तीसी आणि थलवट बत्तीसी ही ऐतिहासिक असून त्यात विभिन्न स्थानाचे व गावाचे वर्णन करणारी पदे आहेत.

गंगा लहरी, झमाल राधिका शिख-नख, मोह-मर्दन, इ. धार्मिक काव्ये आहेत.

नीति मजरी, सतोष बावनी, वचन-विवेक पच्चीसी, अन्योक्ति पचासिका, इ. बोधपर स्वरूपाची असून नैतिक आचरणाचा उपदेश करतात.

त्याच्या काही काव्यामध्ये, बदलत्या राजकीय परिस्थितीबाबत निर्भीड इशारा दिलेला आहे. 'चेतावणी का गीत' मधील काही चरण पुढे दिले आहेत

' ब्रिटिशानी भूमीवर आक्रमण केले आणि तिच्या अधिपतीचे शौर्य नाहीसे करून टाकले. पूर्वी ते आपली भूमी शत्रूला देण्याऐवजी मरण पत्करीत. ब्रिटिशानी भूमी हिरावून घेतली आणि अधिपती मुखस्तंभासारखे पहात राहिले.

शत्रूदलाला तोंड देण्यासाठी युद्ध कसे करावे याचा त्यांच्या बाहूंना विसर पडला आणि त्याची जमीन दुसऱ्याच्या तावडीत जात असल्याचे करूण दृश्य ते नुसते बघत राहिले; भेकड नवऱ्याला त्याच्या बायकोने दुसरा नवरा केल्याचे जसे निमूटपणे सहन करावे लागते तसे !

'छत्रपती' आणि 'गढपती'नी हे दुर्दैव आतुरतेने पदरी घेतले आणि त्यांच्या डोळ्यादेखत त्याची जमीन त्याच्या हातातून निघून गेली; पण प्रतिकार करण्याची कुणाचीही छाती झाली नाही.

मृत्यूची आराधना करण्याचे दोन प्रसग असतात : एक, तुमची जमीन हिरावून घेतली जात असताना आणि दुसरे, अबलांनी रक्षणासाठी हाक दिली असताना. आपली जमीन व स्त्रियांचे संरक्षण करण्याइतके शौर्य हिंदू व मुसलमाना-मध्ये राहिले नाही का ?'

बाकीदासचे लेखन परपरागत शैलीहून थोडे वेगळे असल्याचे उघड दिसते.

त्याच्या लेखनकालात राष्ट्रीयत्वाच्या भावनेने मूळ धरायला सुरवात केली होती म्हणून त्याने हिंदू असो वा मुसलमान असो, सर्वांच्या शौर्याला आवाहन केले होते. बांकीदासच्या कविता म्हणजे भारताच्या राष्ट्रीयत्वाच्या मार्गातील पहिला टप्पा होय. सूर्यमल्ल मिश्रण सहित अन्य काही कवींनी ही ज्योत पुढे तेवत ठेवली; पण तुतारी वाजवण्याचे काम मात्र अर्वाचीन कालाच्या प्रारंभी शंकरदान सामौरने केले.

## पौराणिक व धार्मिक काव्य

या सप्रदायाच्या काव्याचे एकमेव वैशिष्टय म्हणजे वीर आणि भक्ती किंवा वीर, शृंगार व भक्ती या रसाचे संमिश्रण होय पृथ्वीराज राठोडची 'वेलि' हे या पद्धतीचे उत्कृष्ट उदाहरण होय चारण काव्याच्या या दोन्ही प्रमुख प्रकारामध्ये– १) ऐतिहासिक व शौर्यात्मक आणि २) पौराणिक व धार्मिक – बारहट इसरदास आणि खिडिया जग्गासारख्या कित्येक कवीनी सारखेच लेखन केले आहे दोन्ही प्रकार त्यानी समर्थपणे हाताळले आहेत आपण या ठिकाणी पौराणिक व धार्मिक काव्याचा विचार करणार आहोत.

चारण आपली मूळ उत्पत्ती शक्तीपासून मानतात. देवीने त्याच्या जातीत चौऱ्याशी अवतार घेतले असा त्याचा विश्वास आहे. त्यापैकी काही देवीची नावे आहेत– आवडजी, महमाय, चालंराय आणि करणीजी देवीच्या या अवतारांचे स्तवन करणारी विशेषत: करणीजी आणि मार्कण्डेय पुराणातील शक्तीच्या कथेवरील असंख्य काव्ये लिहिलेली आहेत शूरवीर हा शक्तीचा उपासक असतो साहजिक शक्तिपूजा राजस्थानात विशेष लोकप्रिय होती. त्याचप्रमाणे शकराचे पार्वती व सतीशी झालेल्या दोन्ही विवाहाच्या पुराणोक्त कथावरही काव्ये लिहिलेली आहेत.

राम व कृष्णाच्या पौराणिक कथांवरही अनेक लालित्यपूर्ण मधुर काव्ये लिहिलेली आहेत यात त्याच्या शौर्याच्या व उद्धार करण्याच्या कार्यांचे वर्णन केलेले आहे. या पद्धतीच्या काव्याचे हे वैशिष्टय होय. याला अपवाद म्हणजे साया झूला आणि बांकीदास यानी राधावर लिहिलेली दोन लहान काव्ये ! ४०० वर्षांच्या या कालखडात एवढीच काय ती लिहिली गेली पाडव, अभिमन्यू, प्रल्हाद, या पौराणिक व्यक्तीवर तसेच दशावतारावरही काव्ये लिहिली गेली कविया करणीदानने ईश्वराच्या चोवीस अवताराचा उल्लेख केलेला आहे. राजस्थानी काव्यातील तो एकमेव अपवादात्मक उल्लेख असून नतरच्या कालातील भागवत व ब्रज भाषेच्या प्रभावाने तो केला असावा असे वाटते. याखेरीज निर्गुण भक्तीवरील काही काव्येही लिहिली आहेत, उदा केसोदास गाडणचे नीसाणी विवेक वार, ईशस्तुती करणारी इतरही काही काव्ये आहेत.

श्रीधर व्यास लिखित 'सत्तसती रा छंद' आणि खिडिया चानण लिखित 'माताजी रा छंद' ही शक्तिस्तुती करणारी काव्ये १५ व्या शतकात लिहिली आहेत या शतकातील अन्य महत्त्वाचे कवी म्हणजे – तेजोजी चारण व कान्होजी बारहट. सामाजिक वैगुण्यांची नालस्ती करणारी भक्तिपदे त्यानी लिहिली.

जयसिंह हा कदाचित ब्राह्मण कवी असावा. त्याने १६ व्या शतकाच्या

सुरवातीला हरि रासु रचले. त्याने आत्मशुद्धी व स्वान्त' सुखाय भक्तिभावनेने ईश्वराच्या महत्कृपेचे साध्या सोप्या भाषेत वर्णन केले आहे.

राजस्थानच्या भक्त चारण कवींमध्ये भट्टजी कविया (सुमारे १४६८–१५६८) हा सुप्रसिद्ध होय. त्याने लिहिलेली काही स्फुट पदे बव्हंशी छप्पय (अदाजे सख्या ८५) आणि काही डिंगल गीते उपलब्ध आहेत त्यामध्ये राम, कृष्ण आणि गोरखनाथ, जाभोजी व अन्य सिद्धांची प्रार्थना केलेली आहे. तीव्र भावना व भक्तीमुळे ही छप्पय पदे मनोग्राही झालेली आहेत.

बारहट आसा (१४९३–१५९३) च्या गुण निरंजन प्राण या ४५ पदाच्या काव्यात 'निर्गुण ब्रह्म'चे श्रेष्ठत्व सांगून त्याचा धावा केलेला आहे. त्याच्या डिंगल गीतामध्ये 'सगुण ब्रह्म'च्या लीलाचे वर्णन केलेले आहे. सगुण व निर्गुणाचे सयोगीकरण राम, कृष्ण व अल्ला याची एकरूपता तसेच 'सलाम अलेक'–'अलेक सलाम' व 'नमस्कार', 'प्रणाम' या मुसलमान व हिंदूंमधील अभिवन्दनाच्या वेगवेगळ्या पद्धतींमधील सारखेपणा बारहट आसाने दर्शविला आहे. यावरून त्याची धार्मिक विचारसरणी कळते 'गुण निरजन प्राण' मध्ये तो म्हणतो .

हे अगम्य, अगोचरा ! त्वमेव सत्य असून बाकी सर्व जगत माया आहे तूच निर्माण करतोस, पालन करतोस आणि विनाश करतोस.

चूंडोजी दधवाडियाच्या नावावर निमंधा बध (३३ पदे) गुण चाणक वेलि (४१), गुण भाकडो, रामलीला आणि स्फुट काव्य रचना आहे. यापैकी पहिली दोन उपलब्ध आहेत दोन्हीमध्ये ईश्वराची वेगवेगळ्या प्रकारे स्तुती केलेली आहे. दुसरे काव्य सख्यात्मक शैलीत १/२ पासून सुरवात करून ते २१ पर्यंत लिहिलेले आहे. १५६३ ते १५६८ च्या दरम्यान ही काव्ये लिहिलेली आहेत.

नाभादासाने 'भक्तमाल'मध्ये चौदा चारण भक्त कवींचा उल्लेख केलेला आहे. त्यात चूंडोजी आणि अल्लूजी कविया या दोघांचाही समावेश आहे.

सांखला करमसी रुणेकाने १५४० च्या सुमारास 'क्रिसनजी री वेलि' लिहिली. त्यात रुक्मिणीच्या सौंदर्याचे समर्पक उपमा देऊन विलक्षण मनोवेधक वर्णन केलेले आहे. काव्याच्या उपलब्ध प्रतींमध्ये फक्त २२ पदे असून ते अपूर्ण असल्यासारखे वाटते. ते उत्कृष्ट काव्य असून पृथ्वीराज राठोड कवीला वेलि रचताना त्यापासून स्फूर्ती मिळाली असावी असे वाटते एक पद आहे :

' रुधिराभिसरणामुळे लाल असलेले रुक्मिणीचे नाजूक तळवे उलट करून ठेवलेल्या दोन कमलांसारखे भासत होते. तिच्या तळपायांची नखे आरशासारखी चकाकत होती किंवा कमळांवरील लुकलुकत्या दीपमालिकेसारखी भासत होती.'

जैन कवी कुशल लाभ (१५२३ ते सुमारे १६००) यांचे 'दुर्गा सात्तसी' हे

मार्कण्डेय पुराणातील 'दुर्गा सप्तशती'वर आधारलेले आहे. दुर्गेची कथा सोप्या भाषेत यात सांगितलेली आहे

बारहट इसरदास (१५३८–१६१८) याच्या 'हालाँ झालाँ री कुंडलिया' या शौर्यात्मक काव्याचा आपण विचार केला आहेच चारण समाजात इसरदास देवा-सारखा (इसरा-परमेसरा) मानला जातो, त्याचे मुख्य साहित्य आहे–हरि रास, देवियाँ गुण वैराट, गुण निंदा स्तुति, गुण भगवंत हस, गुण रास लीला, गुण बाल लीला, गुण सभा पर्व, गुण आगम आणि गरुड पुराण. याखेरीज अनेक डिंगल गीते व गाणी त्याने लिहिली आहेत त्याच्या लहान काव्यांमध्ये दान लीला, छोटा हरि रास, आपण, गंगावतरण, सामल रा दूहा आणि कृष्ण ध्यान यांचा समावेश होतो.

धार्मिक औदार्य, सुमवादित्व आणि एकीकरणात्मक घटना व भावना यांचे हुबेहूब चित्रण इसरदासच्या काव्यात आढळते विभिन्न रूपात आणि अनेक प्रकारे प्रगट होणाऱ्या एकेश्वराची त्याने स्तुती केली आहे सिद्ध, संत, नवनाथ आणि हुसैन हे सर्व त्याच्या पौराणिक भक्तांसह त्याच्या काव्यात (गुण आगम) हजर आहेत. महमद साहेबाला मुलगा दिला नाही आणि हुसैनला मृत्यू आला म्हणून तो देवाला रागे भरतो (गुण-निंदा-स्तुति). 'पुराण' आणि 'कुराण' दोहोंबद्दल त्याला सारखाच आदर होता–(हरि रास) हरि रास आणि देवियाँ हे अनुक्रमे वैष्णव व शास्त्र संप्रदायात धार्मिक ग्रंथ मानले जातात व त्यांचे पठण करतात. इसरदास हा मुळात भक्त कवी होता आणि भक्ती ही त्याच्या दृष्टीने जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून सुटका करण्याचे साधन होती ईश्वराचे भजन करणे व त्याच्या नामाचा जप करणे ही भक्तीची सर्वोत्कृष्ट साधने असून त्याच्या काव्यात या गोष्टीवर भर दिलेला आहे. गुण निंदा स्तुतीमध्ये ईश्वराच्या विविध अवतारांतील वसंख्य कार्यांची एकाच वेळी उपहा-सात्मक निर्भर्त्सना व स्तुती केलेली आहे वामनाने केलेली बळीची फसवणूक आणि कृष्णाने केलेले जाबवतीचे अपहरण ही याची दोन उदाहरणे होत यावरून त्याची भक्तीच फक्त दिसून येते असे नाही तर ईश्वराप्रती वाटणारी प्रेमळ आपुलकीची भावनाही व्यक्त होते. 'हरि रास'मध्ये त्याने कर्म व ब्रह्मविषयीचे दोन मूलभूत प्रश्न मांडले आहेत. जन्म अगोदर की कर्म अगोदर ? जीव जन्मापासूनच जन्म व मर-णाच्या बंधनांनी जखडला जातो आणि हे त्याच्या पूर्वजन्मीच्या कर्मांमुळे होते. म्हणूनच तो जर कर्मापासून मुक्त नसेल तर त्याने का म्हणून दुःख भोगावे ? या उलट धर्मग्रन्थ सांगतात की जीव हा कर्म करायला मुक्त आहे. याच कारणास्तव धर्मग्रंथ तरी चुकीचे आहेत नाहीतर कर्मवाद तरी चुकीचा आहे.

इसरदासने मांडलेला दुसरा प्रश्न असा की निराकारब्रह्माची उत्पत्ती कशी झाली आणि ही उत्पत्ती पुढे कशी आली ? पहिल्या प्रश्नाचे उत्तर कवी असे देतो की प्रारंभी फक्त परब्रह्मच होते. दुसरे काहीही नव्हते अगदी आत्मा किंवा कर्म

देखील नव्हते. दुसऱ्यांच्या बाबतीत मात्र तो 'नेति–नेति'च्या भावनेने मान तुकवतो

राठोड पृथ्वीराज (१५४१–१६००) याने १५८० मध्ये 'वेलि क्रिशण रुकमणि री' हे ३०४ पदाचे काव्य रचले. हे भागवत पुराणावर आधारित असून त्यात कृष्ण व रुक्मिणीच्या विवाहाचा प्रसग वर्णिलेला आहे उत्कृष्ट लालित्य, गहन भावना आणि उच्च विचार यांमुळे हे काव्य उल्लेखनीय झाले आहे अशा प्रकारच्या काव्यामध्ये हे काव्य खूप वरच्या दर्जाचे समजले जाते. यात राजस्थानी काव्यातील तीन पद्धतीच्या मुख्य वैशिष्ट्याचा सुरेख सगम कवीने केलेला आहे. उदा. लौकिक प्रेमकाव्य, ऐतिहासिक व शौर्यात्मक काव्य आणि सत (भक्ती) काव्य. मुळात हे काव्य भक्तीमध्ये परिवर्तित होणारे शृंगारिक काव्य आहे यातील शौर्याचे वर्णन शृंगाराला पूरक आहे कवीने फक्त उद्दीपित करणाऱ्या शृंगारिक भावना व्यक्त केल्या आहेत असे नाही, तर या सदर्भात शक्य असेल तेथे कल्पनाविलास करून चित्तवृत्ती चाळविल्या आहेत. शृगार वर्णनातही कोमल डौल आहे. रुक्मिणीच्या मनातल्या अंतरग भावनाचे प्रतिबिब तिच्या बाह्य आचरणामध्ये उमटलेले आहे. उपमा परिपूर्ण असून सूचक व चित्रमय आहेत. योग्य शब्दांच्या वापराबाबत कवी अतिशय दक्ष असल्याचे दिसते. सस्कृत शब्दाच्या वापराच्या बाबतीत तो रणमल्ल छदाची शैली अनुसरतो. भाषा साहित्यिक राजस्थानी आहे. वेली रचनाकालापासूनच विद्वानांमध्ये लोकप्रिय आहे. मध्यकालात विद्वानानी त्यावर सस्कृत, ब्रज व राजस्थानीमध्ये डझनाहून अधिक भाष्ये लिहिली आणि आधुनिक कालात वेलीच्या अर्धा डझनाहून अधिक आवृत्त्या निघाल्या आहेत.

राठोड पृथ्वीराजने अनेक सकीर्ण पदे, दोहे व गीते लिहिली. त्यात राम, कृष्ण, गगा आणि कित्येक वीराची स्तुती केलेली आहे; पण कवीच्या अखड कीर्तीला वेलीच कारणीभूत आहे वेलीतील दोन पदे पुढे देत आहोत. लहानपणी रुक्मिणी सख्यांसह बाहुल्या खेळत असल्याचे वर्णन कवीने केले आहे :

' राजकन्या रुक्मिणीच्या, तिच्याच वयाच्या, नम्र, कुलीन सख्या, कमळाच्या नाजुक व सुदर कळ्यांसारख्या आहेत. राजवाड्याच्या प्रागणात सख्यांसह खेळणारी राजकन्या निरभ्र आकाशात ताऱ्यामध्ये असलेल्या चद्रासारखी दिसत आहे.'

सायकाळचे आणि लग्नानतर कृष्णाची वाट पहात असलेल्या रुक्मिणीच्या भावनांचे वर्णन आहे :

सूर्याची किरणे, प्रियकराची वाट पहात असलेल्या प्रियतमेचे नेत्र, उडणाऱ्या पक्ष्याचे पंख आणि कमळाच्या पाकळ्या सूर्यास्ताने संकुचित होऊ लागतात. तद्वत प्रेमातुर, सुदर तरुण रुक्मिणी संकुचित झाली ' कवीने सकुचित हा शब्द द्व्यर्थी वापरला आहे. एक सायकाळच्या सदर्भात आणि दुसरा रुक्मिणीच्या भावनासाठी.

किसनौ हा बहुधा ब्राह्मण कवी असावा. याने सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात 'महादेव पार्वती री बेलि' लिहिली. यात ३८२ पदे आहेत. गंगावतरण आणि शंकराचे सती व पार्वतीशी विवाह या कथावरील हे निवेदनात्मक काव्य आहे वर्णने तप-शीलवार व लालित्यपूर्ण आहेत विशेषत: शंकराच्या विवाहाच्या प्रसंगाची, पण भावनाची अभिव्यक्ती मात्र त्या मानाने कमी आहे. शंकराच्या महानतेची स्तुती करणे हा कवीचा उद्देश आहे.

गाडण केसोदास (१५५३–१६६३) चा आम्ही मागे उल्लेख केला आहेच. पौराणिक-धार्मिक स्वरूपाच्या त्याच्या काव्यापैकी मुख्य काव्ये आहेत– 'नीसाणी विवेक वार,' 'छद महादेवजी रो' आणि 'छद श्री गोरखनाथ'

शंकराचा वेदान्त हा नीसाणीचा मुख्य विषय असला तरी भक्ती व योग–साधना याचाही त्यात परामर्ष घेतलेला आहे आत्मज्ञान व जन्ममृत्यूच्या बंधना-तून सुटका करण्याचा संदेश कवीने दिलेला आहे. नीसाणी अतिशय लोकप्रिय असून धार्मिक एकात्मतेची उदाहरणे त्यात दिलेली आहेत भाषा राजस्थानी मिश्रित खडी बोली आहे ती सोपी व वाक्सप्रदायपुक्त आहे बाकीची दोन काव्ये लहान असून त्यात अनुक्रमे शंकर व गोरखनाथाची स्तुती केलेली आहे कवीचा निर्गुण ब्रह्म आणि नाथ साधनेकडे अधिक कल असल्याचे वाटते त्याच्या 'गज गुण रूपक बंध' (मागे उल्लेखिलेले) काव्यात नाथ साधनेचे संदर्भ आढळतात

बालूदा का बास गावाच्या चूडाचा मुलगा माधोदास दधवाडिया (१५५३–१६२१) याने लिहिलेले 'राम रासौ' हे १०३४ पदांचे विख्यात निवेदनात्मक काव्य आहे ते महाकाव्याच्या धर्तीवर असून १५९५ च्या सुमारास लिहिलेले आहे. त्यात रामकथा सांगितलेली असून ते मुख्यतः वाल्मीकि रामायणावर आधारित आहे. अध्यात्म रामायण, आनद रामायण, विचित्र रामायण (मधोदास रचित), महाभारत आणि भागवत पुराण याचाही कवीवर प्रभाव दिसून येतो रामाचे तारक विभूती रूपात चित्रण करण्यावर कवीचा भर आहे रामाच्या थोरवीचेच फक्त नव्हे तर अन्य कतिपय व्यक्तीचेही आदर्श चित्रण केलेले आहे आपण जिवत असतानाही रावण सीतेला घेऊन गेला याचे जटायूला विलक्षण दुःख वाटते. कपटाने वध केला म्हणून वाली मरताना त्याला बोल लावतो लंकेला जाताना सुरसा आडवी आली तेव्हा हनुमान काही वाट देण्यासाठी तिला विनंती करीत नाही तर सरळ पराभव करून लकेला जातो लक्ष्मण मूच्छित झाल्याचे कळल्यावर राम रावणाला ललकारतो, पण रावण काळोखाचा फायदा घेऊन पळून जातो. या मुद्यावर आणि अन्य अनेक बाबतींत तुळसीदास व माधोदास दधवाडिया याच्यातील मतभेद अत्यत महत्त्वपूर्ण आहे. रामाच्या निराशा व खिन्नतेचे तुळसी-दासाने खूप वर्णन केले आहे. निराशेचा हा सूर राजस्थानी कवीच्या बाण्याला

मानवणारा नाही. त्याचा नायक बेसावध क्षणी कदाचित शत्रूचा हल्ला चुकवील, पण लगेच सावरून दुप्पट जोराने वैऱ्यावर वार करील.

काही ठिकाणी भाषा अतिशय बहारदार असून क्रियेचे वस्तुनिष्ठ व चित्रमय पद्धतीने वर्णन करते. संवाद सुटसुटीत, समर्पक व अर्थपूर्ण आहेत त्यात नैसर्गिक सहजता आहे. मानवाचे दौर्बल्य व संवेदनशीलता याचेही प्रसंगोचित वर्णन केलेले आढळते. समोर अमर्याद समुद्र पसरलेला पाहून प्रत्येक वानरवीर स्वतः उडी न मारता दुसऱ्याला उडी मारून पलीकडे जायला सांगतो. जटायूच्या मरणाने राम कारुण्याने हेलावून जातो, कवीने लोकांमध्ये प्रचलित असलेल्या अनेक समजुती व परंपरा पाळल्या आहेत.

अधूनमधून कालक्रमविपर्यय देखील आढळतो. उदा सुग्रीव म्हणतो की दसऱ्यानंतर सैन्य लंकेवर चालून जाईल. या ठिकाणी कवी हे विसरतो की त्यावेळी दसरा नव्हताच आणि रामाने रावणावर विजय मिळवल्यानंतरच दसरा सण साजरा होऊ लागला.

माधोदास दधवाडियाचे नीसाणी गजमोक्ष हे भागवतातील गजेंद्र मोक्षाच्या कथेवर लिहिलेले लहान निवेदनात्मक काव्य आहे. त्याचे हडूमान गीत हनुमानाचे स्तवन करणारे आहे

राम रासौच्या काही पंक्ती येणेप्रमाणे आहेत :

(मारीच वध, सीता लक्ष्मणाला कटु वचन बोलते.)

'लक्ष्मणा, (मला तुझा हेतू माहीत आहे) भरताच्या आईने तुला आमच्या बरोबर पाठवले. माझे पती साधे भोळे आहेत प्रत्येकजण चांगला असल्याचा त्यांचा विश्वास आहे. त्यांना प्रत्येक शुभ्र वस्तू दूध वाटते.'

सीता जाईल तेथे ते हरीण (मारीच) तिच्या पाठोपाठ जाते ते वारंवार खाली वाकून नम्रपणे सीतेच्या पायांना स्पर्श करते. तिच्या पावलोपावली ते सीतेप्रती वाटणारी दाट प्रीती व्यक्त करते आणि सीतेचा विश्वास संपादन करून राक्षस तिला ठकवू पाहतो.

लीलछा गावचा सांया झूला (अंदाजे १५२३ – १६२३) हा इडरच्या राव कल्याणमल राठोडच्या मर्जीतला होता. कित्येक स्फुट पदांखेरीज त्याने पुढील निवेदनात्मक काव्ये लिहिली : रुक्मिणी हरण – कृष्ण व रुक्मिणीच्या विवाहाच्या कथेवरील, नाग दमण – यमुनेत कृष्णाने कालियामर्दन केले त्या कथेवरील, अंगद–बिष्टि – अंगदाचे दूतकर्म व रामरावणाच्या युद्धावरील; नीसाणी राधिकाजी री (अपूर्ण) – राधा व चंद्रावली बरोबर कृष्णाने केलेल्या 'कुंज लीला' वरील, रण जंग – राणा प्रताप व मोगलांच्या युद्धावरील; गुण वसंत लीला

आणि रास लीला याखेरीज आणखीही काही साहित्य त्याच्या नावावर आहे ते असे–बारह मासा, अंगद वडसालो, नागदमण चउपइ, नागदमण छद, नागदमण कथा आणि वात (कथा) वात हे रासक्रीडेवर गुजराती गद्यात लिहिले आहे, पण जोवर याची अस्सल हस्तलिखिते उपलब्ध होत नाहीत तोवर याच्याविषयी ठामपणे काही सागता येत नाही.

निवेदनात्मक काव्यात राम व कृष्णाच्या विविध लीलाचे वर्णन केलेले आहे. रुक्मिणी हरण, अंगदविष्टि आणि नागदमण ही लोकप्रिय व महत्त्वपूर्ण आहेत. यापैकी पहिल्या दोन काव्यांना वीररसात्मक म्हणता येईल. तिसऱ्यात मात्र वात्सल्य भाव आहे. चित्रमय वर्णन आणि हृदयाचा ठाव घेणारे संवाद ही या काव्याची वैशिष्टये होत वर्णने बहुधा संग्रामाच्या दृश्याची आहेत किंवा ईश्वराच्या अवतार कार्यांची आहेत सवाद खुसखुशीत व मनोवेधक आहेत सवादाच्या बाबतीत सांयाजी असामान्य कलाकार आहे राधिका नीसाणी हे नाजूक भावनाचे काव्य असून या कालखडातील अशा प्रकारचे ते पहिलेच काव्य होय. वास्तविक मध्य-कालात राधेवर फक्त दोनच काव्ये लिहिली गेलीत. दुसरे आहे बाकीदास विरचित झमाल राधिका सिख-नख. पदे बहुधा भक्तिपर आहेत

नाग दमण मधील नागीण व कृष्णातील सवादाच्या काही ओळी अशा आहेत.

"तू कोठून आलास आणि कशासाठी येथे आलास ? वडलाच्या घरची वाट चुकून तू इथे नागाच्या घरी आलास."

"नागीणबाई ! मी मुद्दामच आलो आहे, वाट चुकून नव्हे. तुला तुझा मान राखावयाचा असेल तर माझा चेंडू देऊन टाक. "

..."नागिणी, तुझ्या नवऱ्याची झोपमोड मी करू नये व परत निघून जावे हे तुझे शब्द माझ्या कानाना कटु लागताहेत."

"या कालिया नागापासून स्वतःचे रक्षण कर नाही तर तुझे वडील अश्रू गाळतील आणि कुणाला स्तनपान द्यावे हे तुझ्या आईला कळणार नाही !"

या काव्यपद्धतीत मोलाची भर टाकणारा सुरजनदास पूनिया (१५८३–१६९१) हा छप्पय छदात रचना करणारा कवी म्हणून विख्यात आहे त्याने बहु-विध विषयांवर जवळजवळ ४०० छप्पय लिहिले त्यापैकी बहुतेक भक्तीपर आहेत. भावनांची प्रगाढता आणि विचारांचे गांभीर्य ही त्याच्या काव्याची वैशिष्टये होत. या ठिकाणी आपण त्याच्या तीन काव्याचा विचार करू या :

कथा हरि गुण (१९२ पदे) यात ईश्वराची विविध प्रकारे स्तुती केलेली असून इसरदासच्या हरि रासची पद्धत घेतलेली आहे.

कथा गजमोक्ष (६९) यात ग्रहाच्या नावडीतून गजाच्या सुटकेची कथा सांगितलेली आहे

राम रासौ (१७६ पदे) हे मुख्यत: डिंगल गीत व छप्पयमध्ये लिहिलेले आहे. राम वनवासात असताना शूर्पणखेने लग्नाचा प्रस्ताव त्याच्यापुढे मांडला येथपासून पुढची रामकथा यात सांगितलेली आहे राम व रावणातील युद्धास ती कारणीभूत होती ठळक प्रसंगाचे व शौर्याच्या कृत्याचे ओघवत्या भाषेत जोमदार वर्णन केले आहे काव्यातील काही घटना मात्र अजब वाटतात लंकेत सीतेचा शोध करताना हनुमान 'मार्जार' रूप घेतो. लक्ष्मण दोनदा मूर्च्छित होतो . एक महिरावणाच्या वधानंतर वाराही देवीने पाताळातून पाठवलेला साप चावल्याने आणि दुसरे, रावणाने खाली पडताना केलेल्या वारामुळे ! त्याचप्रमाणे लक्ष्मणाला दोन्ही प्रसंगी दोन वेगवेगळ्या व्यक्तींनी शुद्धीवर आणले. एका प्रसंगी हनुमान अमरजडीचा पर्वत उचलून आणतो आणि त्यावर वाराही शिवनामाचा जप करताना आढळते. दुसऱ्या वेळेला राम दीर्घ नि:श्वास सोडतो आणि तो सीतेच्या कानावर जाऊन ती सरजीत मंत्र म्हणून लक्ष्मणाला शुद्धीवर आणते

मेहोजीच्या रामायणातही वाराहीचा उल्लेख आढळतो वाराही ही ६४ योगिनींपैकी एक. महामुद्राची साधना ज्या स्त्रीसह करतात तिला योगिनी म्हणतात. वाराही वज्रयानाच्या हेरुक देवाची अधिशास्ती आहे बौद्ध तंत्रामध्ये वाराहीची पूजा लोकप्रिय आहे 'अवजू वाट', 'ओजू वाट' (सोपी, साधी व सरळ वाट) यासारखे सिद्ध काव्यात प्रचलित असलेले शब्द सुरजनजीने वापरले आहेत. त्याच्या-पूर्वी जांभोजीने त्याच अर्थी ते शब्द वापरले होते. बौद्ध साधना काही स्वरुपात राजस्थानात प्रचलित होती आणि तिच्या अवशिष्ट खुणा या शब्दांवरून सूचित होतात. असे असले तरी, याचे अधिक संशोधन होणे अगत्याचे आहे

राम रासौमधील एक पद पहा. दूत म्हणून आलेल्या अंगदाची रावण नालस्ती करतो :

अरे अंगदा, तू नुसता हीन कुळातीलच नव्हे तर मूर्खही आहेस आज तू एवढ्या बढाया कशा मारतो आहेस ? जा पळ आणि जीव वाचव. अरे अवलक्षणी, काळतोंड्या, तुझ्या धन्याला तुझ्यापेक्षा चांगला दूत सापडला नाही का ? तुझ्या मूर्खपणामुळे तू राज्य चालवून बसलास याची तुला काहीच लाज कशी वाटत नाही ? तुझ्या बापाचा वध करणाऱ्याशी तू मैत्री करतोस आणि त्याच्या हातातील खेळणे होतोस, नाहीतरी तुझ्याकडून आणखी कसली अपेक्षा करावी ? कोल्हाटी आणि माकडे बिनडोक असतात. भाकरीच्या एका तुकड्यासाठी ते आपलेच डोके फोडून घेतील !

मेवाडमधील समेला गावच्या कल्याण दास राव (भाट) याने १६४३ मध्ये

गुण गोविंद लिहिले त्यात १९१ रुपक आणि ३२ वृत्ते आहेत. या खेरीज वचनिकाही आहेत. दशावताराचे, विशेषतः राम व कृष्णाच्या जीवनाचे व लीलाचे वर्णन करणारे ते निवेदनात्मक काव्य आहे. या दृष्टीने, या पद्धतीचे हे एकमेव काव्य आहे. प्रसंगानुसार भाषा व शैली बदलत जाते. रामाच्या कथेत लकादहनाचा, लक्ष्मणाच्या मूर्च्छेचा आणि हनुमानाने सजीवनी आणल्याचा अजिबात उल्लेख नाही. त्याचप्रमाणे, कृष्णाच्या कथेत, राजस्थानी कवीच्या अत्यत आवडत्या विषयाचा 'कृष्ण रुक्मिणी' च्या कथेचा उल्लेख नाही. काव्यात भविष्यवाणी केली आहे की कलियुगाचा अत होऊन सत्ययुग आले म्हणजे लोक पर्शियनचा अभ्यास करावयाचे सोडून सस्कृतचा अभ्यास करू लागतील. यावरून एक स्पष्ट निष्कर्ष काढता येतो की कवीच्या काव्यरचनेच्या काळी पर्शियनचा अभ्यास खूप लोकप्रिय होता आणि संस्कृतला तिचे मानाचे स्थान परत मिळावे अशी कवीची मनापासून इच्छा होती.

महेश दास राव (१६४४-१६९८) विरचित रघुनाथ चरित- नवरस वेलि हे १२७ पदांचे काव्य आहे. 'बाल काड,' वरात, जनकपुरहून परत येते व अयोध्येत तिचे स्वागत होते. येथपर्यंत रामकथा यात सागितलेली आहे शीर्षकातील 'नव रस' शब्दावरून वाटते की नव रसामध्ये रामाची कथा सागण्याचा कवीचा हेतू असावा. पण तो पूर्ण होऊ शकला नाही. काव्यात राजस्थानी व ब्रज भाषेचा वापर केलेला आहे शत्रुघ्नाला यात वाचाळ दाखविलेला असून परशुरामाशी त्याचा वाद झाल्याचे सागितले आहे.

राम कथेशी संबंधित आणखी एक महत्त्वाचे काव्य म्हणजे रुघ रासौ. बालखा जोधपूर गावच्या मूहता रुघनाथने ते १६६८ मध्ये लिहिले. दुर्दैवाने, उपलब्ध प्रतीतला मजकूर अपूर्ण दिसतो कारण सुरवातीपासून ते सीताहरणा-पर्यंतचा भाग त्यात नाही जटायू व रावणाच्या लढाईने काव्यास सुरवात होते. आणि पुढे मग त्यात रामाचा राज्याभिषेक, सीतेचा वनवास, लवाचा जन्म, ऋषीनी 'कुश' पासून निर्माण केलेला कुश आणि त्याचे शौर्य या सर्व घटनाचे वर्णन केलेले आहे कुभकरणाचा मुलगा भिडसाकुभ याने शकरापासून वर मिळवला होता की गर्भातून जन्म झालेला कुणीही त्यास मारू शकणार नाही. त्याने बिभिषणा-कडून लका हिरावून घेतली. रामाचे सैन्य बिभिषणाच्या मदतीला धावून गेले आणि कुशाने भिडसाकुभास ठार केले सीतेच्या मुलाविषयी ऋषीकडून कळल्यावर राम पुन्हा सीतेचा स्वीकार करतो आणि अयोध्येचे राज्य करतो

१६४३ ते १६७० च्या दरम्यान विठलदास याने रुक्मणी हरण (२०६ पदे) लिहिले यात २४ वृत्ते वापरलेली असून कृष्ण-रुक्मिणीची पौराणिक कथा सागित-लेली आहे. मुख्य भर कृष्ण चरित्रावर आहे. ऐतिहासिक व शौर्यात्मक काव्यांच्या

धर्तीवर युद्धाचे तपशीलवार वर्णन केलेले आहे कृष्णाने चालून जाण्यापूर्वी द्वारकेत केलेली युद्धाची तयारी, दोन नवरदेवाची तुलना, कृष्ण आणि शिशुपाल, विवाहानंतर द्वारका वगैरे ठिकाणी नृत्य-गायनाने साजरा झालेला आनदोत्सव इत्यादी नाविन्यपूर्ण आहे.

१७ व्या शतकाच्या उत्तरार्धातील आइदान गाडणने श्री भवानी शकर रो गुण शिव पुराण (अपूर्ण) रचले, ते शिव पुराणावर आधारित असून शिवाशी संबधित सर्व लोकप्रिय दंतकथा त्यात सागितलेल्या आहेत उपलब्ध हस्तलिखितातील मजकूर कार्तिकेयाने तारकासुराचा वध केला येथे संपतो. पार्वतीशी शिवाच्या विवाहाचे वर्णन विलक्षण मोहक आहे नवरदेवाची व त्याच्याबरोबर आलेल्या वऱ्हाडी मडळीची वेशभूषा पाहून एखाद्या सामान्य मातेप्रमाणेच मयनाला देखील तच्या मुलीच्या पार्वतीच्या भवितव्याची काळजी वाटते. कवीने तिच्या काळजीचे अगदी यथार्थ वर्णन केले आहे.

खिडिया जग्गाच्या वचनिकाविषयी आपण मागे विचार केला आहेच. त्याने कित्येक भक्तीपर छप्पय देखील लिहिले आहेत. त्यांपैकी सुमारे ३० उपलब्ध आहेत. हे त्यातल्या त्यात सोप्या भाषेत असून त्याची निस्सीम भक्ती दर्शवतात

केसरीसिंह जैतावत (अदाजे १६५०–१७५०) याचे पंखी पुराण (गुण पखी प्रमोद) हे स्फुट पदांचे (कुडलिया) सकलन आहे. मौखिक परंपरेत ही पदे लोकप्रिय आहेत त्यामुळे त्यांच्या मजकुरात परिवर्तन झाल्याची आणि सख्याही कमी जास्त झाल्याची शक्यता आहे पक्षी, प्राणी, वृक्ष इ चे दाखले देऊन जग आणि मानवी आचरणाविषयीचे ज्ञान व सुज्ञपणा सागितलेला आहे एक इशारा दिलेला आहे आणि भक्तीपर भावना जागृत केल्या आहेत. सतकाव्यासाठी देखील ही पद्धत नवीनच वाटते. एका हस्तलिखितात सर्वांत जास्त म्हणजे ११९ पदे सापडली आहेत. एक कुंडलिया पुढे दिली आहे :

' विरहव्यथेने पहाटेच्या वेळी ओरडून कोंबडा काय सागतो ? अरे मूढ मानवा, सावध हो, रात्र सपली आहे. उठून देवाचे नाव घ्यावयाची वेळ झाली आहे. घटा वाजतात आणि सूचित करतात की प्रत्येक क्षणी आयुष्य कमी होत चालले आहे. लवकरच तुला जावे लागणार आहे. प्रयाणाची वेळ जवळ येत असल्याचे लक्षात घे. ईश स्मरण कर असे कोबडा उद्‌गारतो, असे कवी केसरीसिंह म्हणतो.'

लोकप्रिय ऐतिहासिक उपमा देऊन कवी लोकांना बजावतो ·

शरीर नाशवत असल्याने अखेर प्रत्येकाला मरावेच लागणार आहे हे प्रत्येकाने जाणले पाहिजे. असे आहे तर मग संपत्ती जमवून ठेवण्यात काय हशील ? ती दानधर्मात का देऊ नये ? अजमेरच्या विशालदेव राजाने वीस कोटी मोहरांइतकी

संपत्ती आनासागराच्या पाण्याखाली सुरक्षित ठेवली होती; पण ती पाण्यातच बुडून गेली हे सर्वांना ठाऊक आहेच.

ही शैली नंतर १९ व्या शतकातील भक्तकवी ओपा आढाने उचलली.

करणीदान (१६९३ – १७८३) च्या काव्याचा आपण विचार केला आहेच. त्यानेही त्याच्या 'सूरज प्रकाश'मध्ये रामकथा सांगितली आहे; पण त्याने राठोडाच्या पौराणिक वंशवृक्षाशी तिचा संबंध जोडून टाकला आहे. आपण वाल्मीकीचे अनुसरण केल्याचे आणि अखंड क्रमाने कथा सांगितल्याचे तो म्हणतो.

पीरदान लालस (१८ व्या शतकाचा पूर्वार्ध) हा बारहट इसरदास (१५३८–१६१८) आपला 'भाव गुरू' असल्याचे नमूद करतो आणि त्याचे औदार्य, सहिष्णुता व संयोगीकरणाचे धार्मिक विचार अनुसरतो. त्याचे साहित्य आहे– नारायण नेह, परमेश्वर पुराण, हिंगलाज रासौ, अलख आराध, अजम्पा जाप, ग्यान चरित, पातिग पहार आणि काही डिंगल गीते. ईश्वर एकच असून तो अनेक रूपे धारण करीत असल्याचे तो प्रतिपादन करतो. ईश्वराच्या दशावतारांवर त्याचा विश्वास दिसतो. सगुण ब्रह्माकडे त्याचा अधिक कल आहे. परमेश्वर पुराणात त्याने विविध धर्मानुयायी व संप्रदायी अनेक संत, भक्त व थोर पुरुषांच्या नावाचा अत्यंत आदरपूर्वक उल्लेख केलेला आहे वेगवेगळ्या धर्मपंथातील लोकांच्या अखेरच्या इच्छांचे संयोगीकरण करून, जन्म-मरणाच्या बंधनातून सुटकेसाठी व पुढील जन्मात, जर तो असेल तर, भक्तीचे वरदान लाभण्यासाठी तो प्रार्थना करतो. त्याची भक्ती दास्य भावाची आहे. अवताराच्या कारणाच्या संदर्भात तो गीतेचे अनुसरण करतो.

जोधपुरचा महाराजा अजितसिंह (१६७८–१७२४) कुशल योद्धा तर होताच; पण चांगला कवीदेखील होता त्याची वाङ्मयनिर्मिती पुढीलप्रमाणे आहे– गुण सार, भाव विरही, दुर्गा पाठ भाषा आणि गज-उद्धार ग्रंथ (६७० पदे) गुण सार व भाव विरही हे संकीर्ण विषयावरील पदांचे संग्रह आहेत दुर्गा पाठ भाषा उपलब्ध नाही पिंगलमधील सप्तशतीचे ते गद्य भाषांतर असल्याचे म्हणतात.

गज-उद्धार ग्रंथात 'गज व ग्राह' ची पुराणकथा सांगितलेली आहे. कवीने त्यात काही किरकोळ बदल केलेले असले तरी मुळात ती भागवतावर आधारलेली आहे. मुख्य विषय काव्याच्या निम्म्या भागात आलेला आहे बाकीच्या भागात विषयान्तर होऊन दशावतार, विश्वाची उत्पत्ती, चौदा 'लोक' इ अवांतर विषय आलेले आहेत.

गज उद्धाराच्या विषयावरील भक्तीकाव्यात गज-उद्धार ग्रंथाला बरेच वरचे

स्थान आहे. प्रगाढ विश्वास, भावनांची तीव्रता आणि संबंधाचे यथार्थ प्रतिपादन या गुणांमुळे हे काव्य इतर काव्याहून वरचढ ठरले आहे. पुढे एक पद देत आहोत. यात देवाने उद्धारासाठी येण्यास उशीर केला म्हणून गजाने त्यास दूषण दिलेले आहे. पदात व्याजस्तुती व निष्ठा दिसून येते :

'तुला प्रेम व लज्जा काहीच नाही. माझ्या बाबतीत तर तू आळशीही आहेस. अरे माधवा, मला तुझ्या मदतीची गरज असताना तू तुझ्या थोर कीर्तीची जाणीव कुठे हरवून बसलास ? पण प्रेम म्हणजे काय हे तरी तुला कसे कळणार ? कारण तुला ना आई, ना बाप, ना भाऊ ना बांधवजन ! तू कोणत्याही वर्गाचा नाहीस की पंथाचा नाहीस, तुला मार्गदर्शन करणाराही कुणी नाही कारण तू सर्वश्रेष्ठ परमात्मा आहेस.'

महाराजा अजितसिंहाने लेखन केलेल्या विषयांची पुढीलप्रमाणे वर्गवारी करता येते— पौराणिक, यात देवी किंवा शक्तीवरील काव्याचा व प्रार्थनांचा समावेश होतो; धार्मिक आणि नीतिपर; विश्वाचा विस्तार आणि ऐतिहासिक व लौकिक, यात गुणसारमधील 'रतन कवर रतनावती की बात'चाही समावेश होतो.

कवी जरी देवाच्या युगल-स्वरूपासमोर नतमस्तक होत असला तरी त्याचा भक्तीकडे अधिक कल असल्याचे दिसते.

जती जयचद या जैन कवीने (१८ व्या शतकाच्या पूर्वार्धात) १७१९ मध्ये 'माताजी री वचनिका' लिहिली दुर्गा सप्तशतीतील दुर्गेची कथा, त्यात थोडी स्थानिक रंगछटा मिसळून यात सांगितलेली आहे घटनाचे हुबेहूब वर्णन करणारे हे एक शौर्यात्मक काव्य आहे. विषय वगळता, शब्दयोजना, भाषाशैली आणि रूढ संकेत या बाबतीत या काव्यामध्ये ऐतिहासिक-शौर्यात्मक काव्याच्या पद्धतीचा अवलब केलेला आहे. दुर्गा काव्य परपरेतील हे एक तेजस्वी काव्य आहे. शुंभ-निशुंभाच्या सैन्याला 'म्लेंच्छा'चे सैन्य म्हणून कवीने तत्कालीन राजकीय परि-स्थितीवर प्रकाश टाकलेला आहे कवीने सात 'वचनिका' आणि विविध वृत्तांचा वापर केलेला आहे.

१६७८ मध्ये महाराजा जसवंतसिंहाचा मृत्यू झाल्यावर औरंगजेबाच्या फौजानी जोधपूर लुटल्याची इतिहासात नोंद आहे अदाधुंदीच्या व क्रौर्याच्या त्या काळात हिंदूच्या धर्मस्थलांचा व स्मारकांचा विध्वस होत असताना मृत महाराजा जसवंतसिंहाचा मुलगा व जोधपुरचा राजा गज-उद्धार ग्रंथ लिहितो आणि एक जैन कवि माताजी री वचनिका लिहितो हे अतिशय महत्त्वपूर्ण आहे.

त्रोटक वृत्तात रचलेले २५० पदाचे 'गुण विजय व्याह' बारहट मुरारीदासाने

१७१८ मध्ये लिहिले. कवी कृष्ण-रुक्मिणीची कथा सांगून भक्तिलाभ होण्याची आशा व्यक्त करतो. काव्यात दिलेल्या पुढील काही घटनांवरून त्याचे वेगळेपण लक्षात येईल :

युद्धाच्या फलश्रुतीची चौकशी करण्यासाठी भीष्मक एक दूत रुक्मैयाकडे पाठवतो; शिशुपालाच्या बायकानी त्याच्या पराभूत पतीविषयी काढलेले उद्गार पराजयानतरच्या रुक्मैया व शिशुपाल याच्या मानसिक अवस्थेचे क्रमशः वर्णन आले असून ते अतिशय उपरोधिक शैलीत केलेले आहे लज्जेमुळे रुक्मैया शिकारीच्या नावाखाली रानात जाऊन तोंड लपवतो, तर शिशुपाल कोल्हयाने बिळात लपावे त्याप्रमाणे स्वतःच्याच घरात दडून बसतो. अशा प्रकारे कवीने कथेला नवी छटा दिली आहे. प्रस्तुत काव्याच्या काही पदांवर राठोड पृथ्वीराजच्या वेलिचा परिणाम झाल्यासारखे वाटते

याच कथेवरील किसन किलोल हे दुसरे काव्य १७३० मध्ये आसने रचले. हे एक मनोरंजक काव्य असावेसे वाटते; पण त्याच्या मजकुराचा सुरवातीचा व मधला भाग नाहीसा झालेला आहे.

महाभारताच्या सभापर्वावर हरिदास लालसने 'गुण छमा प्रब' हे निवेदनात्मक काव्य लिहिले. याची भाषा त्या मानाने सोपी आहे. भक्तकवी पीरदान लालस-विषयी आपण विचार केला आहेच. हरिदास हा त्याचा मुलगा. १७५० मध्ये तो मारवाडातील जुढिया गावी राहात होता.

बारहट नरहरिदास सावलोत (१७२३ – १७६३ अदाजे) याच्या गुण राम वार नीसाणीमध्ये रामाची कथा सांगितलेली आहे. यात २०९ नीसाणी असून भाषा ओघवती व सोपी आहे.

कृपाराम खिडिया (१७४३ – १८३३) हा सीकरच्या रावराजा देवी-सिंहाच्या मर्जीतला होता. राजियै रा दूहा (किंवा सोरठा) या त्याच्या द्विचरणा-त्मक नीतिपदासाठी तो विख्यात आहे या दोहयांची एकूण संख्या १६५ आहे. कवीचा एक प्रामाणिक चाकर राजिया ह्याला उद्देशून ते रचलेले आहेत म्हणून त्याचे नाव प्रत्येक दोहयात आलेले आहे. राजिया निपुत्रिक होता आपल्या मागे आपला वंश संपेल याची त्याला नेहमी खंत वाटे. त्याची ही व्यथा जाणून कवीने त्याला आपल्या दोहयांमधून अमर करून टाकले. सामान्य माणसाला हे दोहे राजियानेच लिहिले असे वाटते. या दोहयामध्ये मोजक्या परिणामकारक शब्दात लोकप्रिय उपमा देऊन, साध्या सोप्या भाषेत सुज्ञपणाच्या गोष्टी सांगितलेल्या आहेत. दुसऱ्या कोणाही कवीला लाभली नसेल इतकी लोकप्रियता या दोहयानी ते लिहिणाऱ्या कवीला मिळवून दिली आहे.

अनेक कवींनी, अलीकडच्या काळातील कन्हैयालाल सेठियानेदेखील, या दोह्याच्या धर्तीवर द्विचरणात्मक पदे रचली आहेत कृपाराम विरचित दोहयाची काही उदाहरणे पहा :

'अरे राजिया !

सागरात अगणित मोती भरलेले आहेत; पण ते मिळवायचा प्रयत्न जर केला नाही तर त्यात सागराचा काही दोष नाही.'

'काळया व कुरूप कस्तुरीचे नाजुक तराजूंवर 'तोळा' व 'मासा'नी वजन करतात आणि तिचे मोलही खूप असते. (या उलट) साखर, शुभ्र असूनही, तिची किंमत त्या मानाने कितीतरी कमी असते आणि तिचे वजनही मणांमध्ये करतात.'

'समोर असलेले लक्ष्य गाठण्यासाठी माणूस सर्व प्रकारचे प्रयत्न करतो आणि अडथळयाची पर्वा करीत नाही, जसे, आजारी माणूस औषध कडू असले तरी त्या-पासून परावृत्त होत नाही.'

'गांधीलमाशी, जळू, मासा आणि बेडूक हे सर्व कमळाबरोबर पाण्यातच राहतात पण त्यांना त्याचा सुवास माहीत नसतो. 'भ्रमर' किंवा प्रियकरालाच काय ती मकरंदाची चव माहीत असते.'

दक्ष आणि खरा मित्र कोणते काम करणार नाही सांगा ? कृष्णाने देखील स्वहस्ते अर्जुनाचा रथ हाकला होता.'

कवित्त चालेराय, चालकनेची, सद्‌वृत्त वर्णन, आणि काही सकीर्ण पदे असलेला अलंकारशास्त्रावरील प्रबध, हे कृपारामाचे इतर लेखन होय.

पेशवा (सिरोही) गावाच्या चारण बख्ताजीचा मुलगा ओपा आढा (अंदाजे १७५२–१८४३) हा सुप्रसिद्ध भक्त कवी होता त्याने बरीच डिंगल गीते लिहीली असे म्हणतात. पण त्यापैकी वीस काय ती टिकली. ही गीते भक्तीचा मार्ग दाखवतात. ती अत्यत हृदयस्पर्शी आहेत. इतिहास व सामान्य जनजीवनातून घेतलेल्या उपमा आणि सोप्या शब्दसमूहांनी ही गीते परिपूर्ण आहेत. ईश्वरेच्छा बलियसी या गोष्टीकडे सकेत करीत तो मोगल साम्राज्याच्या पतनाचे व मराठा सत्तेच्या उत्कर्षाचे उदाहरण देतो.

'ईश्वराने प्रारब्धात काय मांडून ठेवले आहे ते कोणालाच ठाऊक नसते. कधी नाव गाडी वाहून नेते तर कधी गाडी नाव वाहून नेते. ईश्वराचे मार्ग विलक्षण आहेत तो दिल्लीचा नाश करतो आणि दक्षिणेला सत्तेवर आणतो. सर्व मानवी प्रयास विफल होतात. ईश्वराच्या इच्छेप्रमाणे सारे होते आणि औरंगझेबाचे सिंहासन बुडते व सातारा गादीचे वर तरंगते.'

गीताच्या चरणापैकी एका चरणात तो म्हणतो–

'जे संपत्तीचे दान करतात ते बचावतील पण जे संपत्ती लपवून ठेवतात. ते ती घालवतील. बीसलदेवाची बीस कोटीची सपत्ती ज्या पाण्यात लपवलेली होती त्याच पाण्यात बुडाली.'

भक्तिकाव्यात अशी गीते अद्वितीय होत काही प्रमाणात केसरसिंह जैताबतने अशा प्रकारची रचना केली बाकी अन्य कोणत्याही कवीची ओपाशी या बाबतीत तुलना होऊ शकत नाही. ओपा म्हणतो :

'शरीर नाश पावणारे आहे म्हणूनच विष्णूचे स्मरण करा, गोड बोला व दान-धर्म करा. पर्वतावरून खाली वाहणाऱ्या पाण्याप्रमाणे मानवी जीवन वाहून जाते.

मानवी शक्ती एक कणदेखील हलवू शकत नाही जन्म आणि मृत्यूवर ईश्वराची सत्ता आहे आपण दुसऱ्या माणसाला मारले याचा माणसाला गर्व वाटतो, पण आपण दैवाच्या हातातील फक्त एक खेळणे आहोत याची त्याला अजिबात जाणीव नसते'

मध्यकालीन चारण काव्याच्या पौराणिक व धार्मिक शाखेचा ओपा ओढा हा अखेरचा महान कवी होय.

## आख्यान काव्य

मध्यकालीन राजस्थानी काव्याचे एक लक्षणीय वैशिष्टय म्हणजे संत काव्याखेरीज आख्यान काव्याचा उदय आणि उत्कर्ष. या कालखडात लिहिल्या गेलेल्या असंख्य आख्यान काव्यापैकी काही महत्त्वाच्या व लोकप्रिय आख्यानांचाच फक्त आपण या ठिकाणी परामर्श घेऊ या.

डेल्हजी (१४३३–१४९३) ने लिहिलेले कथा अहमनी हे ७१२ पदाचे, (दोहा, चौपई आणि छद) आख्यान काव्य आहे. ते धनासी, मारू, सोरठ, गवडी, धवल आणि आसाधहडी रागात गाण्यासारखे आहे महाभारतातील एक वीर अभिमन्यूची कथा सागणारे ते एकमेव मोठे निवेदनात्मक काव्य आहे. अनेक लोकप्रिय समजुती, रुढी व स्थानिक रगछटाचे स्पष्ट ठसे यांनी काव्याच्या कथेला आकार दिलेला आहे

कृष्णाने अहलोचन दानवाचा वध केला त्या दानवाच्या गर्भवती पत्नीच्या पोटी अहदानवाचा जन्म झाला बापाच्या मृत्यूचा सूड घेण्यासाठी कृष्णाला एका मत्रसिद्ध ताईतामध्ये कैद करून ठेवायचा डाव अहदानवाने आखला; पण कृष्णाने अहदानवाच्या तोडाला पाने पुसली आणि त्यालाच काळा भुंगा करून ताईतामध्ये कैद करून टाकले.

कृष्णाच्या बहिणीने सुभद्रेने जिज्ञासेने तो ताईत उघडला तेव्हा त्या काळ्या भुंग्याने तिच्या तोडावाटे तिच्या गर्भाशयात प्रवेश केला. सुभद्रेचे नतर अर्जुनाशी

लग्न झाले. काळ्या भुग्याच्या रूपात अगोदरच तिच्या गर्भाशयात प्रवेश करून बसलेल्या अहदानवाने नंतर अर्जुनाचा पुत्र अभिमन्यू म्हणून तिच्या पोटी जन्म घेतला. अभिमन्यूचे बैराट येथे उत्तरेशी लग्न, चक्रव्यूह फोडण्याचा त्याचा निर्णय, उत्तरेला हस्तिनापूरला आणण्यासाठी बैराटला गेलेल्या सारवानांचा-रैबारीचा प्रवास, बैराट येथे परिवाराला झालेले दुःख, आपत्ती टाळण्याचा सुभद्रेचा निष्फळ प्रयत्न, तिचा व उत्तरेचा शोक, अभिमन्यूचा मृत्यू, अर्जुनाचे परत येणे आणि त्यानंतरच्या घटनांचे मोठे परिणामकारक वर्णन केलेले आहे काव्याच्या अखेरीस सूचित केले आहे की अभिमन्यूचा मृत्यू हा कृष्णाचाच हेतू होता, कारण तो कृष्णाचा शत्रू अहदानवाचा अवतार होता.

प्रस्तुत काव्यात घरगुती वातावरण आहे. एक प्रकारची असहाय्यता त्यात व्याप्त झालेली दिसते. सामान्य मानवी भावना त्यात अभिव्यक्त केलेल्या आहेत. खुमासदार, मुद्देसूद सवादाच्या रूपात ते बहुतांशी लिहिलेले आहे. शकुन, स्वप्ने व त्यांवरील विश्वास, सामाजिक चालीरिती आणि आचरण, विभिन्न पात्रांच्या भावना आणि वेशभूषांची वर्णने हे सर्व सोप्या व आकर्षक पद्धतीने सादर केलेले आहे

बैराटमध्ये, उत्तरेला घेऊन जाण्यासाठी आलेल्या सारवानाला उत्तरेची आई विचारते :

'कुंतीने काय केले, सांग ? तिने तिचे पाचही पुत्र, पंच पांडव मागे ठेवले आणि भीम, नकुल व सहदेवसारखे वीर उभे असतानाही तिने लहान नातवाला (अभिमन्यूला) शत्रूला तोंड देण्यासाठी पाठवले ? वा, काय शूर आहेत ते ! राजा (युधिष्ठिर) कोवळ्या नातवाला एकट्याने युद्धासाठी जायला सांगतो किती अजब आहे ! पण त्यांची ही वर्तणूकही कदाचित अनपेक्षित नसावी. कौमार्यावस्थेत कर्णाला जन्म देणाऱ्या निर्लज्ज आईच्या पोटी जन्माला आलेल्यांकडून आणखी कसली अपेक्षा करावी !'

रैबाऱ्याने जेव्हा यावर आक्षेप घेतला तेव्हा ती म्हणते :

'आमचे आमच्या कन्येवर जिवापलीकडे प्रेम आहे; पण अरेरे ! ते प्रेम देखील या प्रसंगी काही मदत करू शकत नाही अरे पाथस्था ! मी जे काही बोलले ते आईचे आतडे तुटते म्हणून बोलले. तो माझा कमकुवतपणा समज आणि पांडवांना त्यातील काही सांगू नकोस. सर्व काही हरल्यावर उठून निघून जाणाऱ्या जुगाऱ्यांसारखे आम्ही आहोत. पणात आम्ही आमची सर्व संपत्ती घालवून बसल्यासारखे आम्हाला वाटले.'

कुंतीने जेव्हा सुभद्रेला शांत करण्याचा आणि अभिमन्यूला युद्धावर जाण्यासाठी परवानगी देण्याकरता तिचे मन वळवण्याचा प्रयत्न केला तेव्हा सुभद्रा म्हणते :

' सासूबाई, मी ठीक रहावे अशी तुमची इच्छा असल्यास राजाकडे जाऊन खात्री करून घ्या की भीमासारखे वीर घरी असताना लहान मूल युद्धासाठी गेल्यास त्याना आनद होईल का ? अभिमन्यूचे वडिल देवाना त्यांच्या युद्धात मदत करण्याठी दूर देवलोकी गेलेले आहेत आणि मी, त्याची आई, त्याचे रक्षण करण्यासाठी इथे एकटी आहे. असे असताना, तुम्ही जर तुमची मुले मागे ठेवली आणि माझ्या एकुलत्या मुलाला मृत्यूला तोंड देण्यासाठी पाठवले तर ते योग्य होईल का ?'

पदम् भगतने १४९३ ते १५०० च्या दरम्यान रचलेले 'क्रिसनजी रो ब्यांवलो' (किंवा रुक्मणी मगल) हे राजस्थानच्या उत्तर आणि पश्चिम विभागातील लोकामध्ये फार लोकप्रिय आहे आणि लोकांची त्यावर इतकी उत्कट श्रद्धा आहे की त्याला लोकांचे भागवत म्हणता येईल. २६५ पदांचे ते एक आख्यान काव्य असून मारु, रामगिरी, सोरठ, केदारी, सिंधु, हंसो, धनाश्री, वेलौली आणि देवसाख इत्यादी लोकप्रिय संगीत रागांमध्ये व चालीमध्ये गाण्यासारखे आहे नंतरच्या काही हस्तलिखितामध्ये काव्याचे शुद्धीकरण करून वाढवलेली आवृत्ती दिलेली दिसते. कवीच्या त्याच पद्धतीच्या अन्य स्फुट पदांची भर त्यात घातल्याने तसे झाले आहे. मूळात हे भक्तीकाव्य असून मधूनमधून वीर रसाची पेरणी केलेली आहे. कृष्ण आणि रुक्मिणीच्या विवाहाचे वर्णन यात आहे सपूर्ण काव्यात कृष्ण नायक व उद्धारकर्ता आहे रुक्मिणीचे हरण करण्याच्या उद्देशाने कृष्ण कुडनपुरला प्रस्थान करतो. त्याच्या बरोबर त्याचा भाऊ आणि सैन्य आहे या कथेवरील अन्य काव्यामध्ये तो एकटा गेल्याचे सांगतात, पण तो एकटा जात नाही. तो तिला गुपचूप पळवून नेत नाही तर तिला धरून आपल्या रथात बसवतो आणि आपले हे धाडसी कृत्य शंखनाद करून जगजाहीर करतो लग्नाच्या लोकप्रिय प्रचलित चालीरिती व परंपराचे कवीने सुरेख प्रतिभासंपन्न वर्णन केले आहे.

याच कथेवर पदम् भगतने कित्येक गाणीही रचली आहेत. ती सर्व मिळून संपूर्ण प्रसगाचे एक आकर्षक चित्र सादर करतात हीच शैली नतर सूरसागरमध्ये आढळते रुक्मिणीच्या व्यथाचे वर्णन करणारी काही गाणी आपल्याला मीराच्या पदांची आठवण करून देतात भक्तिपर आख्यान काव्याच्या क्षेत्रात 'व्यांवलो'ला बरेच उच्च स्थान आहे

व्यांवलोच्या पुढील काही ओळी पहा विवाहाच्या वेळी बायका हे गातात.

' कन्हैया तुझे स्वागत असो, पण तू महादेवाला का बरोबर घेऊन आलास ? त्याला आक व धतूरा आवडतो आणि मुलांना त्याची भीती वाटते हे कन्हैया ! तुझ्या वऱ्हाडी मंडळीत महादेव आहे, आम्ही प्रेमाने तुला देत असलेली ही लापशी खा. तुझी बहीण सुभद्रा अर्जुनाबरोबर पळून गेली होती हे विसरू नकोस आणि कुंतीने, तुझ्या आत्याने, लग्नापूर्वीच कर्णाला जन्म दिला होता. तुझा भक्त पदम,

या उपहासातून तुझी पूजा करतो कारण तुला दूषणे दिली म्हणजे तू भक्ताच्या आग्रहाखातर त्याची प्रार्थना मान्य करतोस हे सर्वांना ठाऊक आहे.'

मेहोजी (१४८३–१५४४) ने १५१८ च्या सुमारास रामायण रचले. त्यात २६१ पदे (दोहा व चौपई) असून रामाच्या जीवन कथेतील प्रमुख घटना सांगितलेल्या आहेत. राम-काव्याच्या परंपरेतील ते अगदी प्रारंभीचे आख्यान काव्य आहे. धनासी, रामगिरि, हंसा, मल्हार आणि गैतश्री या लोकप्रिय रागामध्ये गाण्यासाठी ते रचलेले आहे. कथेत थोडा फेरबदल आढळतो. तो राम कथेविषयी प्रचलित तत्कालिन लोकपरंपरेतून घेतलेला असावा. मेहोजीने दोन नवीन पात्रे निर्माण केली आहेत : भोज, रावणाचा विश्वासू सखा आणि वाराही, रावणाची बहीण. रामकथेवरील अन्य आख्यान काव्यात ती आढळत नाही स्वयंवराच्या वेळी सीतेशी लग्न करून कोण तिला घेऊन गेला याची चौकशी रावण भोजापाशी करतो. भोज पंचमढीला येतो आणि आजारपणाचे ढोंग करून रात्रभर तेथे मुक्काम करण्याची परवानगी सीतेपाशी मागतो. तो सीतेला नीट पाहतो आणि रावणाकडे जाऊन त्याला सगळा वृत्तांत देतो पृथ्वीच्या पाठीवरील ती सर्वांत सुंदर स्त्री असल्याचे तो रावणाला सांगतो. रावण त्याला आपल्या सर्व राण्यांशी, अगदी दंतकथात्मक मंदोदरीशीदेखील सीतेच्या लावण्याची तुलना करायला सांगतो. तरीदेखील सीताच अधिक देखणी असल्याचे भोज प्रतिपादन करतो. त्यावर रावण सीतेचे अपहरण करायचा निश्चय करतो आणि ज्योतिषाला विचारून त्या कामगिरीवर निघतो.

वाराही लंकेतील, तिच्या पैतृक घरातील नातेवाईकांच्या कुशलक्षेमाची एका प्रवाशाकडे चौकशी करते. 'तेव्हा तिला कळते की तिच्या भावाने सीतेचे अपहरण केले असून परिणामी लंकेत रणधुमाळी माजली आहे. युद्धात रावणाचा पराभव होईल हा आपला अंदाजदेखील तो प्रवासी तिला सांगतो.

काव्यगत सौंदर्य, भाषा आणि शैली या दृष्टीने काव्य महत्त्वपूर्ण आहे. कथा बहुतेक संवादरूपात आहे अनेक लोकप्रिय समजुती व चालीरितीचे वर्णन त्यात आहे.

बहुतेक सर्व पात्रांमध्ये मानवी भावनांचे प्राबल्य आहे.

रावण म्हणतो, 'किल्ल्याचे वैभव तटबंदीत आहे आणि भिंतीचे तिच्या सरळ उभेपणात आहे. माझ्या अंतःपुरातील लावण्यवतींच्या पुढे सीतेचा काय पाड ? तू सीतेची काय प्रशंसा करणार ?' भोज रावणाला उत्तरतो, 'तुझ्या चौसष्ट हजार राण्यांहून, अगदी पट्टराणी मंदोदरीहूनही सीता खूपच अधिक सुंदर आहे. मला तिच्या सौंदर्याचे वर्णनच करता येणार नाही.'

वनवासात राम रामसरोवर नावाचे एक सरोवर निर्माण करतो. लक्ष्मण

त्याला बाध घालतो. सीता डोक्यावर सोन्याच्या दोन घागरी घेऊन आणि हातात कळशी घेऊन त्या सरोवरातून पाणी आणते. आणलेल्या पाण्याने ती रानातील कवठी चाफा, मरवा आणि केवड्याचे सिंचन करते. राजस्थानाच्या उत्तर–पश्चिम विभागात अशा प्रकारचे दृश्य आजही सामान्य, चित्ताकर्षक व आवडते आहे. सीतेच्या अपहरणानंतर राम दु:खाने उसासे सोडतो आणि लक्ष्मण त्याचे सांत्वन करण्याचा प्रयत्न करतो हनुमान त्याच्या राकट सहानुभूतीने म्हणतो, 'एका सीते-साठी इतके दु:ख कशाला ? मी तुझ्यासाठी वीस सीता आणून देतो.' राम त्याला सांगतो, 'हनुमाना, वेडा आहेस तू सीता लाखात एक आहे अरे बाबा, तिच्या-सारख्या वीस तू कशा आणणार ?'

लकेमध्ये अशोक वाटिकेत सीतेला हनुमानाने टाकलेली रामाची मुद्रिका सापडते आणि ती म्हणते, 'ही मुद्रिका इथे कशी आली ? रामाला मृत्यू आला असावा, त्याचा वध झाला असावा किंवा हे सर्व स्वप्न असावे. नाही तर ही मुद्रिका इथे कशी येईल ?' यावर हनुमान म्हणतो, 'राम मरण पावलेला नाही, त्याचा वध झालेला नाही की तू स्वप्नात नाहीस. रामाची ही मुद्रिका हनुमानाने येथें आणली आहे.'

निंबार्क संप्रदायाच्या परशुराम देवाचार्य (१६ वे शतक) याने 'अमर-बोध', 'नाम निधी' यासारखी लीला काव्ये लिहिली. ही आख्यानकाव्याच्या स्वरूपाची असली तरी 'संत काव्या'च्या अतर्गत अन्य लीलाकाव्यांबरोबर अन्यत्र त्याचा परा-मर्श घेतलेला आहे

कित्येक निवेदनात्मक काव्यें व सकीर्ण पदांपैकी केसोदास गोदारा (१५७३–१६७९) च्या चार आख्यानकाव्यांची या ठिकाणी दखल घ्यायलाच हवी : कथा भीव–दुसासणी (६६), कथा सुरगारोहणी (२१७), कथा बहसोवनी (५५०) आणि प्रहलाद चिरत (५९६).

मारू, धनाश्री, केदारो, सोरठ, हसो, मल्हार, गवदी, सिंधु या रागांमध्ये गाण्यासाठी याची रचना केलेली असून ते बहुधा दोहा व चौपई छदात आहेत. 'कथा भीव दुसासणी'मध्ये द्रौपदीचा अवमान केल्यामुळे दुःशासनाला भीमाहाती आलेल्या मृत्यूची कथा सांगितलेली आहे, 'कथा सुरगारोहणी'मध्ये पांडवाच्या स्वर्गा-रोहणाची कथा सांगितलेली आहे, 'कथा बहसोवनी'मध्यें पडु राजाचे नरकात अधो-गमन व त्याच्या मोक्षासाठी पाडवानी केलेल्या स्वर्णयज्ञाचे वर्णन आहे. 'प्रहलाद चिरत'मध्ये प्रल्हादाची गोष्ट सांगितलेली आहे.

या सर्व काव्यामध्ये बारीकसारीक तपशिलाच्या बाबतीत मूळ पौराणिक कथाचा आधार थोडा फार सोडून कवीने लेखन केले आहे. काव्यरचनेच्या काळी प्रचलित असलेल्या समजुतींच्या संदर्भात कवीने कथांचा अर्थ लावला आहे

केसोदास गोदाराच्या सर्व काव्यांमध्ये काव्यात्म गुणवत्ता व लोकप्रियतेमुळे 'प्रहलाद चिरत'चा बराच वरचा क्रमांक लागतो. राजा जमघट कुठलाही तारतम्य विचार केल्याशिवाय प्राण्यांना ठार मारीत असे. याला आळा घालण्यासाठी रोज याला एक हरीण पाठवायचे असे सर्व हरणांनी मिळून ठरवले एकदा एका लगडया हरणाची पाळी आली. जाता जाता वाटेत त्याला एक हरिणी भेटली. दोघांचे एकमेकांवर प्रेम बसले व दोघे मिळून राजाकडे गेले. त्यांचे परस्परावरील गाढ प्रेम पाहून राजाने हरणाला सोडून दिले हरिणी त्यावेळी गर्भवती होती. हरिणीने १८ महिने बाळाला जन्म दिला नाही कळा सोसत ती तशीच बसून राहिली त्या मार्गाने शंकर पार्वती चालले होते तिला कळा सोसताना पाहून पार्वतीने तिला वेदनामुक्त करण्याची विनंती शंकराला केली महादेवाकडून बरेच वर मिळवल्यावर मूल बाहेर आले. तोच हिरण्यकश्यप होय.

बाकीची कथा प्रचलित पौराणिक कथेनुसार आहे. मानवी भावना, दुर्बलता, सुख आणि दु:ख या सर्वांची काव्यात अभिव्यक्ती केलेली आहे. 'चिरत'मधील काही ओळी खाली दिलेल्या आहेत :

' महादेव आणि पार्वतीच्या जाण्याच्या मार्गावर मोठमोठ्याचा 'हरि' 'हरि'चा जप करीत हरिणी बसून राहिली ते बघून पार्वती शंकाराला म्हणाली, " हे सर्वज्ञ प्रभू, ही गरोदर हरिणी अशा क्लेशदायक अवस्थेत किती दिवस जगणार ? तिला कृपा करून त्यातून मुक्त करा. मी स्वत: आई असल्याने मला तिच्या वेदनाची कल्पना आहे. शंकर म्हणाले, " प्रिये, तिचे कर्म तसे असल्यास तिला या जन्मातच नव्हे तर पुढील अनेक जन्मांतही यातना सहन कराव्या लागतील." पार्वती रागावून म्हणाली, " तुम्ही कानात कुंडले घातलेले व डोक्यावर जटाजूट असलेले जोगी आहात. तुम्ही निर्वसन व कुठलीही मालमत्ता नसलेले आहात. या सर्वांमुळे कोणत्याही संसारी गृहस्थाला लाज वाटेल. तुम्ही गोसावी आहात व रानात राहाता. नंदीवर आरूढ होऊन भिक्षेसाठी जाता. दुसऱ्याला अडचणीत टाकणाऱ्या या सर्व गोष्टी तुम्हाला दिखाऊ वाटतात. जो कुणाचाही सल्ला ऐकत नाही. घेत नाही, तसेच काही करायला तयार होत नाही त्याच्याबरोबर संसार करणे अशक्य आहे " असे म्हणून नंतर तिने गोड शब्दांनी महादेवाला रिझवण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ ! मग तिने देवाला धमकी दिली "हे असे दृश्य बघूनही तुम्हाला कळवळा आला नाही तर यापुढे आपले पतिपत्नीचे संबंध राहणार नाहीत."

धमकीचा परिणाम झाला आणि महादेवाने हरिणीची वेदनांमधून सुटका केली.'

सुरजनदास पूनिया (१५८३–१६९१) चे 'कथा उषा पुराण' (२३२ पदे) हे लोकप्रिय चालीमध्ये गाण्यासाठी लिहिलेले आहे. उषा आणि अनिरुद्ध या पौराणिक

पात्राच्या प्रेम प्रकरणाची व विवाहाची कथा यात सांगितलेली आहे. कृष्ण आणि शिव याच्यात युद्ध झाल्याची लोकप्रिय दतकथा आहे. या काव्यात मात्र तेच युद्ध क्षत्रिय आणि जोगीमध्ये झाल्याचे दाखवले आहे.

इनपालसर (चुरु) गावचा सिणावा राजपूत गोरधनजी हा १८ व्या शतकातील जसनाथी सप्रदायाचा कवी होता त्याचे 'गौर व्यांवलो' (१२१ पदे) हे गाण्यासाठी असून, पौराणिक धर्तीवर शिव-पार्वतीच्या विवाहाची कथा त्यात सांगितलेली आहे सबैनगरीचा राजा सबैंराजची आख्यायिका कवीने यात दिलेली आहे. पार्वतीच्या आईला शिवापेक्षा तो अधिक पसत होता आणि त्याचीही पार्वतीशी विवाह करण्याची ईच्छा होती. अखेर सबैराज मारला जातो व शिवाचे पार्वतीशी लग्न होते. आख्यानात स्थानीय रग भरपूर असून तत्कालिन लोकांच्या चालीरिती व परंपरा सागितलेल्या आहेत. पार्वतीची आई चद्रावतीची मानसिक अवस्था आणि काही प्रसंगाचे वर्णन उल्लेखनीय आहे

१६७३ मध्ये मरण पावलेल्या 'दुदोजीचे हरचद पुराण' आणि 'प्रहलाद पुराण', १७१८ मध्ये मरण पावलेल्या रूस्तमजीचे 'किसन ब्यांवलो'; सरवणजी (१७ वे शतक)चे 'सीत पुराण' आणि 'हरकीरत पुराण' ही या कालखंडातील आणखी काही नामाकित आख्यान काव्ये होत

## संत काव्य

भक्तीच्या सगुण आणि निर्गुण पद्धतीशी संबधित काव्याचा प्रस्तुत शीर्षकांतर्गत विचार केलेला आहे. ज्या काव्याचे असे वर्गीकरण करता येत नाही, पण जी भक्तीपर स्वरुपाची आहेत त्याचीही येथे दखल घेतलेली आहे. सत काव्य आणि आख्यान काव्याचा उदय व वर्चस्व ही मध्यकालाची मुख्य वैशिष्टघे आहेत. लोक साहित्याच्या बाबतीत राजस्थानी जितकी समृद्ध आहे तितकीच सत काव्याच्या बाबतीतही आहे. सत काव्याचे एक मुख्य लक्षण म्हणजे ते सगुणोन्मुख निर्गुण भक्तीवरील आहे. काही वेळा नाथ साधनेत लोकप्रिय असलेली योग-पारिभाषिक शब्दावली वापरून योग साधनेविषयीही सांगितलेले आहे.

या सतकाव्याची पार्श्वभूमी व हेतुत्व पाच मुख्य ऐतिहासिक घटकानी तयार झाले आहे '

(१) नामदेव (१२७०–१३५०) आणि त्याचे हिंदी काव्य. मा अशा प्रकारच्या संत काव्याचा तो अग्रगामी होता.

(२) रामानद (१२९९–१४१०) आणि त्याच्या शिष्याची भक्ती साधना.

(३) नाथ, त्यांची योग-साधना व साहित्य

(४) उपनिषदे, पुराणे, रामायण, महाभारत, प्रस्थानत्रयी, स्मृती आणि शांकर वेदान्त यातून मुख्यतः आलेल्या धार्मिक, सांस्कृतिक व तत्त्वज्ञानात्मक प्रवाहाशी संबंधित लोकप्रिय चालीरिती व परंपरा.

(५) इस्लामाच्या आगमनाने झालेल्या प्रतिक्रियेसकट, तत्कालीन सामाजिक व ऐतिहासिक परिस्थिती.

ही परंपरा संपन्न करणाऱ्या कवींचे दोन वर्ग करता येतील : एक, विभिन्न संप्रदायाचे आद्य प्रवर्तक, प्रतिपादक व अनुयायी यांचा आणि दुसरा कोणत्याही धार्मिक बंधनांपासून वा संप्रदायांपासून मुक्त असलेल्यांचा.

## विभिन्न संप्रदाय व त्यांचे काव्य

मध्यकालात राजस्थानात अनेक संप्रदायांची निर्मिती व उत्कर्ष झाला. साहित्य, कला किंवा तत्त्वप्रणालीत मोलाची भर टाकणाऱ्या प्रमुख संप्रदायांची यादी पुढे दिली आहे :

| संप्रदायाचे नाव | प्रवर्तक किंवा प्रसारक | पीठ, स्थान आणि राजस्थानातील प्रदेश |
|---|---|---|
| १. नाथ | गोरखनाथ आणि इतर | संपूर्ण राजस्थान |
| २. रसिक (राम-भक्ती-मध्ये) | अग्रदासजी | रैवासा (सीकर), जयपूर विभाग |
| (रामावत बैरागी) | अनंतानंदजी | गलता, जयपूर विभाग |
| ३. बिष्णोइ | जांभोजी | पीपासर, मुकाम, संभराथल, जांभोलाव, गागलू, इत्यादी उत्तर-पश्चिम आणि दक्षिण विभाग |
| ४. जसनाथी | जसनाथजी | कटरियासर, उत्तर-पश्चिम विभाग |
| ५. निरंजनि | हरिदासजी | डिडवाना, नागोर, जोधपूर विभाग |
| ६. निंबार्क | परशुरामदेवजी | सलेमाबाद, अजमेर, किशनगढ विभाग |
| ७. दादू | दादूदयालजी | नारायणा, जयपूर, शेखावाटी विभाग |

| | | |
|---|---|---|
| ८. लालदासी किंवा (लालपथ) | लालदासजी | नगला, रसगण इ. अल्वर, भरतपूर विभाग |
| ९. चरणदासी किंवा शुक | चरणदासजी | दहरा, अल्वर, जयपूर विभाग |
| १०. गुदड | सतदासजी | दाँतडा, भीलवाडा |
| ११. राम सनेही | रामचरणजी | शाहपुरा, भीलवाडा, उदयपूर विभाग |
| १२. राम सनेही | दरियावजी | रेण, नागोर, जोधपूर विभाग |
| १३. राम सनेही | हरिरामदासजी | सीथल, बिकानेर विभाग |
| १४. राम सनेही | रामदासजी | खेडापा, नागोर, जोधपूर विभाग |
| १५. अलखिया | लालगिरिजी | बिकानेर |
| १६. आइ पंथ | जीजी देवी (आइजी) | बिलाडा, पाली आणि जोधपूर विभाग |

यापैकी प्रत्येक सप्रदायातील मोजक्या व महत्त्वाच्या कवींची फक्त नोंद घेऊन त्याच्या साहित्याचा संक्षिप्त आढावा आम्ही घेणार आहोत

## (१) नाथ संप्रदाय

शिव आदि नाथ असून नाथ सप्रदाय मूळात शैव पथ असल्याचे समजले जाते. ११ व्या शतकात गोरखनाथाचा उत्कर्ष झाला असे म्हणतात. त्यानी सर्व प्रमुख योग सप्रदायाची सघटना करून त्यात नियमबद्धता आणली त्यानी आखून दिलेल्या चौकटीत पुढे या संप्रदायाचा विकास झाला. त्याचा मुख्य भर हठयोग आणि काया–सिद्धीवर होता जीवनमुक्ती हे नाथसाधनेचे लक्ष्य होते. अशा प्रकारे ती साधनेचीच एक पद्धत होती. गोरखनाथाच्या पूर्वी हिंदू, बौद्ध, जैन व अन्य धर्मीच्या अनुयायामध्ये योग आणि तन्त्र साधनेची दृढ परंपरा कोणत्या ना कोणत्या रूपात प्रचलित होती.

नाथ पंथाचे योगी बारा पथ या नावाने बारा शाखांमध्ये विभागलेले आहेत. या नियमबद्धतेच्या बाबतीत चार मते मुख्य आहेत. सर्वमान्य मत असे दिसते की त्या वेळी योग्याच्या जवळजवळ तीस शाखा होत्या त्यापैकी अठरा शैव होत्या आणि बाकीच्या बारा गोरखनाथांच्या आदेशांचे पालन करणाऱ्यांच्या होत्या. कालातराने अठरा शाखांचे योगी लुप्त झाले त्या अदृश्य झालेल्या अठरा शाखांचा आध्यात्मिक वारसा गोरखनाथांना अनुसरणाऱ्या बारांपैकी सहाना मिळाला. अशा

प्रकारे हे सहा आणि गोरखच्या राहिलेल्या सहा शाखा असे मिळून नाथ योग्यांच्या हल्लीच्या बारा शाखा झालेल्या आहेत. त्यांची यादी पुढीलप्रमाणे :

| | | |
|---|---|---|
| (१) सत्य नाथी | (२) राम नाथी | (३) पाकल नाथी |
| (४) पाव पंथी | (५) धर्म नाथी | (६) मन नाथी |
| (७) कपिलानि | (८) गगा नाथी | (९) नातेश्वरी |
| (१०) आइ पथी | (११) वैराग्य पंथी | (१२) रावल पथी |

वेगवेगळ्या सप्रदायामध्ये या यादीत फेरफार आढळतो; पण ही बारा पथाची कल्पना अधिक विश्वासार्ह आहे. हा क्रम सर्वमान्य असून पूर्ण कुंभाच्या वेळी बारा वर्षांनी होणाऱ्या पात्र देव यात्रेत पाळलाही जातो. ही यात्रा गोदावरी नदीच्या तटावरील त्र्यबक येथून सुरू होते, ७३ किंवा त्याहून अधिक स्थानी थाबते आणि अखेरीस कदरी मठ येथे पोहोचते. ही यात्रा शेकडो वर्षे जुनी असून तिच्या प्राचिनत्वाचे अनेक पुरावे मिळतात. तसेच, नव नाथ सुप्रसिद्ध आहेत. पण त्यांची सर्वसामान्य यादी व परपरा सापडत नाही. नाथांना सिद्ध असेही म्हणतात. वर्ण रत्नाकरात ७६ सिद्धांची यादी दिलेली आहे त्यात नाथांचाही समावेश आहे. यावरून असा निष्कर्ष काढता येतो की त्याच्या लेखनकालापासून म्हणजे १३२८ च्या पूर्वीही नव नाथ प्रसिद्ध होते. नोहर (श्रीगगानगर राजस्थान) येथील नाथ मठात २८ सप्टेंबर १०७८ चा एक शिलालेख आहे. त्यावरून ११ व्या शतकातील नाथाचे वर्चस्व लक्षात येते. उपलब्ध साहित्यावरून असे दिसते की वर उल्लेखिलेल्या नाथांच्या बारा शाखापैकी क्रमाक १, ४, ६, ७, ११ व १२ या शाखांचा त्या मानाने राजस्थानात अधिक प्रसार झाला आणि नव नाथांपैकी गोरख, जालधर, गोपीचंद, भरथरी आणि चर्पट हे अधिक प्रसिद्ध होते. राजस्थानाच्या इतिहासात व साहित्यात त्याच्याविषयीचे अनेक सदर्भ उपलब्ध आहेत महत्त्वाची गोष्ट म्हणजे १५ व्या आणि १६ व्या शतकात नाथ संप्रदायाचा राजस्थानात खूप प्रसार झालेला होता आणि तो सुसंघटित होता. नाथाच्या मठाचा व गादींचा तेथे सर्वत्र प्रसार झालेला होता. सर्वसामान्य माणूस त्यांच्याकडे आदराने व भयचकित नजरेने पाहत होता. नाथाचे सामान्य जीवनापासून दूर राहणे, सामान्य माणसाविषयी त्याना वाटणारा तिटकारा, साधना करण्याच्या त्यांच्या कुमार्गी व भ्रष्ट पद्धती, यामुळे नव्याने उदयास आलेल्या जांभोजीसारख्या संतांची नाथाविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया झाली.

सुरवातीच्या नाथाच्या नावावर उपलब्ध असलेल्या काव्याच्या भाषेत राजस्थानीच्या सूक्ष्म छटा स्पष्टपणे दिसून येतात आणि त्याचा घाट मूळात खडी बोलीचा असल्यासारखे वाटते. असे असले तरी हे काव्य ज्याच्या नावावर उपलब्ध आहे त्यानीच ते रचल्याचे ठामपणे म्हणता येणार नाही. अन्य काही कवींची

रचना काही नाथाच्या नावावर रूढ झाली असावी. यात काही संशय नाही या काव्यामध्ये वाणीचेही समिश्रण झालेले आहे. त्या कित्येक नाथांनी लिहिल्या असे मानतात पण त्यांची भाषा तितकीशी प्राचीन नाही. त्याच्या बाबतीत निष्कर्ष घेता येतो की त्या १६ व्या शतकाच्या पूर्वीच्या असणे शक्य नाही. विभिन्न नाथाच्या वाणीचे टीकात्मक संपादन अजून व्हावयाचे आहे म्हणूनच या बाबतीत सावधगिरी आवश्यक आहे.

हे काव्य बहुधा साधना, त्याची पद्धती, सिद्धीची अवस्था, त्याचे तत्त्वज्ञान व शिकवण यावरील आहे पण याखेरीज आणखी अनेक दृष्टींनी ते महत्त्वाचे आहे.

नाथ व त्याच्या साधना, शब्दयोजना व शैली यांचा काही अंशी राजस्थानी साहित्यावर, विशेषतः संत काव्यावर परिणाम झालेला आहे. हठयोग साधनेचा प्राय प्रत्येक संताच्या काव्यात उल्लेख किंवा वर्णन आढळते काही संतानी नाथाचे शब्दही उचलले आहेत पण किंचित वेगळ्या अर्थाने.

गोरखनाथाखेरीज अन्य दोन नाथ लक्षात घेण्यासारखे आहेत. जालंधरनाथ हा जालधरिपा किंवा हाडिपा या नावानेही प्रसिद्ध आहे. हा पाव पंथाचा संस्थापक असल्याचे म्हणतात या पथाचे पीठ गालोरला होते बौद्धधर्माच्या वज्रयान शाखेशी एके काळी या पथाचे सबध होते काही राजस्थानी काव्यामध्ये बौद्ध परंपराचे अस्पष्टसे सादृश्य आढळते, जसे वाराही देवीचे अस्तित्व व तिचे कार्य मेहोजीचे रामायण आणि सुरजननीचे राम रासोही याची उदाहरणे होत. जालंधरनाथ व त्याच्या पंथाचा प्रभाव हे त्याभागचे कारण असावे असे वाटते

दुसरा उल्लेखनीय नाथ म्हणजे चर्पट. रज्जबच्या मतानुसार एका चारण स्त्रीच्या पोटी त्याचा जन्म झाला होता. त्या नात्याने तो राजस्थानचा असल्याचे म्हणता येईल रसायन सिद्धीचा शोध त्याने लावला असे म्हणतात नाथाच्या निव्वळ परिधान व बाह्य स्वरूपाच्या महत्त्वाविषयी नापसंती व्यक्त करणारा तो सर्वांत अगोदरचा नाथ होय. पण उपरोधिक गोष्ट म्हणजे त्याने स्वतः कर्णछेदन करून त्यात कुंडले घातली होती आणि याच कारणास्तव कानफाटा नाथ म्हणून तो विख्यात होता दोष व दुर्गुण उघड करणे व त्यावरील उपाय सुचवणे ही त्याच्या काव्याची मुख्य लक्षणे आहेत. एक उदाहरण पहा.

'हसणारा जोगी, सुस्त साडणी, भिडस्त कवी, मस्कऱ्या, वेश्या, दुर्जन, निर्लज्ज स्त्री, या सर्वांचा उघड धिक्कार केला पाहिजे असे चर्पट म्हणतो.'

गोरख आणि अन्य नाथानुसार संपूर्ण ब्रह्मचर्य हे जीवनासाठी आदर्श आहे. म्हणूनच गृहस्थाप्रति त्यांचे धोरण अत्यंत अनुदार होते. प्रापंचिक माणसाला ते विषयवासना व कामक्रोधादीचा गुलाम समजतात माणूस एकदा संसारात पडला की त्याला ज्ञानाविषयी बोलण्याचा हक्क रहात नाही. असे त्याचे मत होते.

देशी भाषेतील नाथ वाणी १६ व्या शतकात एकत्र करण्यात आल्या असाव्यात असे वाटते. या वाणी एकत्र करण्यामागे अनेक कारणे होती. त्यापैकी एक होते : १६ व्या शतकात नाथ सप्रदायाच्या प्रचलित रूपांची जी अभद्र बाजू होती त्याविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया झाली होती आणि म्हणूनच नाथाना आपल्या मान्यता-प्राप्त गुरूची वाणी एकत्र करून आपल्या धर्मग्रंथाना सन्मान मिळवून देण्याची आवश्यकता वाटली.

पृथ्वीनाथ (१४५०–१५५० अदाजे) हा या कालखंडातील सर्वांत अधिक नावाजलेला नाथ कवी. त्याच्या काव्याचा अस्सलपणाही सशयातीत आहे. आजवर त्याची फक्त चार काव्ये (ग्रंथ)–साध परिख्या, निरंजन निर्वाण, भक्ति वैकुंठ जोग आणि सबदी हीच ज्ञात होती पण विभिन्न हस्तलिखित सग्रहाच्या संशोधनाच्या फलस्वरूप आणखी २५ काव्ये (ग्रथ) व काही पदे हाती लागली आहेत. या २५ काव्यापैकी बहुतेकात शीर्षकाच्या शेवटच्या बाजूस 'जोग ग्रथ' असे नमूद केलेले आढळते. यापैकी काही असे : प्राण पच्चीसी, सिख संबोध आत्मा परचद्, ग्यान पच्चीसी, भरम विध्वंस, तत सग्राम मन षब शरीर साधन, मूल पदम महाग्यान, सोलह कला, सोलह तिथी, इत्यादी.

पृथ्वीनाथाच्या भाषेचा घाट राजस्थानी व काही वेळा ब्रज मिश्रीत खडी बोलीचा आहे. नाथपथाच्या विभिन्न अंगाचा त्यात विचार केलेला आहे. महत्त्वाचा मुद्दा असा की भक्तीकडेही त्याचा ओढा असल्याचे पुरेसे पुरावे या 'ग्रंथा'मधून मिळतात. नाथ सप्रदायाला वेगळे वळण देणाऱ्या या गोष्टीचे पुढे बनानाथ व इतरांनी अनुसरण केले. नाथ साधनेवरील भक्तीचा प्रभाव त्यातून स्पष्टपणे लक्षित होतो. त्याचे एक पद पहा–

'म्हणे पृथ्वीनाथ, जग हे काटचानी भरलेले आहे. हे काटे बाह्यागास भोसकतात व अतर्भागास बोचतात. ईश्वराची भक्ती नसलेला माणूस बाभळीच्या झाडाच्या काटेरी फांदीसारखा आहे.'

त्याने काही विशिष्ट राजस्थानी शब्द, जसे 'पालो' ('पल्लव' पासून), त्यांच्या बोलचालीच्या स्वरूपात वापरले आहेत.

जोधपूरचा महाराजा मानसिंह (१७८२–१८४३) कवी, विद्वान व सगीत-तज्ज्ञ होता. त्याचे काव्य जरी बहुविध व व्यापक असले तरी नाथ सप्रदाय व नाथ काव्यात त्याने टाकलेली मोलाची भर या दृष्टीने ते अत्यत महत्त्वाचे आहे. त्यानतर शृंगार भावना व्यक्त करणाऱ्या त्याच्या गाण्यांचा व पदाचा क्रम लागतो दोन्ही प्रकारच्या काव्याना साहित्यिक मूल्य आहे. त्याने सर्व प्रकारची, लहान व मोठी सुमारे ६० काव्ये लिहिली. ही काव्ये राजस्थानी, ब्रज, खडी, बोली पजाबी आणि

यांपैकी कोणत्याही दोन किंवा अधिक भाषांच्या समिश्र स्वरुपात लिहिलेली आहेत. त्याची काव्ये मुख्यतः खालील चार विषयावर आहेत :

(१) नाथ भक्ती, नाथ पंथ आणि त्याचे तत्त्वज्ञान यावरील त्याच्या काव्याची एक लांबलचक यादी (सुमारे ३१ काव्याची) आहे अनुभव-मंजरी सरूपाण रा दोहा, जलधर ग्यान सागर, इ काव्ये राजस्थानीत आहेत आणि बाकीची काव्ये,–जसे जलधरनाथजी रो चरित ग्रथ, जलंधर-चंद्रोदय, नाथ-चरित, सिद्धसंप्रदाय ग्रथ, सिद्ध मुक्ताफल, तेज-मंजरी, पचावली, नाथ-कीर्तन, नाथ स्तोत्र, जलंधरनाथ री नीसानी, नाथ पद-पुष्पाजली, षड चक्र वर्णन, इ.–राजस्थानी मिश्रित ब्रजमध्ये आहेत.

(२) निसर्गावरील त्याचे उद्यान वर्णन, षड् ऋतु वर्णन यासारखे साहित्य राजस्थानीत आहे.

(३) राम व कृष्ण विषयावरील त्याच्या साहित्यकृती–जसे राम विलास (अपूर्ण), कृष्ण विलास आणि रस-चंद्रिका,–या व्रज भाषेत आहेत.

भक्ती व शृंगारावरील त्याच्या पदाची सख्या खूप मोठी आहे वेगवेगळ्या रागां-मध्ये गाण्यासाठी ती रचलेली आहेत. मारवाडच्या लोकामध्ये लोकप्रिय असलेल्या कित्येक गाण्यांचे कर्तृत्व त्याच्याकडे जाते. अर्थात त्याचा खरेपणा विवादास्पद आहे.

रतना हमीर री वार्ता या वचनिका शैलीतील अत्यंत सुप्रसिद्ध प्रेमकाव्याचे कर्तृत्व काहीजण मानसिंहाला देतात तर अन्य काहीजण उत्तमचद भंडारीला देतात. निश्चित लेखक कोण हे सिद्ध करावयाचे असल्यास अधिक सशोधनाची आवश्यकता आहे.

जोधपूरचा बनानाथ हा १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील विख्यात नाथ सिद्ध कवी होय. नाथ परपरेच्या काव्यात त्याच्या 'अनुभव प्रकाश' आणि 'परवाना' या कृती प्रसिद्ध आहेत. परवाना काव्याच्या शेवटी दिलेल्या नामकालपूर्वक परिसमाप्ती-वरून ते १८५१ मध्ये रचले असावे असे वाटते. अनुभव प्रकाशमध्ये विशिष्ट चाली-मध्ये गाण्याची गीते दिलेली आहेत. आत्मबोध हे त्याच्या काव्याचे मुख्य लक्षण आहे. लोकप्रिय उपमा देऊन त्याने काया-सिद्धि आणि हठयोग साधनेचे वर्णन केले आहे सिद्धि प्राप्त करण्याचे एक साधन या दृष्टीने राम किंवा हरि स्मरणावर त्याचा विश्वास आहे. सोपी आणि लालित्यपूर्ण राजस्थानी भाषा तो वापरतो. नवल नाथ, उत्तम नाथ आणि विवेक नाथ हे त्याच्या परपरेतील उल्लेखनीय कवी होत असे असले तरी त्याचा कल शांकर वेदाताकडे अधिक दिसतो

## (२) रसिक संप्रदाय (राम भक्तीत) आणि रामावत वैरागी

रामानंद (१२९९–१४१०) हा उत्तर भारताच्या सामाजिक, धार्मिक व भक्तिपर क्षेत्रातील प्रगतिशील विचारसरणीच्या स्फूर्तीचा झरा होता. जात व दर्जाचा

कुठलाही भेद न पाळता त्यानेच सर्वांसाठी भक्तीची कवाडे खुली केली. राम भक्तीला त्याच्यापूर्वी कुठल्याही संप्रदायाचे स्वरूप आलेले नव्हते. त्याने स्वतः कुठलाही संप्रदाय स्थापन केला नाही; पण त्याच्या परंपरेतील लोकांनी मात्र नंतर संप्रदाय स्थापन केले. 'ज्ञान' व 'कर्म' यांना विशेष महत्त्व न देणाऱ्या रामभक्तीचा तो प्रथम आचार्य होता दयाळू व प्रेमाच्या भुकेल्या ईश्वराच्या चरणी स्वतःला संपूर्णपणे समर्पित करणे हे भक्तासाठी पुरेसे आहे. तो विशिष्ट द्वैतवादाचा अनुयायी होता. त्याच्यासाठी भक्ती हीच सर्वांत महत्त्वाची बाब होती, अध्यात्मविद्या वा तत्त्वज्ञानाचे तर्क नव्हे. नाभादासच्या भक्तमालमध्ये त्याच्या सुप्रसिद्ध बारा शिष्यांची नावे दिलेली आहेत, त्यात अनंतानद, सुखानद, पिपा आणि कबीर याच्याही नावांचा समावेश आहे. हे सर्व त्याचे प्रत्यक्ष शिष्य होते का या बाबतीत मात्र शंका आहे.

अनतानंदच्या आठ प्रमुख शिष्यांपैकी विशेष उल्लेखनीय आहेत– कृष्णदास पयहारि, अग्रदास आणि करमचद. कृष्णदास हा राजस्थानातील दाहिमा ब्राह्मण होता. जयपुरजवळील गलता येथे त्याने पहिल्यांदाच रामानंद संप्रदायाची गादी स्थापन केली. त्याच्या राजयोग ग्रंथावरून असे वाटते की तो सांख्य-योग तत्त्वज्ञानाचा प्रसारक होता हे आसन पूर्वी कानफाटे नाथ योग्यांच्या ताब्यात होते. पण कृष्णदासाने आपली योग-सिद्धी दाखवून त्यांच्यावर वरताण केली आणि ते आसन मिळवले. या पद्धतीमध्ये योग साधनेचा शिरकाव होण्यामागील अनेक कारणांपैकी हे देखील एक कारण असावे. कीलहृदास आणि अग्रदास हे त्याचे दोन शिष्य त्याच्याहून अधिक प्रसिद्ध होते. रामभक्तीखेरीज योगसाधनेकडेही कीलहृदासाचा ओढा होता आणि त्याला गलता गादीचे आचार्य करण्यामागील ते एक मुख्य कारण होते. रामानंदच्या वैरागी परंपरेत, गलता परपरा ही तपस्वी शाखा म्हणून ओळखली जाते. या शाखेचे साहित्य बहुधा ब्रजभाषेत आहे.

अग्रदासाने मात्र सीकर (राजस्थान)जवळील राइवासा येथे वेगळी गादी स्थापन केली राम-भक्तीतील मधुर-भावाच्या उपासनेचा तो प्रवर्तक होता आणि त्याने निर्माण केलेला सप्रदाय रसिक संप्रदाय या लोकप्रिय नावाने ओळखला जातो. रसिक संप्रदायाचा उद्‌भव जरी राजस्थानात झाला असला तरी तो पसरत गेला आणि राम व सीतेच्या युगल स्वरूपाशी अधिक निगडीत असलेल्या अयोध्या, जनकपूर आणि चित्रकूट येथे त्याचा उत्कर्ष झाला. राजस्थानात तो फारसे मूळ धरू शकला नाही. कारण ईश्वरी अवताराची 'मर्यादा', शौर्यात्मक व तारक बाजू येथील लोकाना अधिक मान्य होती.

रसिक परंपरा १७ व्या शतकापर्यंत कशीबशी तग धरून राहिली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर १८ व्या शतकाच्या सुरवातीला तिला पुन्हा जोम आला. या सप्रदायाचे साहित्य बहुधा ब्रज, अवधी आणि मैथिलीमिश्रित अवधीमध्ये आहे. पण

सियासखी (गोपालदास) आणि कृपादाससारख्या काही मोजक्या कवींनी राजस्थानी व ब्रज मिश्रित राजस्थानीमध्येही पदे रचली. या परंपरेचे अखेरचे महत्त्वाचे काव्य आहे राम रास. १८६१मध्ये रूपदेवीने ब्रज भाषेत ते लिहिले.

सियासखी हा बडागाव (झुंझूनु)चा गौड ब्राह्मण कवी १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला. त्याची किरकोळ पदे उपलब्ध आहेत. त्यांपैकी एक आहे :

'सीते, स्वामिनी, माझ्या विनंतीकडे लक्ष दे भरवसा करण्यासारखे तुझ्याखेरीज अन्य कुणीही मला नाही. माझ्या वर्तनातील दोष बघू नकोस. तुझ्या स्वतःच्या थोरवीकडे तू पाहिले पाहिजेस. मी केलेली प्रार्थना व्यर्थ गेली असे लोकांनी म्हणता कामा नये. हे अवधविहारी प्रिया, मला तुझ्या गृही येऊ दे. तूच माझे सर्वस्व आहेस आणि जिच्या तोंडाकडे पाहता येईल असे तुझ्याखेरीज कुणीही मला नाही', असे सियासखी म्हणतो.

कृपाराम १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला. त्याच्या एका पदात म्हटले आहे :

'हे राघवजी ! तुझे मुखावलोकन करण्यासाठी माझे नेत्र आतुर आहेत म्हणून ये आणि मला दर्शन दे. तुझ्या स्वागतासाठी माझ्या मनाच्या बागेत मोगऱ्याची फुले फुलली आहेत. त्यांचा सुवास घेण्यासाठी भ्रमरासारखा तू ये. तुझ्या दर्शनासाठी कृपानिवास तहानेला आहे. ये आणि माझी तहान भागव

या दोन्ही शाखांच्या परंपरा मुख्यतः जयपूर विभागात व राजस्थानाबाहेर चालू राहिल्या प्रस्तुत अध्ययनात त्यांचा उल्लेख सुसंगतच होईल कारण १८ व्या शतकात अस्तित्वात आलेले रेण, शाहपुरा (भीलवाडा), सीथल आणि खेडापा हे चार राम सनेही संप्रदाय त्यांचे पारंपरिक नाते, अनंतानंद (अनंतदास)चे शिष्य अग्रदास व करमचंदशी जोडतात.

संतदास हा अग्रदासच्या परंपरेतील महान निर्गुण संत कवी होय. दांतडा (शाहपुराजवळ, भीलवाडा) येथे त्याचे आसन होते. तो गूदड किंवा गुदडी (गोधडी) घालत असे म्हणून त्याच्या पंथाला गूदड पंथ म्हणतात राम सनेही संप्रदायाच्या शाहपुरा (भीलवाडा) शाखेचा संस्थापक रामचरणजी याने संतदासाचा शिष्य कृपारामकडून १७५१ मध्ये दीक्षा घेतली होती. संतदासाचा दुसरा शिष्य प्रेमदास याने दरियावजीला १७१२ मध्ये दीक्षा दिली. दरियावजीने रेण (जागोर) शाखा स्थापन केली. काही विद्वानांच्या मते प्रेमदास हा कृपारामाचा शिष्य होता.

सींथल या तिसऱ्या शाखेचा पारंपरिक संबंध करमचंदाशी आहे. त्याच्या शिष्यपरंपरेत ९ व्या क्रमांकावर बुलछसर (बीकानेर)चा जयमलदास होऊन गेला जयमलदास सुरवातीला सगुण भक्त होता, नंतर तो निर्गुण भक्तीकडे वळला काही दैवी निर्देशामुळे त्याच्यात हा बदल झाला. सीथल शाखेचा संस्थापक हरिरामदासला १७५२ मध्ये जयमलदासने दीक्षा दिली. हरिरामदासचा शिष्य

रामदास याने १७५२ मध्ये दीक्षा घेतली. रामदासने १७६३ मध्ये खेडापा गादी स्थापन केली. हिला सींथलचीच शाखा समजतात; पण तिची परपरा वेगळी आहे वरील सर्व सबधाची स्पष्ट कल्पना यावी म्हणून रामानंदापासून पुढील शिष्यपरपरेचा तक्ता पुढे देत आहोत




१. काहींच्या मते करमचद हा सुखानंदाचा शिष्य होता.

२. नारायणदास व प्रेम भूरा यांच्यामध्ये प्रेमपठाचे नावही दिलेले आहे.

३. दामोदरदास व मोहनदास यांच्यामध्ये नारायणदास हे आणखी एक नावही दिलेले आहे.

४. काहींच्या मते प्रेमदास हा संतदासचा शिष्य बलकदास याचा शिष्य होता.

वरील तक्त्यावरून एक गोष्ट उघड आहे की राम सनेही सप्रदायाच्या (रेण, शाहपुरा, सीथल, खेडापा) सर्व शाखा वेगवेगळया असून त्याच्या स्वत च्या परपरा आहेत. पण साधना, भक्ती, आदर्श व विचारसरणीच्या बाबतीत मात्र त्याच्यात वेगळेपणापेक्षा साम्यच अधिक आहे राम-स्मरण व भक्तीवर जास्त भर दिलेला आहे. राम निगुण, निराकार आहे. मुळात हे निर्गुण भक्ती सप्रदाय आहेत, पण सगुण भक्तीचा प्रभावही दिसून येतो या परपरामधील अनेक संताना प्रल्हाद, ध्रुव, नारद, इत्यादीच्या भक्ती व उपासनेबद्दल खूप आदरहोता. ते काही असो, वरील चार परंपराचा विचार करायची सधी आपण पुढे घेणार आहोत.

## (३) जांभोजी, विष्णोई संप्रदाय

जांभोजी (१४५१–१५३६) हा पवार राजपूत होता. पिपासर (नागोर) येथे लोहत आणि हासा (केसर) याच्या पोटी त्याचा जन्म झाला तो ब्रह्मचारी होता. वयाच्या ३४ व्या वर्षी गृहत्याग करून १४८५ मध्ये त्याने विष्णोई सप्रदाय स्थापन केला. हल्लीच्या मुकाम (नोखा, बिकानेर) गावाजवळच्या सम्भराथल या उंच रेताड टेकडीवर त्याने सप्रदायाची स्थापना केली. उत्तर भारतातील हा पहिला सत संप्रदाय होय तो एक महान एकीकरणवादी आणि धार्मिक परंपरा व संस्कृतीचा रक्षणकर्ता होता. त्याच्या उपदेशानी सिकदर लोदीला ज्ञानप्राप्ती झाली. आपल्या पथात त्याने हिंदू आणि मुसलमान दोघांना प्रवेश दिला. त्याच्या संप्रदायाचे एकूण २९ सिद्धान्त आहेत. जुन्या यज्ञ परपरेचे त्याने पुनरुज्जीवन केले. रोज सकाळी अग्नीत धृत घालून हवन करणे, त्याची सबद वाणी म्हणणे, हा त्यांपैकी एक सिद्धांत आहे त्याचे अन्य काही सिद्धात आहेत–– विष्णु स्मरण; सर्व जीवांप्रती दया; अमावस्येला उपवास; काम-क्रोधासारख्या विकारांचे दमन, विचारपूर्वक बोलणे, चोरी, दुर्वचन, असत्य, वादविवाद याचा त्याग आणि हिरवी झाडे कधीही न तोडणे. ईश्वराच्या अवतारावर त्याचा विश्वास आहे. पण मूर्तिपूजा टाळण्याला तो सागतो. धार्मिक ग्रंथामध्ये गीतेकडे त्याचा अधिक ओढा आहे. त्याच्या वाणी-मध्ये अद्वैतमताचे लक्षण उघडपणे दिसून येते त्याच्या मतानुसार कोणी कोणत्याही परिस्थितीत असो त्याने फलाशा मनात न बाळगता सचोटीने उद्यम व खूप कष्ट केले पाहिजेत. कितीही अडथळे आले तरी सत्कार्य करणे त्याने चालू ठेवले पाहिजे आणि त्याचा त्याला कधीही खेद वा पश्चात्ताप होता कामा नये. आत्मबोध आणि जीवन्मुक्ती प्राप्त करणे हे मानवी जीवनाचे उद्दिष्ट आहे. पुनर्जन्म व कर्मावर त्याचा विश्वास आहे. डामडौल व दांभिकतेविरुद्ध तो सावधगिरीचा इशारा देतो. त्याच्या वाणीला सबद बाणी म्हणतात तिच्यात १२३ सबद आहेत, बाणीची भाषा ग्रामीण लोकामध्ये लोकप्रिय व प्रचलित असलेली अकृत्रिम राजस्थानी भाषा आहे सगुणोन्मुख-निर्गुण भक्तीचा तो प्रचारक होता. एक सबद पहा :

जास्त खाण्याला काही अर्थ नाही, कारण शरीर अगोदरच मलाने भरलेले आहे. ते फक्त शरीर लठ्ठ करते आणि मन विचलित करते. वय हा काही थोरपणाचा पुरावा नव्हे. वरवर थोर वाटणारा माणूस प्रापंचिकतेच्या सागरात गटांगळ्या खात राहतो आणि किनारा गाठण्यात अपयशी होतो. उच्च कुलात जन्म झाल्याने कोणी महान होत नाही. महान कृत्य करणाराच खरा महान. गोरखाची नुसती कल्पना केल्याने कोणी सिद्ध होत नाही. मनाच्या व कार्याच्या निर्मळतेने मोक्ष मिळतो. कलियुग चालू आहे. आत्म जागृती झालेल्यानो दक्ष रहा. सतगुरुने तुम्हाला नेकीचा न्याय्य मार्ग दाखवला आहे आणि वेदांच्या तत्त्वांशी तुमची ओळख करून दिली आहे '

विष्णोई सम्प्रदायात अनेक थोर कवी होऊन गेले. आपण त्यांपैकी काहींचाच फक्त विचार करणार आहोत या सम्प्रदायातील सुरवातीचे काही कवी आहेत--तेजोजी चारण (१४२३–१५१८), समस दीन (१४३३–१४९३), सिवदास (१४४३–१५१३), अमिया दीन(१४४३–१५१३), कान्होजी बारहट (१४४३–१५२३) यांनी संकीर्ण विषयांवर तुरळक पदरचना केली

अदोजी नैन (१४४८–१५३६) ने आपले आध्यात्मिक अनुभव स्पष्टपणे व्यक्त केले आहेत. त्याच्या साखी, हरजस, कवित्त आणि ग्रभ-चितवणी अजून प्रचलित आहेत.

विल्होजी (१५३२–१६१६) ने त्याच्या लेखनाने व कार्याने सम्प्रदायाला बळकट केले. त्याच्या सात कथांमध्ये (धडाबध, औतारपात, गुगलियै की, पूल्होजी की, द्रौणपुर की, जैसलमेर की, आणि झोरडाँ की) जाभोजीच्या जीवनातील प्रसंगाचे वर्णन आहे. कथा ग्यानचरी, सच-अखरी विगतावली, विसन छत्तीसी, हरजस, साखी, छप्पय आणि दूहामध्ये संकीर्ण विषय आलेले आहेत काव्ये भावनानी ओतप्रोत असून त्याची निस्सीम भक्ती अभिव्यक्त करतात. सच-अखरी विगतावली ही एक आगळीच रचना आहे, 'चुकीच्या' अर्थाने बहुधा वापरल्या जाणाऱ्या कित्येक शब्दाची व वाक्संप्रदायांची यादी त्यात दिलेली असून त्याचा नेमका अर्थ व योग्य वापर लेखकाने सांगितलेला आहे. लोकांनी बोलताना अधिक बिनचूक व्हावे आणि योग्य भाषाशैली वापरावी, कारण सत्यच मोक्षाकडे नेते, यासाठी त्याने हा खटाटोप केला. तीन उदाहरणे पुढे देत आहोत :

| | बोलण्यातील रूप | योग्य वापर |
|---|---|---|
| १) | तैं कितकै बरसायो मेह ? ( तू पाऊस कोठे पाडलास ? ) | तूं कित थौ जदि वूथों मेह ? (पाऊस पडला तेव्हा तू कोठे होतास ? ) |

| | |
|---|---|
| कहै-बरसायो उमकै गाँय<br>(अमूक गावी मी पाऊस पाडला) | मेह् मही हुणतो उण थांय<br>(मी अमूक गावी असताना पाऊस पडला) |
| २) नदी बुही आई<br>(नदी वाहत आली) | पाणी बुही आयो<br>(पाणी वाहत आले) |
| ३) पंथ कित जयसी ?<br>(हा रस्ता कुठे जातो ?) | इण पंथ जाइजै किणि गाँय ?<br>किंवा किस गाँव को पंथ ?<br>(हा रस्ता कोणत्या गावाकडे जातो ?) |

साखी आणि हरजस वेगवेगळ्या चालीवर गाण्यासाठी रचलेले आहेत.

केसोदास गोदारा (१५७३–१६७९) च्या चार आख्यान काव्यांची दखल आपण घेतली आहेच. आपल्या गुरु विल्होजी प्रमाणेच त्यानेही जाभोजीच्या जीवनावरील सात कथा रचल्या आहेत (बाल लीला, ऊदै अतली की, सैंसै जोखाणी की, मेडता की, इस्कंदर की, जती तलाव की आणि लोहा पांगल की) दोन्ही कवींची ही कथा काव्ये आणि सुरजनजीची काव्ये ही सर्व एकमेकांपासून पूरक असून त्यातून जाभोजीच्या जीवनाचे सपूर्ण चित्र तयार होते ऐतिहासिक दृष्टयाही ही काव्ये महत्त्वाची आहेत. त्याची अन्य काव्ये आहेत– साखी (१९), हरजस, कवित्त (८१), सवैया (२७), चांद्रायण (८५), दोहा (१२०), स्तुती अवतार की, दस अवतार का छंद. हे सर्व विविध विषयावरील स्फुट रचनांचे सग्रह आहेत. त्याचे कथा मृगलेखा निवेदनात्मक काव्य असून कथा विगतावली मुख्यत. बिष्णू व त्याच्या अवतारावर लिहिलेले आहे. विल्होजी प्रमाणेच त्यानेही चुकीचा वापर होत असलेले काही शब्द व वाक्प्रचार दिलेले असून त्याचा योग्य वापर सांगितलेला आहे. समकालीन समाज, विशेषतः नाथ जोगी, त्यांची कृत्ये आणि त्याची तथाकथित साधना याविषयीची महत्त्वपूर्ण माहिती त्याच्या काव्यांमधून मिळते सवादांची त्याला आवड दिसते. त्याचे सवाद चुरचुरीत व परिणामकारक आहेत. एका हरजसच्या काही ओळी दिल्या आहेत :

'तू ज्ञानाच्या खूप वल्गना करतोस; पण स्वत' मात्र अंधारातच आहेस. लोकांना न्याय्य मार्ग दाखवण्याचा तू आव आणतोस; पण तू स्वतः मात्र पार अज्ञानी आहेस. लोकांना स्वर्ग प्राप्ती करून देईन असा दावा तू करतोस; पण खुद्द मात्र नरकात जाण्यास योग्य आहेस. शस्त्रे तयार करण्यास हजारो तलवारी तयार करतो पण स्वतःसाठी मात्र एकही नसते. इतराना दूध व दही पुरविण्याचा देखावा कोणी करतो पण स्वतःसाठी मात्र त्याला विष काय ते परवडते. केसोदास म्हणतो, हातात पेटती मशाल घेऊन जाणारा विहिरीत पडला तर स्वत.चा बचाव कसा करणार ?

भीयांसर (फलोदी) गावचा सूरजनदासजी पूनिया हा प्रगाढ पाण्डित्य व साधुवृत्तीचा कवी होता. त्याच्या राम रासौ, गजमोक्ष आणि उषा पुराणचा आपण परामर्ष घेतला आहेच. त्याची कथा चेतन, चितावणी आणि धर्मचारी ही काव्ये बोधपर स्वरूपाची आहेत. आवागमनातून सुटका करून घेण्यासाठी सत्कार्य करण्याचा उपदेश त्यात केलेला आहे. कथा हरिगुण हे बारहट इसरदासच्या हरि राससारखे असून हरीच्या कार्याचे त्यात भक्तीभावाने वर्णन केलेले आहे कथा औतार की आणि कथा प्रसिद्धमध्ये थोडक्यात जाभोजीची कथा सांगितलेली आहे. ग्यान महातम आणि ग्यान तिलक ही रूपक काव्ये राजशेखरच्या त्रिभुवन दीपक प्रबंधाच्या धर्तीवर आहेत. शरीराची किल्ल्याची तुलना केलेली असून विभिन्न वासनाना मानवी पात्रे दाखवले आहे. अखेरीस वाईटावर चांगल्याचा विजय होतो. भोगल पुराणात भूगोल किंवा विश्व, त्याची उत्पत्ती, विनाश आणि दशावताराची थोडक्यात माहिती दिलेली आहे. अन्य काव्ये उदा०– साखी, डिंगल गीत, हरजस, साखी अंग चेतन, दस अवतार दूहा, असमेध जिग का दूहा, छंद, कवित्त, कवित्त – बावनी, सवैया इ० विविध विषयावरील आहेत.

त्याची भाषा सोपी व साहित्यिक आहे. मानवजातीला जाणिवेच्या उच्च पातळीवर पोचविण्याचा प्रयत्न त्याच्या काव्यात केलेला आहे. संस्कृती, विचार-सरणी, साधना व भाषा या दृष्टींनीही त्याचे काव्य महत्त्वपूर्ण आहे शृंगारिक काव्य वगळता राजस्थानी काव्याच्या बहुतेक सर्व प्रमुख प्रकारामध्ये त्याने मोलाची भर घातलेली आहे. सर्व लोकप्रिय वृत्तांचा व रूपांचा त्याने वापर केलेला आहे. १७ व्या शतकाचा तो प्रातिनिधिक कवी होय. 'साखी'च्या काही ओळी पुढे देत आहोत :

'एकाच पक्ष्याचे दोन पंख असल्यासारखे आई आणि वडील, तळाशी भोक असलेल्या पात्रामधून धान्य हळूहळू नाहीसे व्हावे त्याप्रमाणे, एके दिवशी अदृश्य झाले. कोणी त्याला रहीम नाव दिले आहे तर कोणी त्याला राम म्हणतात. एकाच सर्वशक्तिमानाची ही दोन्ही नावे आहेत असे असताना, एकाचसाठी दोन नावे कशाकरता ? बहुविध वृत्तामध्ये व रूपामध्ये काव्यरचना करणाऱ्या कवीने जर ईशस्तुती केली नाही तर त्याचे काव्यरचनेचे श्रम वृथा होत. संतजनाचा सहवास नसेल व ईश्वराची भक्ती नसेल तर हे जीवन वाया जाईल सूरजन म्हणतो, देवाची प्रार्थना करणारेच फक्त अस्तित्वात राहतील.'

हरजी वणियाल (१६८८–१७७८) च्या साखीमध्ये मन, त्याचे स्वरूप आणि त्याची अस्थिरता यांचे मोठे हृदयंगम वर्णन आहे. तो म्हणतो :

'हे साधो ! मनाला अनेक वाईट सवयी जडलेल्या आहेत. त्याचे हुकूम पाळू नकास. मन मोठे धूर्त आहे चारी बाजूनी प्रतिबंध घालून त्याला काळजीपूर्वक

ताब्यात ठेव. या चचल मनाला बोलाव, हाताने पकड आणि आत्म्याच्या कोट-किल्ल्यात कैद करून टाक. सर्व बाजूना पहारेकरी बसव. कारण मन अतिशय चतुर आहे. पळून जाण्याचे अनेक मार्ग त्याला ठाऊक आहेत. वाऱ्याच्या झुळकीसारखे ते पळून जाते.

१८ व्या शतकाच्या महान संत कवीमध्ये परमानदजी (१६९३–१७८८) देखील होता त्याची काव्यसपदा आहे– ८३६ दोहे आणि ३० कवित्त. १०४ विषयावर (प्रसगावर जसे, गुरू, साधु, चेतावणी, नाम स्मरण विरह, विनंती, कर्म, वगैरे) ते लिहिलेले आहेत. याखेरीज हरजस, साखी आणि विसन अस्तोत्र देखील त्याने रचले आहे. सहानुभूती व औदार्याविषयीचे त्याचे अनुभव आणि तत्त्वज्ञान सोप्या राजस्थानी भाषेत विविध प्रसगामध्ये सागितलेले आहेत. त्याचे दृष्टान्त मोठे मार्मिक आहेत. काही ओळी खालीलप्रमाणे आहेत

माणूस कोणावरही त्याचे सद्गुण, सौंदर्य किंवा स्वार्थापोटी प्रेम करतो. खरे प्रेम यापैकी कशावरही अवलबून नसते.

स्वत:ची प्रशंसा किंवा इतराची निंदा करण्यात दंग होऊ नका. प्रत्येक माता आपल्या मुलाची प्रशंसा करते पण अशा प्रशंसेवर कोण विश्वास ठेवतो ?

कुवतीप्रमाणे दान करण्यात आणि ईश्वराची अंतःकरणापासून प्रार्थना करण्यात उशीर करू नका. लोखंडाच्या तप्त तुकड्यातून उष्णता निघून जाते तद्वत हे जीवन जात असते

हरचंदजी ढुकिया (१७१८–१८०३) यानी प्रल्हादसारख्या पौराणिक विषयांवर निवेदनात्मक काव्ये लिहिण्याची परंपरा चालू ठेवली. हरचदजीचे लघु हरि प्रल्हाद चरित (१७२ पदे), मुख्यत· भागवत पुराणावर आधारित असून संवाद रूपात आहे. अदोजीच्या प्रल्हाद चरित (३४८ पदे), विष्णु चरित (११० पदे), कक्का छत्तीसी (३७ पदे), लूर आणि स्फुट पदावरून त्याची निस्सीम भक्ती, भावनाची सखोलता आणि आध्यात्मिक चिंतन दिसून येते ही काव्ये त्या त्या सप्रदायांमध्ये महत्त्वाची आहेत.

दीन सुदर्दी, रहमतजी, दुर्गादास, रामू खोड, गोसूलजी आणि गोविंद रामजी हे या परंपरेतील अन्य महत्त्वाचे कवी होत.

## (४) जसनाथजी : जसनाथी संप्रदाय

जसनाथजी (१४८२–१५०६) ने जसनाथी संप्रदाय १५०० च्या सुमारास कटरिया सर (बिकानेर) येथे स्थापन केला हल्ली ते यांचे मुख्य पीठ आहे. संप्रदायाची ३५ तत्त्वे आहेत त्यात रोज हवन करण्याचाही समावेश आहे जांभोजीप्रमाणे जसनाथजीचादेखील ईश्वराच्या अवतारांवर विश्वास आहे. त्याने वैष्णव

मत्प्रणाली व योगाचा स्वीकार केला आहे, पण नाथ संप्रदाय अनुसरलेला नाही. काही लोकाची ती चुकीची समजूत आहे. जसनाथीचे अग्निकृत्य प्रसिद्ध आहे जसनाथजी व त्याच्या संप्रदायाच्या कवीनी बोलचालीच्या राजस्थानी भाषेत वाङ्मय निर्मिती केली. जसनाथजीच्या वाणीत ५० सबद आहेत. त्यात सिम्भूधडा आणि कोड व गोरखचद व लघुकाव्याचा समावेश आहे. जसनाथजीचे एक सबद पहा :

तुमच्या जीवनाला न्याय्य, सात्त्विक करा. अपशब्द बोलू नका. हे योगाचे प्रतिक आहे. जीवनाच्या पृष्ठावर मनाच्या लेखणीने ईश्वराची प्रार्थना लिहा अमृताचे माधुर्य असलेले शब्द तुमच्या मुखातून बाहेर पडू द्या. गुरुच्या आदेशाचे पालन करा. गाय, म्हैस, शेळी, मेंढी हे अमृताचे भांडार असताना व तुम्हाला पिण्यासाठी 'भरपूर दूध देत असताना त्यांचा वध करणे किती हास्यास्पद आहे ? वध करणे जर चांगले असेल तर तुमचा स्वतःचाच गळा का कापत नाही ?'

खरडियो (नागोर) गावाच्या करमदासने १६०३ मध्ये हरि कथा रचली ती ११६ कड्यामध्ये आहे (एक कडी म्हणजे एक पद) महाभारतातील निवडक उदाहरणे पुढे मांडून कवीने सत्कार्याच्या गुणाचे व भक्तीचे प्रतिपादन केले आहे. मानवाच्या भवितव्याविषयी दुर्वासमुनी दुर्योधनाला म्हणतात :

'ईश्वराचे नावच केवळ अमर आहे. त्याच्या तोडीचे अन्य नाव नाही. सत्याखेरीज पावित्र्य नाही आणि देवाच्या प्रार्थनागीताखेरीज भक्ती नाही ईश्वराला शरण जाणाऱ्याला स्वर्गप्राप्ती निश्चितच होईल. हे कौरवा ! तू आणि तुझ्या लोकांची मृत्यूनंतर दुर्गती अटळ आहे. न्याय्य पांडव मात्र पुनर्जन्माच्या फेऱ्यातून मुक्त होतील.'

देवोजी १६६७ मध्ये मरण पावला. गुण माला, देसूंटो, नारायण लीला, धरत पुराण, सूरज लीला, ओळंबो आणि सबद (एकूण ३०) ही त्याची काव्यसपदा होय ही सर्व लहान काव्ये असून गुरु, देव, पृथ्वीमाता, भक्ती आणि नीतीवर लिहिलेली आहेत. देसूटोमध्ये पांडवांचा अज्ञातवास सांगितलेला आहे बहुतेक काव्ये मौखिक परंपरेपासून उचललेली असल्याने त्यांची लोकप्रियक्षमता दिसून येते. एका दोह्यात म्हटले आहे :

'जी वाट मळलेली नाही तिच्यापासून, दुष्कर्मी संतानापासून, कटू बोलणाऱ्या स्त्रीपासून, आळशी बैलापासून आणि अनुदार गुरुपासून सावधपणे दूर राहिले पाहिजे.'

लालनाथजी (१८ वे शतक) ला जसनाथी संप्रदायाचा प्रातिनिधिक कवी म्हणता येईल. त्याचे साहित्य पुढीलप्रमाणे आहे– जीव समझोतरी, वरण विद्या, हर रस, हरिलीला, निकलग पुराण, सूरज स्तोत्र आणि तुरळक सबद. त्यात कर्म,

ज्ञान, भक्ती, योग, नीती आणि स्तुती यांचा विविध प्रकारे विचार केलेला आहे निकलग पुराणात कल्कि अवताराविषयी सांगितलेले आहे. जीव समझोतरीतील एक पद आहे :

'तारुण्य सर्व प्रयत्नांना सवादी क्रिया करते, म्हातारपण करीत नाही. ते सरळ न करता येणाऱ्या शुष्क काष्ठासारखे असते

चोखनाथजी (मृत्यू १७८३ मध्ये) च्या स्फुट पदांमध्ये व सबदामध्ये (अंदाजे सख्या १५) जसनाथजीच्या जीवनाचे आणि राम व कृष्णाच्या काही लीलाचे वर्णन आहे मानवी वर्तनाच्या अधोगतीचा त्याने उपहास केलेला आहे

हारोजी, सोभोजी सोनी, करमोजी भाभू, पाचोजी आणि नाथोजी हे या सप्रदायाचे अन्य कवी होत. त्याच्या स्फुट पदामध्ये व सबदामध्ये मानवाची कर्तव्ये, दैवी गुण आणि इतर उपदेश सांगितलेले आहेत.

## (५) हरिदास निरंजनी : निरंजनी संप्रदाय

हरिदासाने निरंजनी संप्रदाय सुरू केला असे म्हणतात. त्याचा जीवनकाल १४१७ ते १६४५ च्या दरम्यानचा असावा असे धरतात पण ते विवादास्पद आहे. उपलब्ध साधनाची छाननी केल्यावर असे वाटते की १४५५ ते १५४३ हा त्याचा कालखंड असावा. कापडोद (डीडवाणा जवळ, नागोर) गावाच्या सांखला कुळातला तो राजपूत होता. डीडवाना हे या संप्रदायाचे मुख्य पीठ आहे. असे म्हणतात की हा अगोदर दरवडेखोर होता आणि कोणा साधूच्या उपदेशाने उपरती होऊन १४९९ मध्ये तो विरक्त झाला. जोधपूर आणि जयपूरहून त्याच्या काव्यांच्या दोन आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. १६२५ मध्ये लिहिलेले त्याचे एक हस्तलिखित[१] नुकतेच हाती लागले आहे त्यात त्याच्या पुढील काव्यांचा समावेश आहे ' त्यावलो, चालीस पदी, चौदह पदी, पंधरा तिथि, जोग समाधी, निरपख मूल जोग, ग्रंथ वीरा रास, हस प्रमोध, ग्रंथ मन ६० को आणि काही स्फुट पदे. पूर्वी प्रसिद्ध झालेल्या प्रती आणि या हस्तलिखितातील मजकूर याची तुलना करता काही मुद्दे समोर येतात, ते असे– प्रकाशित पुस्तकांमध्ये हरिदासाच्या सर्व काव्यांचा समावेश नाही, प्रकाशित पुस्तकांमधील काही कविता या हरिदास निरंजनीने लिहिलेल्या नसाव्यात, प्रकाशित पुस्तकातील भाषेत फेरबदल केलेला आहे. आणि हरिदास या एकाच नावाच्या दोन व्यक्ती एका पाठोपाठ एक होऊन गेल्या असल्याची शक्यता नाकारता येण्यासारखी नाही. या दोन्ही हरिदासांना एकच कवी समजून त्या दोघांच्या काव्याचा नंतरच्या हस्तलिखितात समावेश करण्यात आला असावा असे वाटते. एक उदाहरण पुरेसे

---

१. श्री. राधाकृष्ण नेवटिया, ५२ अकेरिया स्ट्रीट, कलकत्ता याच्यापाशी उपलब्ध. फोटोस्टेट प्रत लेखकापाशी उपलब्ध.

होईल. प्रकाशित झालेल्या भरम विधूंस जोग ग्रंथ (हे वर उल्लेखिलेल्या हस्त-लिखितात नाही) मध्ये अकबर बादशहा आणि 'नौरोज'चा जो उल्लेख आहे त्यावरून असे वाटते की अकबराच्या मृत्यूनंतर काही काळ लोटला असावा. अकबर १६०५ मध्ये मरण पावला. आपल्या या हरिदास निरंजनीने प्रस्तुत पद लिहिले असण्याची शक्यता वाटत नाही कारण 'अंगा'मध्ये विभागणी केलेली त्याची कित्येक काव्ये १६२५ मध्ये किंवा त्यापूर्वी लिहिलेली आहेत असे असले तरी, या बाबतीत अधिक सशोधन होण्याची आवश्यकता आहे आणि संशोधित प्रत उपलब्ध होईपर्यंत सावधगिरी बाळगण्याची गरज आहे.

पूर्ण परब्रह्म किंवा मायाविरहित ब्रह्माला निरजन म्हणतात. निराकार निरजनाचीच फक्त उपासना मान्य असल्याने या संप्रदायास निरंजनी हे नाव मिळालेले आहे. हरिदासाने नाम – जपावर देखील भर दिलेला आहे. राम हा निरंजनाचाच समानार्थक शब्द आहे. त्याच्या काव्यात योग तत्त्वे आणि प्रेम यांना सारखेच महत्त्व आहे. सिद्धी प्राप्त करण्यासाठी मानसिक वळण अगत्याचे आहे. त्यासाठी त्याने प्राण–साधना निवडली. म्हणून योयाचे संदर्भ त्याच्या काव्यात आलेले आहेत अशा प्रकारे, निर्गुण भक्ती आणि योग ही आत्मबोधाची साधने आहेत. अवतारावर व मूर्तिपूजेवर त्याचा विश्वास नाही. पण तो सहिष्णु आहे. तो म्हणतो :

' देवालय टाळू नका की त्यात जाऊ नका.
कृत्रिमता टाळणे आणि खऱ्या ईश्वराची प्रार्थना करणे हा संतांचा मार्ग होय '

त्याच्या काव्याची संख्या विपुल आहे. त्यात अग आहेत, पदे आहेत आणि कवित्त, कुडलिया व चाद्रायणसारखी स्फुट रचना आहे.

१७ व्या शतकाच्या अखेरपर्यंत मूळ विचार व साधना तशीच राहिली आणि तिचा प्रसारही झाला, पण १८ व्या शतकापासून पुढे मात्र कवीवर वेदान्त व वैष्णवाच्या सगुण भक्तीचा परिणाम झाला. अशाप्रकारे, हा संप्रदाय पुढे आपले मूळ रूप हरवून बसला देवालये उभारण्यात आली आणि राम कृष्णाच्या मूर्तींची पूजा सुरू झाली. साधूमध्ये 'माळा' व 'टिळे' लोकप्रिय झाले.

या सप्रदायाच्या हरिदास व अन्य कवीच्या भाषेला राजस्थानी असे म्हणता येणार नाही, तर ती सोपी राजस्थानी, ब्रज आणि कधी कधी खडी बोली यांचे संमिश्र रूप आहे. या संप्रदाच्या काही महत्त्वपूर्ण कवींचा आम्ही उल्लेख करणार आहोत. दादू पंथाचा अनुयायी राघवदास याने १६६० मध्ये लिहिलेल्या आपल्या 'भक्तमाल' मध्ये निरजनी सप्रदायाच्या, हरिदासासह बारा महान महंताची नावे दिलेली आहेत ती अशी– लपट्यो जगन्नाथ, श्यामदास, कान्हड दास, ध्यानदास,

क्षेम, नाथजी, जगजीवन, तुरसीदास, आनदास, पूर्णदास, मोहनदास आणि हरिदास.
त्यांच्यापैकी काहीजण थोर कवी होते

तुरसीदास (१६ वे शतक) हा हरिदासाचा समकालीन होता. तो आणि सेवादास विपुल काव्यरचनेसाठी प्रख्यात आहेत. तुरसीची काव्यसंपदा आहे— २०० प्रकाशांमध्ये विभागलेल्या साखी, पदे आणि स्फुट काव्ये. या स्फुट रचनांमध्ये निर्गुण निरंजनाच्या उपासनेवर भर देणाऱ्या निर्गुण भक्तीविषयक सकीर्ण विषयाचा समावेश आहे पदांची सख्या ४६१ असून त्यात त्याच्या गूढ अनुभवाची, मनःशांतीची, प्रार्थनेची व पूर्वसूचनेची नोंद आहे त्याची भाषा सोपी असून अभिव्यक्तीची पद्धत साधी व सहज आहे.

जगजीवनदास हा हरिदासजीचा शिष्य असल्याचे मानतात त्याच्या चितावणी, प्रेम नाम आणि काही पदांमध्ये प्रेम, निरंजन उपासना व काही उपदेशाची महती वर्णिलेली आहे.

ध्यानदासाच्या (१६ वे शतक) गुण माया संवाद, गुणादि बोध आणि चांद्रायणे, एकूण संख्या १०० च्यावर उपलब्ध आहेत. त्याचे काव्य उपदेशपर असून भाषा मरुदेशी राजस्थानी वळणाची आहे

फतेहपुर (शेखावाटी) चा नरीदास हा हरिदासजीचा शिष्य होता. त्याच्या पदांची संख्या सुमारे १२०० असून ती उपदेशात्मक आहेत आणि त्याच्या भावना परिणामकारक पद्धतीने व्यक्त करतात

सेवादासाच्या (१६४०–१७४१) कवितांमध्ये त्याच्या अनुभवाची व उपदेशांची नोंद आहे त्यात साखी (दोहे), पदे व कुंडलिया, छप्पय, सवैया आणि चाद्रायण सारख्या स्फुट रचनांचा समावेश आहे. सत साहित्यात त्याने उल्लेखनीय भर घातली

भगवानदास निरंजनी (अंदाजे १७ व्या शतकाचा उत्तरार्ध) विद्वान कवी होता. संप्रदायाच्या मूळ स्वरूपात बदल व्हावयाला त्याच्या काव्यांपासून सुरवात झाली. वेदान्त व सगुण भक्तीकडे त्याचा अधिक ओढा दिसतो. त्याची प्रचलित काव्ये आहेत अमृतधारा, कार्तिक महात्म्य (१६८५ मध्ये रचलेले), गीता महात्म्य वैराग्य वृंद, जैमिनि अश्वमेध, प्रेम पदार्थ, अध्यात्म रामायण, पचीकरण, सिंहासन बत्तीसी आणि काही स्फुट पदे. यांची भाषा सोपी व साधी आहे.

भगवानदासाच्या समकालीन मनोहरदास निरंजनी वेदान्ताचा मोठा विद्वान होता. वेदात व तत्संबधित विषयावर त्याचे बहुतेक साहित्य आहे. ते पुढीलप्रमाणे— ग्यान मंजरी, वेदान्त परिभाषा, षट् प्रश्नोत्तरी शत प्रश्नोत्तरी, ग्यान वचन चूर्णिका, आणि सप्तभूमिकाज्ञान मंजरी. यापैकी अखेरची रचना १६५९ मध्ये केलेली

असून ती पद्यात आहे. बाकीचे सर्व साहित्य चपू शैलीत (गद्य पद्य मिश्रित शैलीत) आहे.

हरिरामदास (१८ वे शतक) हा अष्टपैलू विद्वान होता. त्याची रचनाही काव्यगत सौंदर्य व ऐतिहासिक दृष्टीनी महत्त्वाची आहे. त्याची काव्ये आहेत— छंद रत्नावली, परमार्थ सतसई, महाराज हरिदासजी की परची आणि कित्येक स्फुट पदे. कुंडलिया हा त्याचा आवडता छद दिसतो.

आत्मारामची (मृत्यू १७५९) दोहा, झुलणा, चाद्रायण, इत्यादी स्फुट पदे, पारंपरिक व आध्यात्मिक गोष्टी लालित्यपूर्ण पद्धतीने सांगतात.

स्वामी हरिदासजी की परची हे रघुनाथदासाचे एकमेव उपलब्ध काव्य १७७३ च्या सुमारास लिहिलेले आहे. हरिदासजीचे चरित्र त्यात वर्णिलेले आहे.

त्याचप्रमाणे १७७५ मध्ये लिहिलेल्या रूपदासजीच्या सेवादास की परची-मध्ये सुप्रसिद्ध कवी सेवादासचे चरित्र वर्णिलेले आहे.

प्यारे रामजीने १८२६ मध्ये रचलेल्या भक्तमालमध्ये कित्येक संतांची, मुख्यत: निरंजनींची माहिती दिलेली आहे

भक्तमाला व परची त्यांच्या संप्रदायामध्ये अतिशय महत्त्वाच्या आहेत. ऐतिहासिक दृष्ट्या त्या बहुमोल आहेत.

स्वामी उदय रामजीचा (१९ व्या शतकाचा उत्तरार्ध व २० व्या शतकाचा पूर्वार्ध) सार संग्रह हा अनेक कवींच्या कवितांचा काव्यसंग्रह आहे हे कवी मुख्यत: निरजनी सप्रदायाचे आहेत. त्याच्या स्वतःच्या कविताही त्यात आहेत. रज्जबजीचे सर्वंगी, जगन्नाथजीचे गुणगज, नामा, परमानंद दासाचे पोथो ग्रंथ ग्यान आणि नवल राम मन्त्रीचे सर्वांग सार या परंपरेतील तो आणखी एक महत्त्वाचा सग्रह होय.

## (६) परशुराम देवाचार्य : निंबार्क संप्रदाय

चार प्रमुख सगुण भक्ती सप्रदायांपैकी निंबार्क संप्रदाय एक होय. त्याचे मुख्य पीठ राजस्थानातील सलेमाबाद (परशुरामपुरी) येथे आहे. हरिव्यास देवाचार्यांचे शिष्य परशुरामदेवजीने ते स्थापन केले. हल्लीच्या सीकर जिल्ह्यात असलेल्या खंडेलापासून १५ मैलावर असलेल्या ठीकरिया गावी गुर्जर गौड ब्राह्मण कुळात परशुरामदेवजीचा जन्म झाला असे म्हणतात. त्याच्या जीवनकालाविषयी अजूनही नुसते अनुमानच करावे लागतात. एका मतानुसार तो १३९३ ते १५४०-च्या दरम्यान होऊन गेला; तर दुसऱ्या मतानुसार १५४३ ते १६२३ हा त्याचा जीवनकाल होय. नुकताच चार खंडामध्ये त्याच्या समग्र कवितांचा सग्रह प्रकाशित झाला आहे या बाबतीत आम्हास सांगण्यात आले आहे की वाणी म्हणून ओळखली जाणारी त्याची पदे वगळता बाकीची सर्व १६२० मध्ये लिहिण्यात आली आहेत.

नंतर १७८० मधील एका हस्तलिखितात कोणा मनसा रामने परशुराम सागर या नावाने परशुरामदेवजीच्या पूर्वीच्या हस्तलिखितातील सर्व कवितांमध्ये ६०० आणखी पदांची भर घालून एक संग्रह तयार केला. प्रकाशित ग्रंथ यावरून घेतलेला आहे.

परशुरामदेवजीच्या जीवन कालविषयक वरील मताची अधिक छाननी झाली पाहिजे तसेच प्रकाशित मजकुराचे, अन्य हस्तलिखितात उपलब्ध असलेल्या त्याच्या सर्व कवितासह शास्त्रीय पद्धतीने पुनः संपादन होणे आवश्यक आहे. नुकताच शोध लागलेल्या, १६२५ मध्ये लिहिलेल्या एका हस्तलिखितात[1] परशुरामदेवजीची समझनी, हिंडोलो, विप्रमतीसी, पदे आणि साख्या यांसारखी काव्ये आढळली आहेत. या हस्तलिखितातील काव्यांची प्रकाशित ग्रंथातील काव्यांशी तुलना करता असे दिसून येते की परशुरामदेवजीच्या सर्व पदांचा प्रकाशित ग्रंथात समावेश झालेला नाही प्रकाशित ग्रथात नसलेले, अप्रकाशित हस्तलिखितातील एक पद पुढे देत आहोत. प्रकाशित ग्रंथातील काव्याची भाषा हस्तलिखितातील भाषेहून वेगळी आहे. १७८०च्या मनसारामच्या हस्तलिखितात अन्य कोणाच्या तरी पदांचा शिरकाव झाला असण्याची मोठी शक्यता आहे.

उपलब्ध साहित्याचे टीकात्मक दृष्टीने परीक्षण केल्यास कोणत्याही परिस्थितीत परशुरामदेवजीचा जीवनकाल १६०० च्या पुढे नेता येत नाही १६ व्या शतकात बव्हशी १५२० ते १६००च्या दरम्यान त्याचा उत्कर्ष झाला हाच निष्कर्ष काढावा लागतो.

परशुरामदेवजीची साहित्यसपदा प्रचंड आहे २२२५ साखी (दोहे), १५ चरित आणि कवित्त, सवैया व दोहा चौपई छंदात रचलेली १३ लीला काव्ये, तसेच सुमारे ६०० पदे इतके त्याचे काव्य आहे साख्या २५० संकीर्ण विषयांवर आहेत— परदेसी प्रीतम को, बिरह अगनि को, बिरहनी को, हरि भगति हीन को इत्यादी.

निंबार्क संप्रदायाचा आचार्य असल्याने परशुरामदेवजी सगुण भक्तीचा उपासक होता. चरित आणि लीला काव्ये निवेदनात्मक असून त्यात सुप्रसिद्ध भक्तांशी संबधित विविध प्रसंग अवतारांच्या लीला आणि ईश्वराच्या थोरवीचे वर्णन आहे. दस अवतार, रघुनाथ, श्रीकृष्ण आणि प्रल्हाद ही त्याची चरित काव्ये आणि अमर बोध, जाम निधी, सांच निषेध, निज रूप, निर्वाण आणि हरि लीला ही त्याची लीला काव्ये, प्रमुख निवेदनात्मक काव्ये होत. साखींखेरीज निर्गुण भक्तीवरील त्याची कित्येक पदेही तितकीच महत्त्वपूर्ण आहेत बिरह आणि ईश्वराचे प्रेम हा

१. श्री राधाकृष्ण नेवटिया, ५२ झकेरिया स्ट्रीट, कलकत्ता याच्यापाशी उपलब्ध. फोटोस्टेट प्रत लेखकापाशी उपलब्ध.

साखींचा मुख्य सूर आहे. याग आणि पदांमध्ये त्याच्या गूढ अनुभवांची नोंद आहे अन्य विषयाखेरीज सगुण व निर्गुण भक्तीचा विषयही काव्यात हाताळलेला आहे स्वतःच्या मनोगताची स्पष्ट शब्दांत अभिव्यक्ती आणि शरण जाण्याची वृत्ती त्याच्या स्फुट काव्यात दिसून येते राम व कृष्णाच्या शौर्याची व उद्धाराची बाजू त्याच्या काव्यात ठळक आहे. राजस्थानी ऐतिहासिक व शौर्यात्मक काव्याचे ते प्रमुख लक्षण आहे

नवधाच्या सर्व बाजू, पाच प्रकारची भक्ती, त्यात कांता भक्तीच्या निर्गुण पद्धतीचाही समावेश आहे, आणि गूढवाद हे सर्व परशुरामदेवजीच्या पदामध्ये आलेले आहे निकुंज भक्ती आणि सहचरी भावाची उपासना हे या सप्रदायातील उपासनेचे मान्य प्रकार होत. हे गुप्त रहस्य समजले जाते. अशा प्रकारची उपासना पद्धती परशुरामदेवजीने अगदी व्यक्तिगत ठेवली. त्याचा काव्यात उल्लेखही केला नाही, हे महत्त्वाचे आहे. त्याच्या काही पदावली इतक्या अगाध व कळकळीच्या आहेत की राजस्थानात त्याना म्हणींचे स्वरूप आले आहे. त्याची भाषा सोपी राजस्थानी असून अधूनमधून ब्रज भाषेची पखरण झालेली आहे. त्याचे काव्य म्हणजे सांस्कृतिक व धार्मिक क्षेत्रांत एकीकरण, सुसंगती आणि सह अस्तित्व यांचे नमुनेदार उदाहरण होय. त्याची पदे व लीला विभिन्न चालींमध्ये गाण्यासारखी आहेत. लीला काव्ये एकप्रकारची आख्यान काव्ये आहेत.

मागे उल्लेखिलेले पद (जब लग अपणो मन नहीं सोधै, तब लग भगति मुकती काहे खोजै) पुढे दिले आहे : ' जोवर आत्मशुद्धी होत नाही तोवर भक्ती वा मुक्तीचा शोध व्यर्थ होय. गृहत्याग करून अरण्यवास पत्करणारा काही खरा भक्त नव्हे स्वर्गप्राप्तीची अभिलाषा किंवा नरकाचे भय असणे याचाच अर्थ असा की ईश्वराच्या चरणकमलांवर विश्वासाची उणीव आहे. परसा म्हणतो, स्वतःचे मन हाच स्वतःचा गुरु होऊ देत. तोच ईश्वराचा बोध होण्याचा मार्ग आहे.'

तत्त्ववेत्ता (टीकमदास) (१६ वे शतक) हा परशुरामदेवाचा याचा शिष्य होता असे म्हणतात. त्याचे मुख्य पीठ जैतारण (पाली) येथे होते. तेथें त्याने गोपाल द्वारा स्थापन केला तत्त्वेत्ताजी की वाणी हा त्याच्या काव्यांचा सग्रह हस्तलिखित स्वरूपात तेथे जपून ठेवल्याचे म्हणतात तत्त्ववेत्ता रा सवैया (क्र. ७३/१८९३, ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट, उदयपूर) या त्याच्या दुसऱ्या हस्तलिखितात सुमारे १९८ छप्पय उपलब्ध आहेत. ही दोन्ही स्वतत्र काव्ये आहेत की दुसऱ्याचा पहिल्यात समावेश आहे हे निश्चित सागता येत नाही. छप्पयमध्ये ईश्वर, अवतार आणि नारद, जनक इत्यादींसारख्या पौराणिक व्यक्तींची स्तुती केलेली आहे. वाणी मुख्यत. सविकल्प ज्ञान आणि नीति बोधावर लिहिलेली आहे भाषा ब्रज मिश्रित राजस्थानी आहे.

## (७) दादू : दादू संप्रदाय

दादू (१५४३–१६०३) हा जातीने पिंजारी होता असे म्हणतात त्याचा जन्म जरी अहमदाबाद (गुजरात) येथे झालेला असला तरी त्याची साधना त्याने करडाला (जोधपूर) आणि सांभर येथे केली आमेर, आंधी आणि नारायणा ही त्याच्या मुक्कामाची अन्य स्थळे होती. नारायणा येथे तो मरण पावला आणि त्या जवळच्याच भैराणा येथे त्याचे अंत्यसंस्कार झाले.

त्याच्या वाणीच्या कित्येक आवृत्त्या प्रकाशित झाल्या आहेत त्यात 'अंग' (प्रकरणे) मध्ये वर्गीकरण केलेल्या २५०० हून अधिक साख्या आणि ४४५ पदे आहेत. त्याच्या नावावर आणखी एका काव्यात–आदिबोध सिद्धांत ग्रंथामध्ये २७० पदे असून, १६२५ च्या हस्तलिखितात[1] ते आढळते असे म्हणतात की दादूचा एक शिष्य मोहनदास मेवाडा (भागळ) याने ते आपल्या गुरूच्या नावावर लिहिले हा अधिक संशोधनाचा विषय आहे या ग्रंथात योग आणि त्याच्या माध्यमाने काया-साधना सांगितलेली आहे या विषयावरील हा महत्त्वपूर्ण ग्रंथ आहे.

अन्य संताप्रमाणेच दादूचेही अंतिम उद्दिष्ट होते– आत्मबोध साधणे व जीवनमुक्ती प्राप्त करणे त्याच्या कित्येक साख्यामधून व पदामधून त्याचे अगाध प्रेम व विरहव्यथा, त्याचबरोबर गूढ अनुभूती व्यक्त झालेली आहे. सच्च्या सगुण भक्ताप्रमाणे, मुक्तीऐवजी केवळ भक्तीची त्याची आस काही पदांमध्ये दिसून येते. खालील पदे १६२५ च्या हस्तलिखितात (मागे उल्लेखिलेल्या) आढळतात. तसेच दादूजी की वाणी (मुंबई, १९०४), श्री दादू दयालालजी की वाणी (जयपुर, १९५१ आणि श्री दादू वाणी) (जयपूर, १९६९) या प्रकाशित ग्रंथामध्येही ही पदे आढळतात :

भगती माँगौ बाप भगती माँगौ मुनें ताहरा नॉम नौ प्रेम लागौ
दरसन दे दरसन दे हू तौ ताहनी मुकती नाँ माँगौ.

पण त्याच्या भक्तीचे मुख्य तत्त्व आहे – निर्गुण ब्रह्माची उपासना त्याची अभिव्यक्ती मोहक लालित्यपूर्ण व स्पष्ट आहे. त्याची भाषा मुख्यत राजस्थानी असून त्यात अधूनमधून पश्चिमी हिंदी, गुजराती व पंजाबीची छटा आढळते.

वयाच्या अंदाजे तिसाव्या वर्षी त्याने सांभर येथे ब्रह्म संप्रदाय स्थापन केला त्याचेच पुढे, त्याच्यानंतर दादू पंथ असे नामांतर झाले. कालांतराने या संप्रदायाचे चार शाखामध्ये विभाजन झाले जगण्याच्या वेगवेगळ्या पद्धती, विभिन्न स्थानी स्थायिक होणे, स्थानिक कारणे आणि वेशभूषा यांतील फरकांमुळे या शाखा

१. मागे उल्लेखिलेले.

तयार झाल्या. या आहेत–खालसा, नागा, उत्तराधा आणि विरक्त. असे असले तरी त्याच्या मूळ विचारसरणीत फरक नव्हता

नारायणा येथील बखनाजी (अंदाजे १५५३–१६२३) हा दादूचा शिष्य होता. तो जन्माने मुसलमान होता असे म्हणतात. ४० 'अंगा'मध्ये वर्गीकृत त्याच्या साख्या व पदे, एकूण सख्या १६७, उपलब्ध आहेत आपल्या मतांच्या पुष्टयर्थं तो दादूची उद्धरणे देतो. ईश्वराला शरण जाणे, नामस्मरण करणे आणि प्रेमाच्या मार्गाने सपूर्ण अबाधित सत्याचा साक्षात्कार करणे हे त्याच्या वाणीतील मुख्य सूर होत भाषा सोपी राजस्थानी असून त्यात ढूढाडी बोलीचे काही शब्द आढळतात

रज्जबजी (१५६७–१६८९) हा सागानेरचा पठाण होता. आमेरला स्वत:च्या लग्नासाठी जात असताना त्याने दादूची दोन पदे ऐकली. लग्नाचा विचार सोडून तो दादूचा शिष्य झाला. त्याने विपुल काव्यरचना केली आहे. साखी, पदे, सवैया, त्रिभगी, अरिल्ल, कवित्त आणि मुख्यतः चौपइ छदात असलेल्या तेरा लघु काव्याचा त्यात समावेश आहे. त्याची सवेदनाक्षमता व अनुभवजन्य ज्ञान आणि अनुभव प्रगाढ असून त्याच्या वाणीत ते व्यक्त झाले आहेत. त्याच्या चैन-दास, रामदास, खेमदास आणि कल्याणदाससारख्या कित्येक शिष्यानी त्याच्या व्यक्तित्व, साधना व काव्यात्म प्रतिभेची प्रशंसा केली आहे. अपार प्रेम, भक्ती, तीव्र भावनाची अभिव्यक्ती आणि एखादा मुद्दा स्पष्टपणे मांडण्याची कुशल हातोटी ही त्याच्या काव्याची वैशिष्टये होत. भाषा राजस्थानी असून अधूनमधून इतर भाषेचे शब्द आलेले आहेत.

सर्वंगी या रज्जबच्या काव्यसग्रहात त्याच्यासह सुमारे ६५ कवींच्या, मग ते कोणत्याही धर्माचे व सप्रदायाचे असोत, कवितांचा समावेश केलेला आहे. अप्रसिद्ध किंवा अल्प प्रसिद्ध अशा कित्येक कवींची व त्याच्या काव्याची माहिती मिळविण्या-साठी तो एक विश्वसनीय साधन ग्रथ आहे

फतेहपुरचा सुदरदास (धाकटा) हा दादूचा शिष्य होता तो महान संत व विद्वान होता पण त्याची काव्ये ब्रज भाषेत असल्याने प्रस्तुत ग्रंथात त्याचा विचार करणे विषयाला सोडून होईल.

१५९८ ते १६२३ च्या दरम्यान लेखन करणारा डीडवानाचा प्रयागदास बियाणी विख्यात सत व कवी होता त्याच्या सुमारे ६० साख्या व २० पदामध्ये निस्सीम भक्ती व अनुभूती लालित्यपूर्ण, स्पष्ट पद्धतीने व्यक्त केली आहे.

आम्ही मागे सांगितले आहेच की दादूच्या काही पदांमध्ये सगुण भक्तीची एक छटा दिसून येते. त्याचा शिष्य जनगोपाल राहोरी (१७ व्या शतकाच्या सुरुवा-

तीचा) याच्या काव्यात सगुण भक्तीचा प्रभाव स्पष्टपणे लक्षित होतो. त्याची काव्य आहेत :

दादू जन्म लीला परची, ध्रुव चरित्र, प्रल्हाद चरित्र, मोह विवेक सवाद, जड भरत चरित्र, काया प्राण सवाद, शुक संवाद, अनत लीला, बारह मासा, भेंट के सवैये, पदे आणि साखी. भाषा बहुधा राजस्थानी आहे

सतदास बारह हजारी हा दादूचा शिष्य होता आणि १६३९ मध्ये फतेहपूर (शेखावाटी) येथे मरण पावला त्याच्या वाणीचे शीर्षक आहे आलम गज त्यात ५००० साखी (दोहे), १४४२ पदे, ६१३ सवैये आणि ३ आरत्या आहेत. याचे सकलन त्याच्या हयातीतच त्याचा शिष्य हरिदास–चावडचा शाखेचा महंत, याने १६३१ मध्ये केले होते. पदाची सख्या बारा हजार अनुष्टुभ श्लोकाइतकी असल्याने तो बारह-हजारी या नावाने ओळखला जाऊ लागला या नामाभिधानाचा त्याने ऋणनिर्देश केला आहे. साख्याचे २७ अंगांमध्ये (प्रकरणांमध्ये) विभाग केलेले आहेत जसे– गुरु महिमा को, गुरुदेव को, सुमिरन को, विरह को, बैरागी को, परचा को इत्यादी. त्याच्या साख्या व पदासाठी राघवदासाने भक्तमालमध्ये त्याची प्रशंसा केलेली आहे. त्या काळचा हा थोर निर्गुण कवी होता आलम गज प्रचड, विस्तृत आणि विद्वत्प्रचुर आहे विषय प्रतिपादन स्पष्ट, रेखीव, अर्थबोधक व प्रभावशाली आहे. भाषा बहुतेक लोकप्रिय, बोलचालीची राजस्थानी आहे.

१६२० ते १६३० च्या दरम्यान साहित्यलेखन करणारा भीखजनजी हा फतेहपुरचा ब्राह्मण (आचारज), सतदासजी बारह-हजारीचा शिष्य होता. आज-वर त्याची फक्त दोनच काव्ये ज्ञात होती. सर्वांग बावनी, आणि नाम माला हा अमरकोशाचा ५२५ पदामध्ये, मुख्यतः दोह्यामध्ये, राजस्थानी मिश्रित ब्रज भाषेत केलेला अनुवाद पण प्रस्तुत इतिहासाच्या लेखकाला पुढे दिलेली आणखी पाच काव्ये मिळाली आहेत : ध्रू चरित्र (१६१ दोहे आणि चौपइ, रचना १६२३-मध्ये), तिथि पद्रह (७६ चौपइ आणि दोहा –– सोरठा), निरंजन स्तुति ( २० चौपइ, त्रिभंगी आणि कवित्त ), सवैया ( १९ ), आणि साखी ( ६ दोहे )

भावनाचे व विचाराचे गाभीर्य, तसेच शैलीची सुस्पष्टता ही त्याच्या काव्याची मुख्य लक्षणे होत सगुण भक्तीकडील त्याचा ओढादेखील लक्षणीय आहे. भाषा मुख्यत ओघवती राजस्थानी आणि राजस्थानी मिश्रित ब्रज आहे

लालदास हा गरीबदासच्या पठडीतला त्याने १७७८ च्या जवळपास नाम माला व चितावणी लिहिली नाम मालेत दादूच्या १५२ शिष्याची नावे दिलेली आहेत.

वाजिद पठाण देखील दादूचा शिष्य होता. उपलब्ध पुराव्यावरून त्याचा जीवनकाल निश्चितपणे ठरवता येत नाही स्थूलमानाने तो १५५० ते १६५०

असावा असे म्हणता येईल त्याच्या कित्येक काव्यापैकी त्याची चाद्रायणे ( किंवा अरिले ' ) अदाजे संख्या १३५, ही त्यातील प्रतिपाद्याची सार्वत्रिकता आणि अभिव्यक्तीची परिणामकारकता यासाठी विशेष महत्त्वाची व लोकप्रिय आहेत. ती बहुधा भक्तीपर असून नीतिबोध देतात. त्यासाठी प्रत्यक्ष जीवनातील उदाहरणे दिलेली आहेत. मानवी जीवनाचा व्यावहारिक पद्धतीने विकास करण्याचे उद्दिष्ट त्यामागे आहे. काही चांद्रायणाना म्हणींचे स्वरूप आलेले आहे. दोन येथे दिली आहेत :

'ज्यांनी मानाच्या पगड्या डोक्यावर घातल्या, उंच सौधावरून पाहिले, उमद्या घोड्यांवर स्वाऱ्या केल्या, नगाऱ्याच्या तालावर शूरांच्या अभिमानास्पद सैन्याचे नेतृत्व केले आणि सिंहगर्जना केल्या, ते सर्व जगातून नाहीसे झाले. असे वाजिद म्हणतो.'

'ज्यांनी नैतिक पुण्यांच्या परपरा उद्ध्वस्त केल्या आणि पापमार्गाकडे धाव घेतली, जे मेव्हण्याना मेजवान्या देतात पण आपल्या वडिलाचा अवमान करतात, जे आपल्या बायकाची बाजू घेतात आणि बहिणींना दूर सारतात– ते सर्वजण नरकाची वाटचाल करतात आणि भूतलावर त्यांच्यासाठी जागा नाही, असे वाजिद म्हणतो '

भक्ताचे चरित्र लेखन करणे किंवा त्याच्या कार्याचे वर्णन करणे ही या संप्रदायाच्या कवीची सांकेतिक परपरा आहे. संत काव्याचे हे आणखी एक लक्षात घेण्यासारखे चिन्ह आहे.

राघवदासाने त्याचा प्रसिद्ध भक्तमाल ग्रथ १६६० (वि. स. १७१७) मध्ये रचला. पुढे मग, धाकट्या सुदरदासाच्या परपरेतील चतरदासाने १८०० मध्ये त्यावर पद्यमय टीका लिहिली.

अनंतदासाने (१७ व्या शतकाचा उत्तरार्ध) परची नावाची पुढील सक्षिप्त चरित्रे, ब्रज मिश्रित राजस्थानी भाषेत, पद्यामध्ये लिहिली : नामदेवजी की, कबीरजी की, रैदासजी की, पीपाजी की, अंगदजी की, त्रिलोचनजी की, रांका बाका की, सेड सम्मन की आणि धन्ना की. नाम मालादेखील कमी अधिक प्रमाणात याच प्रकारच्या म्हणता येतील मोहनदास मेवाडा, लालदास, हिरदै राम (सियाणा) यांच्या नाम माला हे या प्रकारचे काही ग्रथ होत

रज्जबच्या सर्वंगीच्या धर्तीवर आमेरच्या जगन्नाथ दासाने गुण गज नामा नावाच्या एका संग्रहाचे सकलन केले. त्यात अनेक संताच्या वाणीचा समावेश असून तेही तितकेच महत्त्वपूर्ण आहे.

या संप्रदायाच्या अनेक महत्त्वपूर्ण कवींपैकी काही आहेत : गरीबदास

(नारायणा गावाचा), कल्याणजी, चैनजी, खेमजी (रज्जबचा शिष्य), माधौदास (जगजीवनचा शिष्य)

## (८) लालदास : लाल पंथ किंवा लालदासी संप्रदाय

अल्वर (राजस्थान) जवळच्या ढोलीदूप गावी १५४० मध्ये एका गरीब मेव जातीच्या मुसलमान कुटुंबात लालदासचा जन्म झाला. त्याच्या आईचे नाव समदा आणि वडिलाचे चादमल काही कालाने त्याने बाधोलीला (अल्वरच्या इशान्येला १६ मैल) स्थलातर केले आणि नंतर टोडी व रसगणसारख्या अनेक जागी थोडे थोडे दिवस वास्तव्य करून अखेर नागला येथे तो स्थायिक झाला. तेथे तो ४० वर्षे राहिला आणि तेथेच १६४८ मध्ये त्याला मृत्यू आला शेरपूर (बाघेरा) येथे त्याला पुरण्यात आले तो ससारी गृहस्थ होता आणि शारीरिक कष्टाची कामे करून उपजीविका करीत असे. त्याची मुले पहाडा आणि कुतब आणि मुलगी सरूपादेखील भक्ती व साधनेसाठी प्रसिद्ध आहेत

परोपकारी कामे आणि साधनेमुळे लालदास अल्पावधीतच विख्यात झाला आणि लोक त्याच्या भोवती जमू लागले त्याने उपदेश द्यायला सुरुवात केली. त्याच्या शिष्यवर्गापैकी हरिदास, डूगरसी साध, प्राणी साध, आणि भीखण साध हे उच्च कोटीचे कवी होते जन्माने मुसलमान असला तरी लालदासने वैष्णव हिंदू जीवन पद्धतीचा अंगिकार केला होता. त्याच्या मेव मुसलमान आणि सर्व जातीच्या हिंदू शिष्यानीदेखील तेच केले होते. त्याच्या मतानुसार, साधू किंवा सन्याशाने देखील प्रामाणिकपणे काम करून चरितार्थापुरते मिळवले पाहिजे.

त्याच्या मृत्युनतर सप्रदायाला त्याचे नाव मिळाले. लालदासानतर त्याचा साप्रदायिक वारसा माळी जातीच्या लालादासाकडे आला संप्रदायाची महंत परपरा अजून चालू आहे. राम स्मरण आणि कीर्तन हे या संप्रदायातील साधनेचे मुख्य मार्ग आहेत. अल्वर आणि त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशात बहुतेक लालदासी सप्रदायाचे भक्त आढळतात.

त्याच्या वाणीचे प्राचीन व विश्वसनीय असे एकही हस्तलिखित अजून सापडलेले नाही असे असले तरी, लालदास व काही अन्य लालदासी कवीच्या काव्यांचा एक महत्त्वपूर्ण संग्रह उपलब्ध आहे दुलीचद गुप्ता या अल्वरमधील (पूर्वीच्या बहादुरपुरमधील) शिक्षकाने १९३० मध्ये तो संकलित केला आहे. मौखिक परपरा आणि तारीख माहीत नसलेल्या एका हस्तलिखित संग्रहांच्या आधारे हे संकलन केल्याचे म्हणतात. १९३० च्या या संकलनात ७०० च्या वर साखी (दोहे) आणि ४०० पदे लालदासाच्या नावावर दिलेली आहेत खरे म्हणजे ही सर्व पदे काही लालदासाने लिहिलेली नाहीत

कबीर, परमानद दास, वणियाल, काझी महमूद आणि तुलसीदास यांच्या काव्यपवती तसेच राजस्थानातील जनतेत लोकप्रिय असलेल्या अज्ञात कवीच्या काही ओळी देखील तशाच्या तशा किंवा थोडा फेरबदल करून लालदासाच्या नावावर दिलेल्या आहेत. ही सर्व पदे सोडून दिली तरी अदाजे ६० पदे आणि १२५ साख्या लालदासाने लिहिलेल्या आहेत यात अजिबात सशय नाही मौखिक परंपरेमुळे त्याच्या मूळ स्वरूपात व भाषेत परिवर्तन झाले असण्याची शक्यता आहे मूळात त्याची भाषा मेवाडमध्ये प्रचलित असलेली राजस्थानी भाषा असली पाहिजे. त्यात खडी बोली आणि ब्रज भाषेचे किंचित मिश्रण असावे

चितावणी नावाच्या काव्याचे कर्तृत्व विद्वानानी लालदासाकडे दिले आहे पण नीट काळजीपूर्वक परीक्षण केल्यावर दिसून आले आहे की ते काव्य दादू सप्रदायाच्या लालदासाने रचलेले आहे

राम स्मरण, कीर्तन आणि भक्ती ही लालदासाच्या काव्याची मुख्य चिन्हे होत. त्याचा राम निर्गुण व निराकार आहे. कान्ता भक्तीच्या निर्गुण पद्धतीच्या छटाही त्याच्या पदामध्ये दिसून येतात. मन व इद्रियावर ताबा मिळवणे, उपजीविकेसाठी कष्ट करणे, दुसऱ्यावर दया करणे आणि अशाच प्रकारची अन्य शिकवण हे त्याच्या काव्याचे विषय आहेत योगाविषयी काही बोलावयाचे सोडाच, त्याने भक्ती आणि ज्ञानाच्या महिम्यापुढे योगाला झुगारून दिले आहे साखी व पदाचे वेगवेगळ्या रागामध्ये वर्गीकरण केलेले आहे. लालित्य व सहजता ही त्याच्या काव्याची वैशिष्टचे आहेत तीन साख्या येथे देत आहोत ·

'साधूने ईश्वराची सेवा करावी, उपजीविकेसाठी निढळाच्या घामाने कमाई करावी आणि कधीही भिक्षा मागत हिंडू नये.'

'तुम्हाला जर गृहस्थाश्रमी व्हावयाचे असेल तर कष्ट करून गुजराण करा भिक्षा मागणे ही निश्चितच मरणाची वाट आहे.'

'योगाच्या रोजच्या यातना सहन करण्यापेक्षा पेटत्या अग्नीत उडी घेऊन मरणे अधिक सोपे आहे. ते शस्त्राखेरीज रोज स्वतःशी लढण्यासारखे आहे'

या सप्रदायाचा आणखी एक थोर संत कवी आहे हरिदास. लेखनाची गुणवत्ता आणि वैपुल्य, विद्वत्ता आणि साधनेसाठी तो प्रसिद्ध आहे. १८३५ च्या एका हस्तलिखितात त्याच्या पुढील साहित्यकृती उपलब्ध आहेत : विवेक गीता – ५१५ पदामध्ये गीतेचा साराश; सार संग्रह – १३१ पदामध्ये विश्वाचे मूळ, निर्मिती, प्रसरण, व्याप्ती आणि विसर्जन, पच तत्त्वे, ज्ञानेंद्रियं, जीव, त्याची गर्भातील अवस्था आणि जन्मानंतरचा काल, आत्म ध्यान जोग सवाद – ७ प्रकरणांतील (जुग्यें) १३१ पदामध्ये ध्यान, अजपा जाप, हठयोग, पचमुद्रा, षट् चक्रे, नागशक्ती, प्राणायाम, त्याची साधना, जोग-ध्यान, पचतत्त्वे, प्रकृती, ज्ञानेंद्रिये, चार

अवस्था, दश वायू, आत्मज्ञानाची दिशा, आणि विश्वाचे वर्णन दिलेले आहे लाल-दास व हरिदासामधील सवादरूपात हे सांगितलेले आहे त्याच हस्तलिखितात हरिदास प्रेमदास सवादही आढळतो त्यात ६१ पदे असून विषय आहे– पूजा, राम आणि कृष्ण, त्याचे अवतार, सगुण-निर्गुण, प्रेमभक्तीने ब्रह्मबोध, विश्वाचे स्वरूप, मन, योग, नाडी आणि आत्मबोधाचे मार्ग ही रचना आणि वर सांगित-लेल्या तिन्ही रचना चौपइ-दोहा पदामध्ये आहेत हस्तलिखितात भजने (३३५), रेखता (२४), साखी (दोहा – ४०) यासारखी स्फुट पदे आणि सकीर्ण पदेही (१०) आहेत

मागे उल्लेखिलेल्या, १९३० मध्ये सकलित केलेल्या हस्तलिखितातही भजने आहेत ही दोन्ही हस्तलिखिते पाहता भजनाची एकूण सख्या ५०० च्यावर जाते. त्याच्या सर्व लेखनामध्ये भजनाना विलक्षण लोकप्रियता व ख्याती मिळाली. भावनाची उत्स्फूर्त व साधी अभिव्यक्ती त्यात असून नामस्मरण, हरिभक्ती, आत्मपरिचय, आत्मबोध व शरणागतीवर ती लिहिलेली आहेत त्याने उपासनेच्या तीन प्रचलित पद्धतींना (ज्ञान, भक्ती व योग) महत्त्व दिलेले असले तरी त्याचा कल निर्गुण भक्तीकडे अधिक आहे. त्याने दशावतार आणि राम व कृष्णाच्या लीलांचेही वर्णन केले आहे खरे म्हणजे, तो निर्गुण आणि सगुणमध्ये भेद करीत नाही. विविध वृत्तीच्या व क्षमतेच्या लोकासाठी त्याने उपासनेच्या वेगवेगळ्या पद्धती सांगितलेल्या आहेत. ढोंग आणि दभावर त्याने ओढलेले कोरडे दादू-प्रमाणेच सभ्य आणि परिणामकारक आहेत. त्याचे गूढ अनुभव आणि साधना-देखील त्याच्या काव्यात वर्णिलेली आहे. त्याच्या भजनांची भाषा ब्रजमिश्रित राजस्थानी असून, कधीकधी ब्रजभाषेकडे तिचा कल अधिक दिसून येतो. जवळ-जवळ दोनशे वर्षांहून अधिक काळ ही भजने मौखिकरूपात प्रचलित राहिल्याने त्याच्या स्वरूपात व भाषेत फरक होणे अनपेक्षित नाही संवादाची भाषा बहुतेक राजस्थानी आहे आणि म्हणूनच ती त्याची खरी भाषा असल्याचे म्हणता येईल. दोन साख्या पहा .

'सगुण आणि निर्गुणमध्ये भेद कोठे आहे ? ती सर्व त्या ईश्वराचीच किमया आहे हरिदास त्याच्या स्वानुभवाच्या बळावर म्हणतो की देव बाहेर कोठेही नसून प्रत्येकाच्या आतच असतो '

'आपले अत:करण रामाला समर्पित केले की शब्द व रूपाचे सर्व भेद नाहीसे होतात. हरिदास म्हणतो, रामावरील तुमचे भक्तियुक्त प्रेम सागा आणि कृत्रिम रूपे सर्व सोडून द्या.'

शेरपुरच्या डूगरसी साधने आपल्या गुरू लालदासचे दोहा–चौपाईमध्ये श्री लालदास महाराज की परिचावलि नावाचे चरित्र रचले हे निवेदनात्मक काव्य

असून ३१ 'नुक्ता' (किंवा लहान प्रकरणा) मध्ये विभागलेले आहे साध्या राज-स्थानी भाषेतील ५८० पदे त्यात आहेत. लालदासचे ते एकमेव प्राचीन चरित्र होय. अन्यत्र, 'पाटण' म्हणजे 'नगर' या शब्दाचा चुकीचा अर्थ लावल्याने तो पटनाचा असल्याचे सांगितलेले आहे.

हरिदासाच्या भजनांवरून वाटते की सोभन, भीखण, ठाकुरदास आणि प्राणी साध हे सर्व त्याच्या हयातीतच मरण पावले होते. उपलब्ध ४० पदे प्राणी साधची असावी असे वाटते. ती हरि भक्ति, नामस्मरण, ईश्वराची थोरवी आणि कवी गुरू लालदासवरील आहेत निरंजन ब्रह्माच्या पूजेची फक्त प्राणी प्रशंसा करतो

भीखण साधच्या पदामध्ये (२५) हरजस आणि चाद्रायणे देखील आहेत. त्यात ईश्वराची व गुरू लालदासची थोरवी सांगितलेली असून नाम स्मरणावर भर दिलेला आहे ब्रज मिश्रित सोप्या राजस्थानीत ती आहेत. एक चाद्रायण आहे

चंचल मनावर ताबा ठेवा आणि ईश्वराच्या स्मरणावर लक्ष केंद्रित करा. परमसुख प्राप्तीसाठी रात्रंदिवस त्याच्या नावाचा जप करा. सतगुरू लालदासच्या चरणी भीखण प्रार्थना करतो की, तो दास असून त्याच्या अवगुणाना गुरूने क्षमा करावी.

सोभन साधच्या साहित्यकृतींमध्ये सुमारे ४० स्फुट पदाचा (हरजस, रेखता चांद्रायण, इत्यादी) आणि यज्ञ बखान नावाच्या एका लघुकाव्याचा समावेश आहे पदाचे विषय नेहमीचेच आहेत. बखानमध्ये लालदासच्या जीवनातील ठळक प्रसंगाचे वर्णन आहे.

अलहदाद (१८ वे शतक) याची सुमारे २० पदे आहेत. भावनांची सघनता, साधी आत्माभिव्यक्ती आणि विनयशीलता यासाठी ती उल्लेखनीय आहेत. रामस्मरण हा त्या काव्यांचा मुख्य विषय आहे. एक पद आहे :

' पतितोद्धारक देवा, घातकानुघातके दोषांच्या गर्तेत खितपत पडलेल्या भक्तांना त्यातून बाहेर काढण्याचे सामर्थ्य तुझ्या ठायीच आहे. ध्रुव आणि नामदेवाच्या मदतीला तू धावून आलास. अजामिळाने नरकात असताना तुझ्या नावाचे पहिले अक्षर उच्चारताच तत्काळ त्याला मोक्ष प्राप्ती झाली. हे जगत्कर्त्या परमेश्वरा, माझी दैना तुलाच काय ती ठाऊक, असे अलहदाद म्हणतो.'

या संप्रदायाचे आणखी काही महत्वाचे कवी आहेत– ठाकुरदास (ठाकुरिया); प्रभु साध, महानंद, नाथू साध, जन कौश, बक्सा. चाद साध, मगली साध आणि बाजू, ईश्वरावरील श्रद्धा, गुरू, नामस्मरण आणि जीवनातील साधेपणाविषयी सांगणाऱ्या त्याच्या भजनांसाठी ते सुप्रसिद्ध आहेत

## (९) चरणदासजी चरणदासी किंवा शुक संप्रदाय

चरणदासजी आणि त्याच्या दोन शिष्या सहजोबाई व दयाबाई याची काव्ये समिश्र भाषेत म्हणजे खडी बोली, ब्रज आणि राजस्थानी भाषेत असून त्यातही खडी बोली व ब्रज या भाषाचे प्रभुत्व आहे. राजस्थानच्या संतवाङ्मयात चरणदासजी व त्याच्या सप्रदायाने खूपच मोलाची भर घातली आहे. म्हणूनच प्रस्तुत ग्रथात त्याचा परामर्ष घेणे उचित होईल.

चरणदासजी (१७०३–१७८२) चा जन्म अल्वर (राजस्थान) जवळच्या डहरा गावी झाला त्याच्या वडिलाचे नाव होते मुरलीधर वडिलाच्या मृत्यूनतर आई कुजो देवी त्याच्या वयाच्या सातव्या वर्षी त्याला घेऊन माहेरी दिल्लीला आली. चरणदासजीने खूप प्रवास केला, अनेक ठिकाणी वास्तव्य केले पण त्याचे मुख्य स्थान होते दिल्ली आणि तेथेच त्याने राम म्हटला

श्रीमद् भागवत पुराण सागणारे पौराणिक सुखदेव आपले गुरु असल्याचे चरणदासजी म्हणतो. १७५३मध्ये त्याने वैष्णव संप्रदाय सुरू केला त्याच्या स्वत.च्या व त्याच्या गुरुच्या नावावर या सप्रदायाला चरणदासी किंवा शुक संप्रदाय म्हणतात. भक्तिसागर या त्याच्या काव्यसग्रहाच्या कित्येक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या आहेत. त्याची काव्ये पुढीलप्रमाणे आहेत– 'वर्णन' (ब्रज चरित्र, अमरलोक धाम, धर्म, जहाज, अष्टांग योग, योग सदेश सागर, ध्यान स्वरोदय, भक्ति पदार्थ, ब्रह्मग्यान इ ), 'अंग' (गुरुदेव का, सुमिरन का, सत सूरमा का, योग का, वैराग्य का, इ.) 'लीला' (माखन चोरी, मटकी, दान, काली नाथन, अनुराग, रास, होरी, गोपी-विरह, संयोग, बेणी गुंथन, कुरुक्षेत्र, नास्केत इ.) आणि संकीर्ण पदे, छप्पय, इ.

चरणदासजी श्रीमद् भागवत पुराण पूर्णतया मान्य करतो व त्याचे अनुसरण करतो ज्ञान, योग, ध्यान आणि भक्तीची शिकवण तो देतो. पण 'नवधा भक्ती'वर त्याचा अधिक भर आहे. त्याच्या मते भक्ती ही योगाहून श्रेष्ठ असून तिच्याखेरीज ईश्वरप्राप्तीचा कोणताही मार्ग यशस्वी होऊ शकत नाही. परमात्मा अनिर्वचनीय असला तरी त्याला सगुण तसेच निर्गुण म्हणून त्याची व्याख्या करण्याचा प्रयत्न झालेला आहे. परमात्मा सगुण व निर्गुण दोन्ही आहे. तद्वत या दोहोंच्या पलीकडचा आहे. अवतारावर त्याची श्रद्धा आहे ईश्वराचे धाम, नाम, रूप आणि लीला शाश्वत आहेत. माया ही ईश्राची सत्ता असून त्याच्यापासून उत्पन्न झालेली आहे. ईश्वर स्वतः मायेचे रूप घेतो. अशा प्रकारे विश्व हे ईश्वराचेच प्रकटीकरण आहे

त्याच्या पदातून त्याच्या मनाची निर्मळता व गाभीर्य दिसून येते.

सहजो बाईचा जन्म एका धूसर कुटुंबात झाला. १७४३ मध्ये तिने सहजप्रकाश लिहिला. तो मुख्यत· दोहा, चौपाई, कुडलिया आणि पदामध्ये रचलेला

आहे. विषय आहेत– गुरु, भक्ती, वैराग्य, जीवनाचे पावित्र्य, प्रेम, निर्गुण, सगुण, नामस्मरण, इत्यादी. अभिव्यक्ती सहज असून समजायला सुलभ आहे.

दयाबाईचा जन्म एका ढूसर कुटुंबात डाहरा (अल्वर) येथे झाला. तिची दोन काव्ये उपलब्ध आहेत– दया बोध (१३८ दोहा-चौपाई) आणि विनय मालिका (१०५ दोहे). दया बोधमध्ये प्रेम, अजपा जाप, वैराग्य, गुरु भक्ती, इ आहे, तर विनय मालिकामध्ये तिची भक्ती, निष्ठा, आणि ईश्वरावरील प्रगाढ श्रद्धेचे लालित्यपूर्ण पद्धतीने वर्णन आलेले आहे

जोगजीतजी (१६८७–१७८३) याने रचलेल्या लीलासागरमध्ये चरणदासजीचे तपशीलवार व विश्वसनीय चरित्र दिलेले आहे ते दोहा – चौपाईमध्ये असून त्याची रचना १७५४ ते १७६२ च्या दरम्यान म्हणजे चरणदासजीच्या जीवनकालात झालेली आहे

रामरूपजी (१७४४–१७९०) याने १७७२ मध्ये मुक्तिमार्ग रचला. निर्गुण भक्ती, ईश्वराला समर्पण, इ विषयावरील अनेक काव्ये त्यात आहे काव्ये अतिशय हृदयग्राही असून शुक संप्रदायात त्यांना फार वरचे स्थान आहे त्याच्या गुरु भक्ती प्रकाशमध्ये चरणदासजीचे चरित्र सांगितलेले आहे

शुक संप्रदायातील अन्य प्रमुख लेखक आहेत– नूपाबाई, अखैरामदासजी, मनमोहनदासजी आणि सरसमाधुरी शरणजी या संप्रदायातील अन्य कवींपैकी बहुतेकांची भाषा राजस्थानी नसल्याने त्यांचा विचार प्रस्तुत ग्रंथात करणे अप्रशस्त होईल

## (१०) संतदासजी (१६४२–१७४९) : गूदड पंथ

अग्रदासाच्या शिष्य परंपरेत संतदासजी पाचवा असल्याचे आपण मागे पाहिले आहेच तो गूदड (गोधडी) नेसत असे म्हणून त्याला व त्याच्या संप्रदायाच्या साधूंना गूदड पंथी म्हणत असत. त्याच्या साधनेचे मुख्य स्थान दांतडा (भीलवाडा) येथे होते साखी (दोहा), रेखता आणि पदे असलेली त्याची 'वाणी' खूप विपुल आहे साख्या ५५ 'अंगा'मध्ये विभागलेल्या असून निर्गुण भक्तीवर लिहिलेल्या आहेत. तो सर्व प्रकारच्या दिखाऊपणाचा व दांभिकतेचा, विशेषतः साधनेच्या क्षेत्रातील, तिरस्कार करतो लौकिक वस्तूंच्या क्षणभंगुरतेकडे लक्ष वेधून तो राम स्मरणाचे प्रतिपादन करतो आणि संत व सत्गुरुच्या महत्त्वाची मनापासून वाखाणणी करतो तो निर्गुण उपासना अनुसरतो. त्याच्या मतप्रणालीवर शाहपुरा शाखेच्या रामस्नेही संप्रदायाची उभारणी झाली

मागे सांगितले आहेच की १८ व्या शतकात संत संप्रदायातील राम स्नेही नावाच्या चार परंपरा एका पाठोपाठ एक रेण, शाहपुरा, सीथल आणि खेडपा येथे

स्थापन झाल्या होत्या या चारही संप्रदायांचे नाव फक्त सामान्य असल्याने त्यांची वेगवेगळी संक्षिप्त माहिती खाली दिली आहे

## (११) रामचरणजी : राम स्नेही सप्रदाय, शाहपुरा

रामचरणजी (१७१९–१७९८)चा जन्म मालपुरा (जयपूर) जवळील सोडा गावी एका बीजावर्गी वैश्य कुटुबात झाला. संतदासजी (गूदड पंथी)चा शिष्य, दांतडाचा कृपाराम याच्याकडून त्याने दीक्षा घेतली रामचरणजीने १७५८ मध्ये गूदड वस्त्रे टाकून दिली आणि १७६० मध्ये भीलवाडाला आला त्याच वर्षी त्याने तेथे राम स्नेही सप्रदाय स्थापन केला नऊ वर्षे भीलवाडा आणि त्याच्या जवळच्या कुहाडा गावी राहिल्यावर १७६९ मध्ये तो शाहपुरला आला आणि तेथेच त्याने १७९८ मध्ये देह ठेवला. शाहपुऱ्यातच संप्रदाय फोफावला आणि या सप्रदायाचे तेच मुख्य पीठ आहे त्याच्या बारा प्रमुख शिष्यांपैकी नवलराम, रामजन, भगवानदास आणि रामप्रताप हे महान कवी होते काही शिष्यानी वेगवेगळ्या ठिकाणी, उदा बीकानेर, उदयपुर, कोटा, जोधपुर इ. जागी रामद्वारांची स्थापना केली त्यापैकी कित्येकाची परंपरा अजून चालू आहे

रामचरणजीच्या वाणीचे पहिले सकलन नवलरामजीने केले आणि उरलेल्या व नवीन रचलेल्या काव्याचे सकलन रामजनजीने केले सख्येच्या दृष्टीने पाहता ही वाणी छत्तीस हजाराच्यावर अनुष्टुभ श्लोकाइतकी आहे आणि गुणवत्तेच्या दृष्टीनेही तितकीच महत्त्वाची आहे ही वाणी नंतर अणभै वाणी नावाने प्रकाशित झाली. ज्ञान, वैराग्य, योग, भक्ती, सदाचार, नीतिनियम, त्याचे स्वानुभव इ. अनेक विषयावर ती रचलेली आहे रामस्मरण व भक्तीवर त्याचा विशेष भर आहे त्याच्या काव्यात अंत:करणातील भावनाचा उत्स्फूर्त आवेग असून ती अतिशय परिणामकारक आहेत. ती सोपी, स्वाभाविक व लालित्यपूर्ण आहेत. भाषा प्रचलित राजस्थानी असून त्यात यदाकदा ब्रज भाषा व खडी बोलीचे किंचित मिश्रण दिसून येते. धार्मिक काव्य व साधनेच्या बाबतीत वाणी विश्वकोशात्मक स्वरूपाची आहे.

या सप्रदायात अनेक थोर कवी होऊन गेले. त्यापैकी काहीचा येथे विचार करीत आहोत.

रामजनजी लड्ढा (१७३८–१८१०) याने १७६७ मध्ये दीक्षा घेतली. १७९८ मध्ये संप्रदायाची गादी घेणारा तो दुसरा आचार्य होय पदे आणि दोहा, झूलणा, छप्पय, कुडलिया, इ. लोकप्रिय छंदामध्ये रचलेली त्याची वाणी सख्येने खूप मोठी आहे त्याने १९ ग्रंथही लिहिले ते असे– उपदेश बोध, काल बोध, रतन बोध, विचार बोध, प्रतीति बोध, वैराग बोध, सुमिरण बोध, राम पद्धती, इ.

आणि दृष्टात –सागर वरील एक टीका. त्याचे काव्य निर्गुण भक्तिविषयक असून मुख्य सूर राम स्मरण व भक्तीचा आहे. भाषाशैली सुस्पष्ट व मनोवेधक आहे. भाषा मूलतः सोपी राजस्थानी आहे.

भगवानदास करवा (१७४४–१८०२) हा पीपाड गावचा होता. याने १७६६ मध्ये भीलवाडा येथे रामचरणजीकडून दीक्षा घेतली त्याने चहू दिशाना खूप प्रचार केला आणि राम भक्तीचा प्रसार केला संप्रदायात त्याला खूप मानाचे उच्च स्थान आहे. त्याचे एकवीस प्रमुख शिष्य होते. त्यांपैकी काहींची परंपरा अजून चालू आहे. त्याची वाणी सुमारे ४००० श्लोकाइतकी असून लोकप्रिय छदांमध्ये (दोहा, चौपाई, अरिल, कवित्त, कुडलिया, रेखता इ.) ती अभिव्यक्त केलेली आहे. जीवनाच्या विविध बाजू, विशेषतः राम स्मरणाची व भक्तीची शिकवण देऊन आध्यात्मिक जीवनाविषयी सोप्या राजस्थानी भाषेत त्यात सांगितलेले आहे. दोन साख्या अशा आहेत :

'स्वतःला ईश्वराला समर्पित करून टाका म्हणजे सर्व अभिलाषा निश्चित नाहीशा होतील. अन्य सर्व आशा सोडून देवाचे नाव रात्रंदिवस घ्या '

'राम प्रभू माझा योगक्षेम चालवितो. त्याचे स्मरण करा, त्याचे नाव जपा असे भगवानदास म्हणतो.'

रामचरणजीच्या तीन प्रमुख गृहस्थाश्रमी शिष्यांमध्ये भीलवाडाचा नवल राम मंत्रीही होता. १७६० नतर काही कालाने त्याने सहकुटुंब दीक्षा घेतली. त्यानेच सर्वप्रथम आपल्या गुरुची वाणी सग्रहीत केली भीलवाडा येथे १७८५ मध्ये तो मरण पावला. त्याच्या स्वतःच्या काव्यांच्या सग्रहाचे नाव आहे नवल सागर. काव्ये राम भक्ती, नीतिबोध आणि धर्मोपदेश, त्याचे अनुभव आणि समर्पण भाव यावरील आहेत. भाषा प्रचलित लोकप्रिय राजस्थानी असून अकृत्रिम व लालित्यपूर्ण आहे.

सर्वांग सार ही त्याची आणखी एक महत्त्वाची साहित्यकृती आहे. त्यात जात-पात, धर्मश्रद्धा, मतप्रणाली किंवा साधना याना फारसे महत्त्व न देता सुमारे ८५ कवींच्या काव्याचा सग्रह केलेला आहे. त्यांपैकी काही कवी सुप्रसिद्ध आहेत. उदा. गोरख, नामदेव, कबीर, अग्रदास, नरसी, पीपा, रैदास, दादू, मीरां, मति सुदर, आणि मलूक, काही कवी अल्पज्ञात आहेत. उदा. काझी महमूद, सम्मन, कालू, घाटमदास, द्वारकादास, पेमदास, बोहिथदास, बालकराम, मुरलीराम, माधोदास, वेणी आणि पृथ्वीनाथ आणि काही कवी अज्ञात आहेत. उदा चेतन, जयरामदास, जैमल, भींव, मडण, मोतीराम, मुकंद आणि सोम काव्यामध्ये त्याने पुढील धर्म-ग्रथातील अवतरणे दिली आहेत— भागवत पुराण, जैन सुभाषितावली, गीता, शिव पुराण, हनुमान नाटक, आध्यात्म रामायण, महाभारत, प्रबोध चंद्रोदय, हितोपदेश आणि नीतिशतक तसेच भक्तमाल, विचारमाल, रामचरितमानस,

कवित्त माल, स्नेह लीला, नाटक समयसार, हरचद सत ग्रथ, धर्म संवाद आणि ज्ञान तिलक, इ. लोकप्रिय राजस्थानी व हिंदी ग्रथातील अवतरणे दिली आहेत यावरून त्याचे विपुल अध्ययन, प्रगाढ ज्ञान व गहन चितन-मनन दिसून येते सकलन अद्वितीय असून साहित्याच्या इतिहासासाठी अतिशय उपयोगी आहे. अनेक अज्ञात व अल्पज्ञात कवींच्या काव्याचे नमुने यातच फक्त मिळतात.

नवल रामच्या दोन साख्या आहेत :

' ईशस्मरणात किंवा सद्‌गुरुच्या सहवासात आनद मिळवा नवल म्हणतो, बाकीच्या सर्वांपासून स्वत ला मुक्त ठेवा आणि प्रापंचिक गोष्टीमध्ये स्वत'ला गुतवू नका '

' दुर्दैव आले की जमीन, घर आणि सपत्ती सारे काही जाते. मात्र, अखेरच्या श्वासापर्यंत रामाचे नाव जपून ठेवा असे नवल म्हणतो '

रामप्रताप (मृत्यू १८००) याने वेगवेगळ्या वृत्तांमध्ये विपुल काव्यरचना केली. त्याने 'निरूपण' नावाची अकरा लहान पुस्तकेही लिहिली त्याची नावे आहेत— गुरु महिमा, गुरु महिमा सार, गुरु संपत्ती, सुमिरण सार, भक्ती, कक्का काया करणी सार, दृष्टान्त विचार गूढ आणि कक्का बत्तीसी भाषा ब्रज भाषेचे किंचित मिश्रण असलेली राजस्थानी आहे त्याच्या काव्यात वैराग्य व राम भक्तीचा सूर मुख्य आहे.

दुल्हे राम (१७४९–१८२४) याला १८१० मध्ये आचार्य पद मिळाले. चौदा हजार श्लोकांइतकी वाणी त्याने रचली. वाणीमध्ये विविध विषयावरील साखी (दोहा २९४५), चाद्रायण, झूलणा, कवित्त, सवैया, कुडलिया इत्यादींचा समावेश असून पदेही आहेत. पारपरिक विषय त्याने साध्या पद्धतीने हाताळले असून राम भक्तीचा स्वर त्यात चालू ठेवला आहे.

मुरली रामावर (१७४५–१८००) नवलरामाचा खूप प्रभाव होता १७६८ मध्ये त्याने रामचरणजीकडून दीक्षा घेतली आणि असंख्य स्फुट पदे रचली. त्याने विविध विषयावर नऊ लहान ग्रथ लिहिले— चेतावणी सार बोध, अमृत सार बोध, नाँव योग, वैष्णव सार बोध, गृहस्थ सार बोध, गुरु महिमा स्तुति, साध पारख्या, इ हे निर्गुण भक्तीशी संबधित आहेत. भावनाची तीव्रता आणि अभिव्यक्तीतील लालित्य ही त्याच्या काव्याची मुख्य लक्षणे होत.

जगन्नाथ सोनी १८२४ पर्यंत हयात होता. त्याची उपलब्ध काव्ये आहेत— निर्गुण मतावरील जथारथ बोध, शाहपुरा येथे प्रत्येक फाल्गुनात साजऱ्या होणाऱ्या फूल डोल उत्सवावरील फूल डोल समाधी, रामचरणजीची कथा सागणारी ब्रह्म समाधी लीना जोग व गुरु लीला विलास, ८४ उपदेश सागणारे चौरासी बोल आणि विभिन्न प्रकारच्या स्त्रियांची वैशिष्टये, वर्तणूक व कृत्ये सांगणारे बिनता

लचिन बोध (बिनता बोध). काव्ये लोकप्रिय राजस्थानी भाषेत आहेत बिनता बोध मध्ये सती विषयक खालील उताऱ्यात वर्णिलेल्या भावना क्रांतिकारक व अपूर्व वाटतात :

' पुढील जन्मीही तोच सहवास लाभावा म्हणून सती त्यांच्या पतीच्या शवाबरोबर मरण पत्करतात. यामुळे लौकिक कीर्ती फक्त मिळते. जन्म-मरणाचा फेरा काही चुकत नाही. स्वतःला जाळून घेतल्यावर त्यांना सर्वांचे मातृपद लाभते त्याचे नातेवाईक आणि भक्तजन त्याच्या अस्थी गोळा करतात व त्याच्या प्रशंसेची गाणी गातात हे बलिदानही हरि भजनाची साथ नसेल तर फारसे फलदायी होत नाही ईश्वराला जाणण्याचे साधन या दृष्टीने जीविताला महत्त्व आहे, ते भस्मीभूत करण्यात काय अर्थ आहे ? असे जगन्नाथ म्हणतो. '

सरूपा बाई ही नवलरामजीची मुलगी सासरची मडळी भक्तीमध्ये व्यत्यय आणतात म्हणून तिने घर सोडले आणि शाहपुऱ्याला रामचरणजीकडून दीक्षा घेतली. रामचरणजी १७९८ मध्ये मरण पावला त्यावेळी ती तेथेच हजर होती. तिने भक्तिपदे रचली आहेत. त्यातून तिच्या मनाचा स्वच्छपणा दिसून येतो. पदे सोप्या राजस्थानी भाषेत आहेत. रामचरणजीच्या मृत्यूवर तिने लिहिलेल्या 'मरसिया पदातील काही ओळी पुढे देत आहोत :

' हे सखी ! आज गुरू जग सोडून गेले हा शोक असह्य आहे. बाकीची मर्व दुःखे भोगायला मी तयार आहे; पण हे मात्र माझ्या सहनशक्तीपलीकडचे आहे रामचरणजीसारखा सतगुरु पुन्हा भेटणे आता कसे शक्य होईल ? माझे वडील नवलरामजींनी स्वर्गलोकी प्रस्थान केले तर ते मी सहन करू शकेन. गुरुचा शोक मात्र इतका जबरदस्त आहे की तो शब्दात सागता येणार नाही गुरुची दासी सरूपा शोकसागरात इतकी खोल बुडून गेली आहे की शब्दात ती आपले दुःख व्यक्त करू शकत नाही. '

संग्रामदास (सग्रामदाम) (१८ व्या शतकाचा उत्तरार्ध) हा वर उल्लेखिलेल्या मुरली रामजीचा शिष्य होता त्याने भक्ती, नीती, विधि नियम इत्यादींवर सुमारे ११५ कुंडलिया रचल्या त्या रोखठोक असून त्यात लालित्य नाही. लोकप्रिय उपमा, दृष्टान्त व म्हणींचा त्याने वापर केला आहे. प्रचलित राजस्थानीच्या सुसंस्कृत स्वरूपाची त्याची भाषा आहे. एक कुंडली आहे—

मित्रा माझे ऐक, सग्राम सागतो. देवाची पूजा कशी करावी ? सध्या मी दोन भयंकर शत्रूंच्या तावडीत आहे. ते कोणते ? मित्र विचारतो. दिवसा गप्पा आणि रात्री निद्रा. त्यांच्या दुष्ट प्रभावाखाली माझ्याजवळचे सारे काही मी घालवून बसलो आहे. म्हणून संग्राम विचारतो, देवाची कशी आणि केव्हा पूजा करावी ?

भगवानदासचा शिष्य मुक्त राम खूप हिंडून अखर बीकानेरला स्थायिक झाला. साधना आणि भक्तीसाठी तो विख्यात होता. १८१५ मध्ये तो मरण पावला त्याची वाणी १४ हजारावर श्लोकाइतकी असल्याचे प्रसिद्ध आहे त्यात २० काव्याचाही समावेश आहे त्यापैकी काही आहेत– गुरु स्तुती, नाम प्रताप, कक्का बत्तीसी, भक्ति महिमा, चितावणी, ध्यान प्रकाश, मन चरित, भक्त बिरुदावली, विचार बोध आणि गुरु उपकार ज्ञान, भक्ती, नीतिबोध आणि अशाच प्रकारच्या अन्य विषयावर वाणी रचलेली आहे अभिव्यक्ती दमदार व प्रभावशाली असून सोप्या राजस्थानी भाषेत आहे

या संप्रदायाचे अन्य काही उल्लेखनीय कवी आहेत–देवादास (मृत्यू १७८७), सूरतराम (मृत्यू १८१८), राम वल्लभ (मृत्यू १८१३), पोखरदास (मृत्यु १८१५), आणि मनोरथ राम (१९ व्या शतकाचा पूर्वार्ध).

## (१२) दरियावजी : रामस्नेही संप्रदाय, रेण

एका मतानुसार, खींयासर (बीकानेर) गावाच्या प्रेमदासजीने १६८९ मध्ये सतदासजी गूदड पथीकडून दीक्षा घेतली, तर अन्य मतानुसार, सतदासजीचा शिष्य बलकदासजीकडून दीक्षा घेतली. त्याच्या उपलब्ध वाणीमध्ये, लोकप्रिय राजस्थानी भाषेत लिहिलेल्या दोहा व सवैयाचा समावेश आहे. निस्सीम भक्तीयुक्त रामस्मरण हा त्याच्या वाणीचा मुख्य विषय आहे. त्याचे दोन दोहे आहेत :

'देवाचे नाव मनातल्या मनात घे, ते जर मोठ्याने घेतले तर ती आध्यात्मिक घट आहे. खोलवर पेरलेले बी फक्त उगवते, वरवर टाकलेले बी पक्षी किंवा पशू खाऊन टाकतात.'

'इतरानी केलेल्या टीकेकडे अवधान दिले तर ते शेतातील तणे काढून टाकण्यासारखे आहे तणे काढून टाकल्याने, प्रेमजी म्हणतो, आवश्यक धान्याचे भरघोस पीक मिळते.'

दरियावजी (१६७६–१७५८) चा जन्म जैतारण येथे झाला. वडिलाच्या मृत्युपश्चात वयाच्या सातव्या वर्षी तो रेण (नागोर) येथे रहावयास आला १७१२ मध्ये तो प्रेमदासजीचा शिष्य झाला. त्याच्या साधनेचे स्थान रेण होते या सप्रदायाचे मुख्य पीठ तेच आह त्याच्या उपलब्ध वाणीत ४१२ साखी (दोहा) आणि सुमारे ३० पदे आहेत. सतगुरु को, सुमिरन को, विरह को, सूरातन को इत्यादी अंगामध्ये त्याच्या साख्याचे वर्गीकरण केलेले आहे. वाणीमध्ये त्याची समर्पित साधना, राम व त्याच्या राम स्मरणावरील त्याची गहन श्रद्धा आणि त्याची गूढ अनुभूती याचा आविष्कार झालेला आहे. त्यातून सुसंवाद, संयोगीकरण आणि त्याची दयाळू वृत्ती दिसून येते. तो जरी निर्गुण निराकाराचा उपासक असला

तरी सगुण साकाराप्रतिदेखील तो तितकाच उदार आहे. त्याची भाषा सोपी राजस्थानी आहे. अभिव्यक्तीत जिवतपणा व लालित्य आहे तीन साख्या पहा .

'बदलत्या वातावरणानुसार वारंवार रंग बदलणाऱ्या सरडयाची काय किंमत ? भक्त दरिया म्हणतो, हंस किती तरी अधिक चांगला आहे, कारण सर्व प्रकारच्या वातावरणात तो एकच रंग कायम ठेवतो.'

'कट्टर विरोधक सत्याचे महत्त्व जाणू शकत नाही. जसे सूर्योदय झाला तरी घुबड प्रकाश पसंत करायचे नाकारतो '

'कोणाची प्रशंसा करावी आणि कोणाला तुच्छ लेखावे ? दोन्ही बाजू तुल्य-बल आहेत. निर्गुण माझा पिता आहे तर सगुण माझी माता आहे.'

दरियावजीचे ८१ मुख्य शिष्य होते असे म्हणतात. त्यात नऊ शिष्या देखील होत्या. किसनदास, सुखराम, हरखाराम, पूरणदास आणि नानक हे त्याचे शिष्य अधिक महत्त्वाचे होत.

रेणचा पूरणदास (१६७८–१७३५) हा १७१५ मध्ये दरियावजीचा शिष्य झाला आणि उरलेले बहुतेक आयुष्य त्याने रेण येथेच साधना करण्यात घालवले. त्याची काव्ये राम भक्ती आणि नाम साधनेवरील असून ब्रह्म प्रकाश आणि ब्रह्म विलास या दोन पुस्तकात संग्रहित आहेत. वाणी वेगवेगळया अंगामध्ये आहे.

रेण (नागोर)जवळच्या टूकला गावाच्या किसनदास (१६८८/८९–१७६८) याने १७१६ मध्ये दीक्षा घेतली. त्याने लोकप्रिय छंदांमध्ये अनेक पदे रचली. १९ काव्येही लिहिली. उदा. गुरु महिमा, भक्तमाल, चातक बोध, निरभै ध्यान, ग्यान, उदास, सुमिरन ध्यान, चितावणी, समर्थ बोध आणि अचल बोध इ. गुरु आणि रामावरील त्याच्या अटळ निष्ठेचा सोप्या राजस्थानी भाषेत काव्यामध्ये आविष्कार झालेला आहे. त्याच्या दोन साख्या आहेत :

दोन काष्ठांच्या घर्षणाने अग्नी निर्माण होतो आणि ताक घुसळल्याने नव-नीत मिळते, तद्वत रामनामाचा जप मनापासून केल्यास जीवाला ब्रह्म स्थिती लाभते असे किसनदास म्हणतो.

अरे किसना, तुला कशाचे भय ? तुला समर्थ गुरुचे पाठबळ आहे. तो तुझे परब्रह्माशी तादात्म्य करून देईल.

भक्ती आणि साधनेसाठी प्रसिद्ध असलेला नानकदास १७१७ मध्ये हयात होता. त्याचे लघुकाव्य गुरु महिमा, साखी आणि पदामध्ये ईश्वराची व गुरुची थोरवी सांगितलेली आहे.

साजू गावाचा मनसा राम मोडाणी दरियावजीच्या ७२ शिष्यांपैकी एक होता. त्याच्या वाणीचे विषय आहेत— नाम साधना, साधूची लक्षणे, जीवनाची क्षण-भंगुरता. इ. एका कुंडलियामध्ये तो म्हणतो :

' प्रत्येक जण स्वतःला साधू म्हणवितो, पण खरे साधू दुर्मिळ असतात. लालसा, अहंकार आणि अपव्यय यांपासून जो स्वतःला दोषमुक्त करतो त्यालाच खरा साधू म्हणता येईल असा साधू स्वतःच्या मोक्षासाठी कार्य करतो, सर्व मिथ्या मार्ग सोडून देतो आणि केवळ ब्रह्माची उपासना करतो. त्याच्या संपर्कात येणाऱ्यांवर तो मेघातून वर्षा व्हावी त्याप्रमाणे ज्ञानाचा वर्षाव करतो आणि त्यांना शीतल सुख प्रदान करतो.

हुरसूर गावाच्या सुखरामदास लुहार (१७०१–१७६५) याने १५ काव्ये लिहिली– भक्त वसावली, चिंतामणि, चाणक बोध, भरमतोड, विचार बोध, ज्ञान दीपक, ज्ञान सार, आत्म बोध, अणभै बोध, विचार नीसाणी, ध्यान मूल, इत्यादी. याशिवाय दोहा, रेखता आणि चांद्रायणमध्ये स्फुट पदेही लिहिली. निर्गुण भक्ती-संबधित विषयांवरील त्याची काव्ये प्रगल्भ आणि हृदयाचा ठाव घेणारी आहेत.

दरियावजीनंतर रेणच्या गादीचे आचार्यपद नागोरच्या हरखाराम (१७४६–१८०४) याच्याकडे गेले. तो त्याच्या रहणी म्हणजे सदाचारासाठी प्रसिद्ध आहे कित्येक स्फुट पदाखेरीज त्याने सतरा काव्ये रचली– गुरु महिमा, गर्भ चितावणी, भक्तीमाल, शब्दभेद नीसाणी, नाम नीसाणी, करूणा सागर, भ्रम विध्वस, भ्रम तोड, अजामिल की परची, नारायण लीला, ज्ञान समुद्र इ परब्रह्माच्या सगुण व निर्गुण दोन्ही बाजूंचे त्याने वर्णन केले असले तरी सगुण भक्तीकडे त्याचा अधिक कल असल्यासारखे वाटते. ईश्वराच्या स्तुत्य गुणाचे व भक्तावरील त्याच्या प्रेमाचे त्याने केलेले वर्णन हृदयस्पर्शी व मनोवेधक आहे.

सावत रामजी (१७३३–१८०६) हा नानक रामजीचा शिष्य होता. सुमारे ५००० श्लोकांइतक्या असलेल्या त्याच्या वाणीसाठी तो प्रसिद्ध आहे. त्यात लीला ग्रथ (३), प्रसग (७), हरजस (४२), साखी (दोहा, १०१०), आणि असंख्य स्फुट पदे आहेत. मानवाच्या परिस्थितीतील सुधारणा, लौकिक मार्गाचे ऊर्ध्वपातन, राम स्मरणाचे प्रतिपादन आणि साधेपणा याविषयीची त्याची कळकळ त्याच्या काव्यातून दिसून येते. एक साखी पहा :

' अरे भक्त सावता, सावध हो. सर्वशक्तिमानावर प्रेम कर. मानव जन्मातच प्रभुची आराधना करता येते. हा जन्म नेहमी मिळत नसतो. '

डीडवाणाची आभा बाई (अंभा बाई) (१७७१–१८५३) हिने दरियावजीचे शिष्य टेमदासजीकडून १७९७ मध्ये दीक्षा घेतली. तिच्या काव्यांमध्ये, गुरु महिमा, शिष्य सप्रदाय, कक्का बत्तीसी, स्फुट कवने आणि पदांचा समावेश आहे. काव्यांमध्ये गुरु, राम व संतांचा महिमा व शिकवण सोप्या पद्धतीने सांगितलेली आहे. एका चांद्रायणात म्हटले आहे :

' म्हातारपण डोक्यावर आले आहे, दृष्टी अधू झाली आहे, तरी देहाची बंधने तोडावेसे कोणाला वाटत नाही. देहच्यासाचा त्याग करा आणि परम विषयीचे ज्ञान प्राप्त करण्याचा प्रयत्न करा, असे संतांनी सांगितले आहे. भक्त अंभा मानव प्राण्यांना विनती करते की ईशस्मरण करा आणि सर्व वाईट चित्तवृत्ती सोडून द्या. '

या संप्रदायाचे अन्य उल्लेखनीय कवी आहेत– चतुरदास, टेमदास, हरिदास, बुधा राम, मदा राम, खेता राम; शिवकरण आणि दयाराम.

## (१३) हरिरामदासजी : राम स्नेही संप्रदाय, सींथल

जैभलदास जातीने सुतार व गृहस्थाश्रमी होता. सांवतसर (सूडासर जवळचे, बीकानेर) हे त्याचे गाव. कोडमदेसरच्या वैष्णव महंत चरणदासजीकडून १६८३ ते १६८८ च्या दरम्यान त्याने दीक्षा घेतली. दुलचासर येथे त्याचे वास्तव्य होते तेथून नंतर तो रोडा (नोखाजवळ, बीकानेर) येथे गेला आणि तेथेच १७५३ मध्ये मरण पावला. दुलचासर व रोडा दोन्ही ठिकाणी त्याची गादी आहे. आम्ही मागे सांगितले आहेच की खुद्द चरणदासजी हा रामानंदजीचा शिष्य अनंतानंदच्या परंपरेतील होता.

जैमलदासजीची ४७ पदे फक्त उपलब्ध आहेत त्यात त्याचे योग साधनेचे अनुभव, लौकिक वस्तूंचा पोकळपणा, भक्ती इ. दिलेले आहे. त्यातल्या त्यात योग साधनेची माहिती विशेष स्पष्ट आहे.

सींथल शाखेचा संस्थापक हरिरामदासजी १७४३ मध्ये जैमलदासजीचा शिष्य झाला. हादेखील गृहस्थाश्रमी होता आणि १७७८ मध्ये मरण पावला. त्याच्या वाणीमध्ये साखी (दोहा, २२८३), दोहा चौपाई (३५४), रेखता (३२), पदे (१७९), कवित्त, कुंडलिया, इत्यादी आणि एक घघर नीसाणी यांचा समावेश आहे. नीसाणी प्रसिद्ध असून त्यात हठयोग, समाधी, प्राणायाम, इत्यादी सांगितलेले आहे. तो मोठा भक्त व साधक होता निर्गुण रामाची उपासना व त्याचे नामस्मरण हा त्याच्या काव्याचा मुख्य विषय आहे. योगाचा समावेश असलेल्या निर्गुण भक्तीसारख्या विषयावर त्याने बहुधा लिहिलेले असले तरी सगुण उपासनेकडे असलेला त्याचा ओढादेखील दिसून येतो. त्याच्या वाणीमध्ये सुकरता व तर्कशुद्धता असल्याने तिला न्यायनिवाड्याचे स्वरूप आलेले आहे. अन्य संप्रदायाची, पथांची व धार्मिक परंपरांची त्याच्यातील सदिग्धतेसाठी त्याने निर्भर्त्सना केलेली आहे. सगुणाच्या माध्यमानेच निर्गुणाला जाणणे शक्य असल्याचे त्याने प्रतिपादन केले आहे. मुक्तिपेक्षा भक्तीची त्याला तळमळ आहे. एकूण पाहता त्याने आध्यात्मिक जीवनाची बाजू कळकळीने मांडली आहे. त्याच्या साधनेचे व

अनुभवाचे विपुल पुरावे त्याच्या काव्यात आढळतात. भाषा सोपी राजस्थानी असून परिणामकारक आहे. शब्दयोजना तीक्ष्ण व असंदिग्ध आहे. तीन साख्या पुढे दिल्या आहेत

' ज्याने सर्व बंधने तोडून टाकली आहेत आणि ज्याचे मन जगापासून विरक्त झालेले आहे तोच खरा वैरागी. हरिरामदास म्हणतो सर्वांप्रती नम्र व सेवाभावी असतो तोच उत्तम गृहस्थाश्रमी. '

' हरिया सत्याचा पुजारी आहे, निव्वळ परपरांचा नाही. मनाने परंपरांचे दास्यत्व करणारे सत्यापर्यंत पोहोचू शकत नाही. '

' ईश्वराचे ज्ञान झाल्याचा आव आणणारे अहमन्य लोक जगात खूप आहेत हरिरामा म्हणे, राम जाणणारे आणि आत्म्याला अनंत परमेश्वराकडे वळवणारे सत मात्र दुर्मिळ आहेत. '

हरिरामदासजीचा त्याच्या अनुयायाना अखेरचा संदेश होता : ' अरे मर्त्य प्राण्यांनो ऐका ! एका अनिवार्य शब्दात मी सत्याचा सारांश सागतो. जगात रामाचे नाव फक्त सत्य शब्द आहे, बाकी सर्व राख व धूळ आहे.'

हरिदेवदासजी (१७७८–१८०७) हा हरिरामदासाचा नातू होता आणि त्याच्यानंतर आचार्य झाला त्याची काव्ये आहेत– सुमिरण बोध, ग्रंथ करुणा निधान, गुरु महिमा, नाम महिमा. ज्ञान विचार, आत्म विचार, ज्ञान स्वरूप, आत्म कृत ब्रह्म प्राप्ति जन विचार, पदे आणि स्फुट कवने, आत्माभिव्यक्ती आणि गुरु व नामस्मरणाचा महिमा त्यात सागितलेला आहे. छप्पय वृत्ताचा त्याने खूप वापर केला आहे.

जैतपुर (बीकानेर) गावाच्या नारायणदासाने १७४९ मध्ये सीथल येथे हरिरामदासजीकडून दीक्षा घेतली. त्याची वाणी त्या मानाने कमी असून त्यात प्राण परचै को अग, चेतावणी, हरजस, दोहे, कवित्त, इत्यादीचा समावेश आहे. विषय आहेत– योग, गुरु, राम स्मरण आणि नीतिबोध सर्वांमधून त्याचा आत्मविश्वास दिसून येतो. त्याचे ४७ मुख्य शिष्य होते. ते देखील त्याच्यासारखेच विरक्त किंवा तपस्वी होते. त्यापैकी बरेच उत्तम कवी होते

चैनरामजीची दोन लघु काव्ये– करुणा बत्तीसी, गुरु महिमा आणि एक डिंगल गीत उपलब्ध आहे करुणा बत्तीसीमध्ये ईश्वराच्या कृपेची अनेक प्रसिद्ध उदाहरणे देऊन कवीने आत्माभिव्यक्ती व करुणा व्यक्त केली आहे

बामटसर (बीकानेर) गावी जन्मलेला मूलदासजी कालू (बीकानेर) येथे राहिला. तेथे त्याने रामद्वारा बाधला. त्याची परपरा अजून चालू आहे त्याची वाणी विपुल आहे–– आठ लघु काव्ये, गुरु महिमा, अगम बोध, ब्रह्म प्रकाश,

चेतावणी, भक्तमाल इ. सुमारे १४०० साख्या (दोहे), ४७ हरजस आणि काही कवित्त, चांद्रायण इ. काव्ये निर्गुण भक्ती व तत्संबंधित विषयावर आहेत. अभिव्यक्ती लालित्यपूर्ण व साधी असून भाषा सोपी राजस्थानी आहे.

चैनरामजी व मूलदासजी दोहोंचा १८ व्या शतकाच्या अखेरीस व १९ व्या शतकाच्या सुरवातीस उत्कर्ष झाला.

मूजासर (नोखा) गावाचा पीरारामजी जातीने दधवाडिया शाखेचा चारण होता. चौथे आचार्य रघुनाथदासजींचा तो १८२१ मध्ये शिष्य झाला. त्याची वाणी आहे– साखी (सुमारे ४०० दोहे), दोन लहान काव्ये, प्रकाश भास्कर व गुरु महिमा आणि स्फुट कवने, नाम साधनेवरील भर आणि नीतिबोध हे त्याच्या काव्याचे मुख्य लक्षण होय.

*आदूरामजी, मोतीरामजी व रघुनाथजी हे या संप्रदायातील आणखी काही* उल्लेखनीय कवी होत.

## (१४) रामदासजी : राम स्नेही संप्रदाय, खेडापा

बीकूंकोर गावी जन्मलेला रामदासजी (१७२६–१७९८) गृहस्थाश्रमी होता. त्याने १७५२ मध्ये सींथलच्या हरिरामदासजीकडून दीक्षा घेतली. १७६३ मध्ये त्याने खेडापा शाखा स्थापन केली. ही सीथलचीच शाखा समजली जात असली तरी तिची वेगळी परंपरा आहे. लालित्यपूर्ण व सोप्या राजस्थानी भाषेत लिहिलेली त्याची वाणी संख्येने विपुल व काव्यगुणाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. ती अशी– ९० प्रसंगावरील (विषयावरील) १७०० च्या वर साख्या (दोहे), ७२ हरजस आणि २४ ग्रंथ (काव्ये), उदा. गुरु महिमा, भक्तमाल, चेतावणी, बालबोध, ज्ञान विवेक, अमर बोध, नाममाला, आत्मसार, ब्रह्म जिज्ञासा, आत्मवेलि आणि निरलंब. विषय बहुधा निर्गुण भक्ती व तिची विविध अंगे आहे. शाहपुराच्या रामचरणजीप्रमाणेच तो देखील मध्यम मार्ग अनुसरण्याची शिकवण देतो. भक्ती आणि सबद योगला त्याने साधनेचे मार्ग म्हटले आहे. आध्यात्मिक जीवनावर त्याचा भर आहे. वर्णने, विशेषत: विरहविषयक, ती सघन भावनायुक्त व संवेदक आहेत. एक साखी आहे—

'जीवन क्षणभंगुर आहे आणि सत्कर्म केल्यानेच ते उपयुक्त होऊ शकेल. म्हणून शरीरावयवांनी ईश्वराच्या प्राण्याची सेवा करा आणि वाणीने ईश्वराचे नाव घ्या.'

रामदासजीचा मुलगा दयालूदास (१७५९–१८२५) हा त्याच्या वडलांच्या मृत्यूनतर १७९८ मध्ये आचार्य झाला. तो देखील प्रापंचिक गृहस्थ होता. त्याची

वाणी आहे– १९ काव्ये, भक्तमाल, मन प्रतिबोध, चेतन बोध, प्रगट बोध, निर्णय बोध, आत्मज्ञान, करूणा सागर, चितावणी, शब्दप्रकाश, गुरु प्रकरण इ. आणि विविध विषयावरील, विशेषत. निर्गुण भक्तीवरील अनेक पदे. निर्गुण निराकार रामाच्या भक्तीबरोबरच सगुण साकार रामावरही त्याची श्रद्धा आहे आणि ईश्वराच्या विविध अवताराचे त्याने वर्णन केले आहे. करुणा सागर या त्याच्या काव्यात सगुण भक्तीचे प्रतिपादन केलेले असून विनम्रता व अंतःकरणपूर्वक समर्पण करण्याच्या भावनेची प्रशंसा केलेली आहे. भक्तमाल व गुरु प्रकरण (रामदासजीची जीवनकथा) या त्याच्या वाङ्मयकृती साहित्यिक इतिहासाची व त्या काळच्या सामाजिक-धार्मिक प्रवृत्तीची माहिती मिळवण्याची महत्त्वपूर्ण साधने आहेत.

बीठणोक (बीकानेर) च्या परशुराम (१७६७–१८३९) ने १७८८ मध्ये खेडापा येथे रामदासजीकडून दीक्षा घेतली. त्याने खूप प्रवास केला आणि अखेर जोधपुरला (सूरसागरजवळ) तो स्थायिक झाला. या संप्रदायातील विरक्त किंवा तपस्वी शाखेचा तो संस्थापक असल्याचे समजतात. ज्ञान व भक्ती साधनेवरील पुढील काव्ये त्याने रचली असे म्हणतात : सिख प्रश्न सोरण, गुरु शिष्य सवाद, गूढ कूप को प्रसंग, गुरु महिमा, आत्मबोध अर्थात सिद्धांत आणि सजीवन बोध.

पीथोदास (१७४२–१७९४) हा रामदासजीचा शिष्य होता आणि रतलाम येथे मरण पावला. त्याच्या वाणीमध्ये पदे, स्फुट कवने आणि बेहद बोध, गुरु महिमा व जुगल ग्रंथ या तीन काव्यांचा समावेश आहे. भावनांची तीव्रता व लालित्यासाठी त्याची पदे प्रसिद्ध आहेत.

पूरणदास (१७७१–१८३५) चा जन्म (माळवामधील) मालकी गावी झाला होता. त्याच्या आईवडलानी त्याला पीथोदासजीला देऊन टाकले होते. पीथोदासजीने त्याला खेडापाला पाठवले. तेथे १७८१ मध्ये दयालुदासजीने त्याला दीक्षा दिली. १८२८ मध्ये पूरणदास आचार्य झाला. तो देखील संसारी गृहस्थ होता. गुरु महिमा, भक्तमाल, जन्मलीला, सुमिरण सार, करुणा छत्तीसी, शिक्षा बत्तीसी ही त्याची लघु काव्ये आहेत. त्याखेरीज त्याने कित्येक पदे व कवनेही लिहिली आहेत. अनेक संत कवीची माहिती त्याच्या काव्यातून दिलेली असून ती अत्यंत महत्त्वाची आहेत.

मुरारी राम हा भाटी राजपूत रामदासजीचा शिष्य होता. खेडापा येथे १८३३ मध्ये तो मरण पावला. त्याची काव्यरचना आहे— अज्ञात बोध, महिमासार नीसाणी, आत्मसार, सुमिरणसार, गर्भ चेतावणी, आत्मपरची, गुरु महिमा, कित्येक हरजस व साख्या. त्याची भाषा रोखठोक व साधी आहे.

अर्जुनदासजीची जन्मलीला व पूर्वजन्म आणि बालकदासजीचे जन प्रभाव परची ही काव्ये सामाजिक–ऐतिहासिक दृष्टीने लक्षणीय आहेत.

## (१५) लालगिरी : अलखिया संप्रदाय

लालगिरीचा जन्म सुलखणिया (चुरु, राजस्थान) गावी एका चांभार कुटुं-बात १९ व्या शतकाच्या प्रारंभीच्या काळात झाला लहानपणी त्याला एक साधू घेऊन गेला. तो दादू संप्रदायाच्या नागा शाखेचा होता असे म्हणतात जवळजवळ पधरा वर्षांनी १८२९ मध्ये तो बीकानेरला परत आला आणि त्याने लोकाना उप-देश द्यायला सुरवात केली. अनेक लोकानी त्याचे शिष्यत्व पत्करले. बीकानेरमधील अलख सागर नावाची प्रचड विहीर त्याच्या प्रयत्नामुळेच बाघली गेली. एकदा महाराजा रतनसिंह लक्ष्मीनारायणजीच्या मंदिराला जात असताना लालगिरीने उपदेश केला. मूर्तिपूजा निरर्थक असून फक्त अलखचे स्मरण करण्यास सागितले. यावर रागावून महाराजाने त्याला हद्दपार केले. लालगिरी जयपुरला आला व मृत्यू-पर्यंत गलता येथे राहिला

त्याची उपलब्ध वाणी सोप्या राजस्थानीत असून तिच्यात फक्त २९ सबद आहेत. ईश्वराचे स्वरूप, साधनेने ईश्वराला स्वतःच्या आत्म्यातच जाणण्याचे मार्ग, जगाची मायात्मक प्रवृत्ती व नाम स्मरण यावर तो रचलेली आहे मूर्तिपूजक, भोंदू, ठक व भपक लोकाची त्याने खरडपट्टी काढली आहे. त्याच्या दृष्टीने निराकार, निर्लेप व निरजन अलख हेच चरम सत्य आहे. अलखची उपासनाच केवळ योग्य आहे म्हणून या सप्रदायाला अलखिया हे नाव पडले. नाथ पद्धती व पारिभाषिक शब्दाचा त्याने वापर केला असून हठयोगाच्या साधनेकडे त्याचा अधिक कल आहे. मर्यादशील वदनाची याची मान्य पद्धत आहे– 'अलख मौला' बीकानेर व त्याच्या आसपासच्या प्रदेशात हा सप्रदाय लोकप्रिय होता. त्याचे अनुयायी बहुधा समाजा-तील मागासलेल्या वर्गातील लोक आहेत. त्याच्या काव्याचे एक उदाहरण पहा :

'यती (जैन साधू), मुल्ला आणि ब्राह्मण हे सर्व अध्यात्माचे व्यापारी आहेत त्यांचे अनुयायी त्याचे पोट भरतात आणि बदल्यात त्या अनुयायी वर्गाशी ते बाधले जातात. पांडिया फक्त वेद मंत्र म्हणतात, मुल्ला देवाला हाक मारल्यासारखे दाख-वतात आणि ढूंढिया आपल्या संप्रदायाचे स्तुतिगान करीत राहतात. लाल गुसाई म्हणतो, जगातले लोक मोहमायेला सहज फसण्यासारखे असतात आणि म्हणूनच वरील तिघानी निष्ठेचा बाजार माडला आहे.'

ज्ञानगिरीजी हा याच सप्रदायातील साधक कवी होता. त्याचे अलख स्तुति प्रकाश (अलख महिमा स्तुती) काव्य उपलब्ध आहे.

## (१६) आईजी (जीजी देवी) : आई पंथ

अन्य लहान किंवा फारसा प्रसिद्ध नसलेल्या पंथांची व सप्रदायांची धार्मिक काव्ये देखील राजस्थानातील लोकांमध्ये लोकप्रिय आहेत. असाच एक पंथ आहे

आई पंथ. सीरावी जातीचे लोक बहुधा या पंथाचे अनुयायी असून पाली व जोधपुर प्रदेशात व मध्य प्रदेशाच्या काही भागात त्यांची दाट लोकवस्ती आहे. आईजीचे मुख्य देऊळ बिलाडा (जोधपुर) येथे आहे. हा शाक्त पंथ आहे जीजी देवी (आईजी) ही डाबी गोत्राचा राजपूत वीका याची कन्या होती असे म्हणतात. १५ व्या शतकात तिचा उत्कर्ष झाला आणि १५०४ मध्ये तिने जगाचा निरोप घेतला. तिला शक्ती किंवा दुर्गेचा अवतार समजतात. सर्व प्रकारच्या मादक पदार्थांपासून व मांस भक्षणापासून आईपंथी लोक स्वतःला दूर ठेवतात.

जीजी देवीने स्वतः १५०० मध्ये आपला शिष्य गोयद याला पंथाच्या सर्व सिद्धान्तांची दीक्षा देऊन आपली गादी त्याला दिली. आई पंथाच्या स्थापनेची ही तारीख समजायला हरकत नाही.

जोधपूरच्या भवानीदास व्यासने १७३६ मध्ये आई आणद विलास रचले. त्यात त्याने सोप्या राजस्थानी भाषेत लालित्यपूर्ण पद्धतीने आईजीचे चरित्र व पंथाची ठळक वैशिष्ट्ये वर्णिली आहेत त्यात ६०३ पदे असून दोहा. सोरठा, छंद, कवित्त, चांद्रायण, भुजगी, चौपाई, नीसाणी, झमाल, हरण कला आणि गद्य वार्तांचा देखील त्यात समावेश आहे पंथामध्ये तो पवित्र धर्मग्रंथ मानला जातो.

बिलाडाच्या ताराचंद व्यासने आई उग्र प्रकाश लिहिले. त्यात देखील पंथाचा संक्षिप्त इतिहास देऊन आईजीचे चरित्र सरळ, साध्या पद्धतीने, सोप्या राजस्थानी भाषेत सांगितलेले आहे. दोहा, सोरठा, छप्पय, छद, पद्धरि, त्रिभंगी इत्यादी वृत्तांचा वापर केलेला आहे

आईजी व आई पंथाविषयी माहिती मिळवण्याच्या दृष्टीने दोन्ही ग्रंथ महत्त्वपूर्ण आहेत.

आई माता री वेल आणि लूम्बा बाबा व इतरांनी लिहिलेली स्फुट कवने देखील पंथामध्ये लोकप्रिय आहेत.

शक्ती किंवा देवी आणि करणीजी देवी तसेच गोगोजी, पाबूजी, रामदेवजी व तेजोजी यासारख्या लोकदेवताशी संबंधित काव्याचा आम्ही अन्यत्र सदर्भासहित विचार केला आहे.

## धर्म व संप्रदायाच्या कोणत्याही पारंपरिक बंधनापासून मुक्त असलेले कवी

या वर्गातील असख्य कवींपैकी काही मोजक्या मुख्य कवींचा फक्त आपण विचार करू या. प्रारंभीच्या अन्य संत कवींप्रमाणे पीपा कवीच्या देखोल जीवन, काल व वाणीविषयी अद्याप पुरेशी माहिती उपलब्ध नाही.

खिलचीपुर की ख्यातवरून असे दिसते की गागरोनगड (कोटा) च्या अचलदास खीचीचा तो पूर्वज होता. १३६० मध्ये त्याला राज्य मिळाले आणि १३८५

पर्यंत त्याने शासन केले. वंश परंपरा अशी आहे : कडवा राव–पीपा–कल्याण राव (पीपाने दत्तक घेतलेला)–भोजराज–अचलदास

दुसऱ्या एका मतानुसार पीपा हा अचलदासचा भाऊ होता. त्याच्या पदांमध्ये आलेल्या उल्लेखांवरून हे मत अधिक ग्राह्य वाटते माडूच्या सुलतान होशंग घोरीविरुद्ध झालेल्या लढाईत गागरोनगड येथे १४२३ मध्ये अचलदास मारला गेला अचलदास खीची री वचनिका या विश्वसनीय काव्यात या लढाईचे वर्णन दिलेले आहे. त्यात पीपाचा उल्लेख नाही. या लढाईपूर्वीच पीपा विरक्त झाला असावा असे वाटते. या वेळेपर्यंत त्याचे वय चाळीसच्या जवळपास असावे. म्हणजेच १३८३ च्या सुमारास त्याचा जन्म झाला असावा. त्याच्या दोन पदावरून वाटते की नामदेव, कबीर आणि रैदास त्यावेळी हयात नव्हते कबीर १४४८ मध्ये किंवा तत्पूर्वी मरण पावला. रैदासचे देखील तेच आहे अशा प्रकारे पीपा त्यांच्यानंतर म्हणजे वयाच्या सत्तराव्या वर्षाच्या आसपास सुमारे १४५३ च्या जवळपास मरण पावला असावा असे म्हणता येईल. यावरून १३८३ ते १४५३ हा पीपाचा जीवन-काल असावा असा रास्त निष्कर्ष काढता येतो. रामानंदच्या बारा शिष्यांपैकी तो एक होता असे म्हणतात. पण त्याच्या पदामध्ये याचा उल्लेख नाही.

वेगवेगळ्या संप्रदायाच्या विभिन्न हस्तलिखितांमध्ये त्याची स्फुट पदे उप-लब्ध आहेत. सर्वात प्राचीन उपलब्ध हस्तलिखित १६२५[१]चे असून त्यात त्याची १७ पदे दिलेली आहेत या हस्तलिखितात आणि अन्य हस्तलिखितात उपलब्ध असलेल्या पदाच्या अभ्यासावरून असे वाटते की पीपाची २५ पदे असावीत (श्री गुरु ग्रंथ साहिबजीमध्ये दिलेले एक पद धरून). ती वेगवेगळ्या चालींवर गाण्या-सारखी आहेत. याखेरीज त्याच्या नावावर १३ साख्या देखील दिलेल्या आहेत.

निर्गुण राम भक्ती, ईश्वराचा महिमा त्याला स्वतःच्या अंतरात्म्यात पाहण्या-साठी सखोल ईश्वरनिष्ठा—त्यात योग साधनेच्या छटा आणि तीर्थ यात्रादी बाह्य उपचारांची व्यर्थता याचे गान पदामध्ये केलेले आहे नामदेव, कबीर आणि रैदासची त्याच्या भक्तीसाठी त्याने दोन पदामध्ये खूप प्रशंसा केलेली आहे. भाषा ब्रज मिश्रीत राजस्थानी असून काही पदामध्ये खडी बोलीची किंचित छटा आलेली आहे एका पदात म्हटले आहे :

'अरे प्राण्या, डोळे उघड आणि पहा ! तुमच्या केसांचा रंग बदलला आहे काळ्याचे ते पांढरे झाले आहेत. निदान आता तरी गोविंदाची प्रार्थना कर. आत्मा-रूपी तपस्वी शरीररूपी पर्णकुटीत फक्त दहा दिवस राहण्यासाठी आला आहे हा तपस्वी त्याच्या भल्या बुऱ्या कृत्याचा प्रत्यालेख काढून घेईल आणि कोणालाही

---

१ श्री राधा कृष्ण नेवाटिया, ५२ झकरिया स्ट्रीट, कलकत्ता याच्यापाशी उपलब्ध- फोटोस्टॅट प्रत लेखकापाशीही उपलब्ध.

नकळत निमूटपणे पर्णकुटी सोडून जाईल. मन हे उदरासारखे असून एकीकडे ते मायारूपी मांजरीने व दुसरीकडे लालसारूपी विषारी सापाने ग्रास्तावलेले आहे. पीपा म्हणतो, तीन शत्रूंपासून सुरक्षित राहवयाचे असल्यास रामनामाचा आसरा घे. (काम, क्रोध व लोभ यांचा सदर्भ असावा असे वाटते).

काझी महमूद (१५ वे शतक) हा प्रारंभीच्या सतकवींपैकी एक होय. त्याची पदे अजून राजस्थानात लोकप्रिय आहेत. त्याच्या पदाची संख्या अंदाजे ४५ असावी. वेगवेगळ्या हस्तलिखितात ती विखुरलेली आहेत १६२५ च्या सर्वांत प्राचीन उपलब्ध हस्तलिखितात १६ पदे आढळतात सहज सुंदर या जैन कवीने १५२५ मध्ये एक 'ढाल' (काव्य), (त्याच्या रतनसार चौपाईमध्ये सापडलेले) रचले. ते काझी महमूदच्या एका पदाच्या चालीवर रचलेले असून त्याचे ध्रुपद आहे ' भूला भमरला काई भमैए १६ व्या शतकाच्या सुरवातीला त्याची पदे विलक्षण लोकप्रिय होती यात काहीच शंका नाही. वैराग्य, जीवन व लौकिक वस्तूंची अशाश्वतता, ईश्वराचे प्रेम व विरह आणि गूढ अनुभव यांवर ती पदे रचलेली आहेत. नैसर्गिक, संवेदनशील व लालित्यपूर्ण अभिव्यक्तीतून दर्शवलेली भावनाची प्रगाढता व सार्वत्रिक सत्य हे त्याच्या काव्याचे लक्षणीय वैशिष्टच आहे भाषा खडी बोलीची किंचित छटा असलेली सोपी राजस्थानी आहे भूला भमरला कई भमै ए मध्ये काझी महमूद म्हणतो :

'अरे माझ्या चचल भ्रमर मना, तू कशासाठी धावतो आहेस ? रात्रंदिवस तू चक्राकार फिरत असतोस. इहलोकीच्या सुखासाठी हपापलेला हा आत्मा पकडला जातो आणि मृत्युलोकात धाडला जातो. आई, वडील, मुले आणि सपत्ती असली तरी त्याचे काय ? या आत्म्याला एकट्यानेच प्रवास करावा लागतो त्याची बरी आणि वाईट कृत्येच फक्त त्याची सोबत करतात. तू अपार सपत्ती गोळा केलीस आणि ती खर्च केली नाहीस की तिचा उपभोग घेतला नाहीस. तू हे विसरलास की अगदी सर्वांत श्रीमत माणसाला देखील चितेवर विवस्त्र होऊनच पडावे लागते. महमूद साह त्याच्या सर्व अनुयायांना विनंती करीत आहे की जे काही खरेखुरे आत्म्याचे आहे तेच सांभाळून ठेवा. दैव हे विधात्याच्या हाती आहे

मीराबाई (१४९८–१५४७) चे नाव ठाऊक नसलेली व्यक्ती सापडणे विरळा ! असे असले तरी तिच्या जीवन व कार्याविषयी अभ्यासकाना कोडेच आहे तिचे नाव, तिचे गुरु आणि तिची साधना याविषयी अनेक दंतकथा व आख्यायिका पसरलेल्या आहेत तिच्या पदाचे संग्रह अनिर्णित आहेत आणि विश्वसनीय ऐतिहासिक साहित्य व हस्तलिखिते उपलब्ध नसल्याने अभ्यासकाचे कार्य अधिकच अवघड होऊन बसले आहे. फार तपशीलवार चर्चा न करता आम्ही आमचे निष्कर्ष थोडक्यात खाली देत आहीत.

मीराबाई ही मेवाडच्या राठोड राव दूदाचा मुलगा राव रतनसी याचा कन्या. बाजोली (देगानाजवळच्या) गावी १४९८ (वि. स. १५५५) मध्ये तिचा जन्म झाला. बालपणीच तिची आई निवर्तल्याने राव दूदानेच तिचे पालणपोषण केले. चित्तोडच्या राणा सागाचा मुलगा कुवर भोजराजशी १५१६ मध्ये तिचा विवाह झाला. भोजराज १५२२ च्या सुमारास मरण पावला. तिची स्वतत्र वृत्ती आणि साधुसताच्या संगतीत राहण्याची तिची आवड यामुळे सासरच्या लोकानी तिचा छळ केला. १५३१–३२ च्या सुमारास तिने चित्तोड सोडले आणि काही कालासाठी मेडत्याला आली. १५३४ च्या सुमारास ती तीर्थयात्रेला गेली आणि अखेरीस द्वारकेत राहिली १५४७ मध्ये ती देवाघरी गेली.

मीराबाईच्या साहित्यात गूढता व्यापलेली आढळते. पुढील रचनाचे कर्तृत्व मीराबाईकडे देतात : गीत गोविंद की टीका, नरसीजी रो माहेरो, सत्यभामाजी नू रूसनू, राग सोरठ, राग गोविंद आणि पदे (पदावली). असे असले तरी गीत गोविंद की टीका, नरसीजी रो माहेरो आणि सत्यभामाजी नू रूसनूं हे काही तिने लिहिलेले नाही राग सोरठ आणि राग गोविंद हे तिच्या पदांचे सग्रह आहेत, त्या स्वतत्र साहित्यकृती नव्हेत पदावलीत त्याचा समावेश झालेला आहे यावरून निष्कर्ष हा निघतो की मीराबाईने पदेच फक्त रचलेली आहेत.

सामान्य माणसाच्या जीवनावर दूरगामी परिणाम करणाऱ्या तिच्या पदांमुळे मीराबाई लोकप्रिय आहे. भावनांची अभिव्यक्ती इतकी सहज नैसर्गिक व उत्स्फूर्त आहे की गुजराती, ब्रज आणि कित्येक प्रादेशिक बोलींमध्ये तिची पदे उचलली गेली आणि परिणामी त्याचे मूळ रूप निश्चित करणे कठीण होऊन गेले आहे.

हिंदी, गुजराती आणि मराठीत अनुवादासह पन्नासाच्यावर तिच्या पदाचे संग्रह प्रसिद्ध झाले आहेत बंगाली व इंग्रजीतही तिच्या पदाचे अनुवाद झाले आहेत कित्येक नियतकालिकातूनही तिची पदे प्रसिद्ध झाली आहेत. यापैकी काही पदावलीचे सपादक हक्काने प्रतिपादन करतात की प्राचीन हस्तलिखितांतून (बहुधा १८ व्या व १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील हस्तलिखितातून) त्यांनी ते साहित्य जमवले आहे. कित्येक सताच्या 'वाणी' मध्येही तिच्या पदाचा समावेश आहे. या तथाकथित प्राचीन हस्तलिखितांनी त्याचे साहित्य बहुधा मौखिक परपरेपासून घेतलेले आहे कित्येक पदे विभिन्न समिश्रित स्वरूपात आढळतात. त्यापैकी काही तर दुसऱ्याच कोणाच्या नावावर लोकप्रिय झालेली आहेत. तिच्या पदांची टीकात्मक दृष्टिकोनातून संपादित केलेली प्रत अद्याप प्रकाशित झालेली नाही. सध्या तिच्या नावावर प्रकाशित व अप्रकाशित २००० पदे उपलब्ध आहेत पण ती सर्वच्या सर्व तिनेच रचल्याचे निश्चितपणे सागता येत नाही काळजीपूर्वक छाननी केल्यास तिची स्वतःची अंदाजे २५० पदे फक्त असल्याचे दिसून येते.

तिच्या पदांमधून प्रगाढ ईश्वरनिष्ठा, कांताभावाची सगुण व निर्गुण भक्ती आणि योग यांची अभिव्यक्ती आढळते तसेच तिची साधना व जीवनाचे प्रतिबिंबही त्यात उमटलेले दिसून येते आत्मविश्वास, ईश्वरावरील अपार श्रद्धा, संयोग वा वियोगावस्थेचे प्रेम, गाढ व उदात्त अनुराग, आनंद, दु:ख व तद्री याची अभिव्यक्ती हे सर्व साध्या, सहज नैसर्गिक, अकृत्रिम व अनलंकृत पद्धतीने सागणे— ही तिच्या पदांची वैशिष्टये होत. उत्स्फूर्त लालित्याने अगदी साध्या भाषेत तिने अत:करणातील खोल भावना व्यक्त केल्या आहेत याच कारणास्तव ती विद्वानामध्ये व लोकामध्येही तितकीच लोकप्रिय आहे असे असले तरी खरे म्हणजे ती जनतेचीच कवयित्री आहे. परपरेनुसार तिला कृष्णाची भक्त मानतात. तिचे एक पद खाली दिले आहे.

'हे माते ! मी गोविंद विकत घेतला आहे कुणी म्हणतात मी गुपचूप घेतला आहे तर कुणी म्हणतात उघडपणे घेतला आहे. मी मात्र म्हणते की मी नगाऱ्यावर थाप मारून जाहीरपणे घेतला आहे कुणी म्हणतात सौदा महागात पडला तर कुणी म्हणतात स्वस्तात पडला. मी तो पूर्ण मोजून घेतला आहे. कुणी म्हणतात की तो काळा आहे, तर कुणी म्हणतात गोरा आहे. मी मात्र माझ्या जवळचे सर्व काही देऊन त्या बहुमोलास खरेदी केले आहे मी डोळे उघडे ठेवून त्याचा स्वीकार केल्याचे सर्वांना ठाऊक आहे. हे प्रभो ! तू मीरेला दर्शन दिले पाहिजेस. कारण पूर्वजन्मी दिलेल्या एका वचनाने तू बद्ध आहेस '

सावला (डूंगरपुर) गावाच्या औदिच्य ब्राह्मण सत मावजी (१७१४–१७४४) याने तपश्चर्या करण्यासाठी वयाच्या बाराव्या वर्षी घर सोडले. ईश्वरावर श्रद्धा ठेवण्याची व मानवतेची सेवा करण्याची शिकवण त्याने दिली. चोपडा नावाची त्याची वाणी ज्ञान शिकवते, नीतीचा उपदेश देते आणि बरेच भविष्यकथन करते

दीन दरवेश (१७५३–१८३३ अंदाजे) याचा जन्म गुडली (उदयपूर विभाग) येथे झाला होता गिरनारच्या कोणा बाल भारती (बाल गुरु) कडून त्याने दीक्षा घेतली होती. उदयपुरजवळील कैलाशपुरी येथे तो रहात असे. महाराणा भीमसिंहला (१७७७–१८२८) त्याच्याबद्दल खूप आदर होता. महाराणाच्या मृत्यूनतर तो कोटयाला गेला व तेथेच चबळमध्ये स्नान करीत असताना बुडून मरण पावला असे म्हणतात त्याची काव्ये आहेत— दीन प्रकाश, ग्रथ अदलानंद, परमार्थ प्रसंग, चितावण सार, ईसर अस्तुत, राज चेतावणी, भरम तोड, कक्का बत्तीसी, गगड नीसाणी, पदे व स्फुट कवने. जकडी, बारहमासा, गरबी आणि फाग सारख्या लोकप्रिय काव्यप्रकारांचा त्याने वापर केला आहे.

काव्ये बहुविध विषयावर आहेत. त्यात ब्रह्मज्ञान व ध्यान, लौकिक उद्योगाची निरर्थकता, जाती जमातीचा खोटेपणा, योग, वैराग्य, ईश्वरावरील श्रद्धा

आणि त्याच्या गूढ अनुभवाची नोंद हे सर्व आलेले आहे. निर्गुण भक्तीकडे त्याचा अधिक ओढा आहे. अवतारावर त्याचा विश्वास आहे इतकेच नव्हे कुणी अवतारा-विरूद्ध बोललेलेसुद्धा त्याला खपत नाही. त्याच्या मतानुसार, भक्ताच्या उद्धारा-साठी ईश्वर अवतार घेतो कृष्णाच्या काही लीलाचे त्याच्या गीतामधून वर्णन केलेले आहे. देवीच्या स्तुतीसाठी गरबी लिहिलेली आहे त्याच्या सर्व छदामध्ये कुडलिया लोकप्रिय आहेत. भाषा खडी बोली मिश्रित राजस्थानी असून ब्रजभाषेची किंचित छटा त्यात आहे. खाली दोन कुडलिया दिल्या आहेत :

'फक्त सिंह काय तो पृथक् गौरवात एकटा राहू शकतो. असा माणूस पाप किंवा पुण्य काहीच संपादन करीत नाही. ज्ञानाच्या वाढलेल्या वनात तो सिंहा-सारखी गर्जना करतो त्याच्या गर्जनेने सर्व बंधने नाहीशी होतात दीन दरवेश म्हणतो, लोकाना त्याच्या अनुयायी वर्गाची घमेंड होऊ नये. सिंह काय तो विधा-त्याशी एकाकी दुवा जुळवतो.'

'अशा प्रकारच्या माणसाचे अंतःकरण शुद्ध पवित्र ज्ञानाने परिपूर्ण असल्याचे जगाला ठाऊक आहे. सर्वशक्तिमान ईश्वर त्याला आपलासा करून टाकतो आणि मोक्षाची भेट त्याला देतो. ती भेट मिळाल्यावर आणखी काही मिळवायचे बाकी रहात नाही. ब्रह्म हेच त्याच्यासाठी जग, संपत्ती व आशा होऊन जाते. दीन दरवेश म्हणतो, अशा माणसाचे ईश्वराच्या कृपेने पशुत्वातून देवत्वामध्ये रूपातर होते आणि जग त्याला जीवनमुक्त म्हणून ओळखू लागते.'

गवरीबाई (१७५८–१८०८) चा जन्म डूगरपूरच्या एका नागर ब्राह्मण कुटुबात झाला होता. ती बाल विधवा होती. धर्मग्रंथांचे तिने चांगले अध्ययन केले होते. ज्ञानलालसा व भक्तीसाठी ती प्रसिद्ध होती तिची ही कीर्ती ऐकून डूगरपूरचा महारावल शिवसिंहाने (१७३०–१७८५) तिच्यासाठी एक देवालय बाधले. आयु-ष्याच्या अखेरच्या दिवसांत ती काशीला गेली आणि तेथेच तिने देह ठेवला. तिला मीराबाईचा अवतार समजतात.

ब्रज आणि गुजरातीचे मिश्रण असलेल्या सोप्या राजस्थानी भाषेत तिने ६०० हून अधिक पदे रचली. ती ईश्वराचा महिमा, भक्ती आणि वैराग्यावर रच-लेली आहेत. कित्येक पदे त्यातील साधेपणा व तल्लीनतेसाठी प्रसिद्ध आहेत.

संत ज्ञानीजी, गद्दा, पूलीबाई आणि नामदेव श्री कृष्णदास हे उल्लेखनीय लेखन करणारे आणखी काही कवी होत.

अशा प्रकारच्या कित्येक कवींचा आम्ही चारण शैलीच्या पौराणिक व धार्मिक काव्य विभागात उल्लेख केलेला आहे जनतेत असख्य भजने लोकप्रिय आहेत. त्या-पैकी बरीच अज्ञात कवींनी रचलेली आहेत. 'लोक साहित्य' विभागात त्यांचा विचार आपल्याला करता येईल.

## जैन काव्य

प्रकरण २ मध्ये आपण जैन काव्याची मुख्य लक्षणे पाहिली आहेतच.

चरित, कथा आणि आख्यान काव्ये चरित्रात्मक असतात आणि हमखास निवेदनात्मक असतात भक्तांना निर्वाण प्राप्ती करून देणे हे त्याचे लक्ष्य असते. कथा नायक बहुधा उच्च वर्गाच्या कुटुंबातील असतो. लग्नापूर्वी किंवा लग्नानतर तो जैन साधू किंवा अन्य उदात्त, थोर व्यक्तीच्या संपर्कात येतो किंवा एखाद्या हृदयद्रावक प्रसगाने द्रवित होऊन आणि लौकिक बंधनांपासून मुक्त होण्याचा विचार करू लागतो. दीक्षा घेण्याची त्याला उत्कट इच्छा होते. आईवडील (आणि लग्न झाले असल्यास पत्नी) त्याला या बेतापासून परावृत्त करावयाचा प्रयत्न करतात, पण तो आपल्या निश्चयापासून ढळत नाही आणि जैन साधूचे जीवन अंगिकारतो. या अवस्थेत त्याला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते. पण अखेरीस तो सर्वांवर विजय मिळवतो आणि केवल ज्ञान प्राप्त करतो. अशा प्रकारे मोक्षाचा अधिकारी होतो. कथा मुख्यतः जैन परंपरेतून घेतलेल्या असतात. काही लोकप्रिय लोककथा असतात. त्या जैन जीवन पद्धतीच्या मुशीत घातल्या जातात. जैन कवींनी निवडलेल्या कथांचा हा सर्वसामान्य तोंडवळा आहे.

जैन काव्य हे बहुधा निव्वळ काव्यरचनेसाठी लिहिलेले नाही. ज्ञानाचे अध्ययन, धर्माचा प्रसार आणि चारित्र्य उभारणी ही त्याची मुख्य उद्दिष्टे आहेत ही सर्व उद्दिष्टे गाठण्यासाठी जैन कवी निवेदनात्मक काव्य लिहितो. असख्य जैन कवींपैकी आपण फक्त काहींची येथे दखल घेऊ या.

ब्रह्म जिनदास (१३८८–१४६८) हा गाढा विद्वान आणि १५ व्या शतकाचा कवी होता. त्याने डझनाच्या वर काव्ये संस्कृतमध्ये लिहिली पन्नासाहून अधिक निवेदनात्मक कृती रचल्या; त्या बहुतेक रास असून हिंदी आणि गुजराती मिश्रित राजस्थानीत लिहिलेल्या आहेत. जैन धर्मात लोकप्रिय असलेल्या आख्यायिकावर त्या मुख्यतः आधारित आहेत. रविसेनाचार्यांच्या पद्म पुराणावर आधारित त्याचे राम सीता रास (रामायण) ही त्या पद्धतीची पहिली मोठी साहित्य कृती आहे.

छीहलने १५१८ च्या सुमारास लेखन केले. त्याची उपलब्ध काव्ये आहेत– पच सहेली गीत, पंथी गीत, उदर गीत, पचेंद्रिय वेलि आणि नाम बावनी. १५१८ मध्ये लिहिलेल्या पच सहेलीत पाच स्त्रियांची पति विरह व्यथा आणि काही कालानंतर त्यांचे पतीशी पुनर्मिलनाचे वर्णन आहे. त्या पाच जणी माळी, पानवाला, रगारी, दारुवाला आणि सोनार यांच्या बायका आहेत. प्रत्येक जणी तिच्या पतीच्या धंद्याशी संबंधित शब्दप्रयोगात आपापल्या व्यथेचे वर्णन करते माळ्याची बायको म्हणते :

'माझ्या शरीरवृक्षाला रसाळ व गोमटी सशी येऊ लागली होती; पण ते आता सुकू लागले आहेत कारण वृक्षाला पाणी घालणारा माझा प्रियतम दूर आहे'

'चापयाच्या पाकळ्यांचा हार मी तयार करते. पण प्रियतमाच्या अनुपस्थितीत जर मी तो हार घातला तर त्याने माझे शरीर जळू लागते.'

बावनीमध्ये कवीने मनापासून रंगून जाऊन रचलेली सकीर्ण पदे आहेत.

कुशल लाभ (१५२३–१५९३ अदाजे) याने विविध विषयावर लेखन केले. लोकप्रिय लोककथांवर उदा माधवानल चौपइ आणि ढोला मारवणी, जैन परपरे-नुसार कथा आणि स्फुट पदे उदा. अगड दत्त रास, पूज्यवाहण गीत, देवी किंवा शक्तीवर उदा दुर्गा सात्तसी आणि बावनी छंद आणि छंदशास्त्रावर उदा. पिंगल सिरोमणी. पिंगल सिरोमणीमध्ये विविध वृत्ते, ७५ भाषालंकार आणि नाम माला या नावाने २४ शब्दाच्या समानार्थी शब्दाचा संग्रह दिलेला आहे. या पद्धतीची ही सर्वांत प्राचीन रचना होय. रामाची कथा सागत लेखकाने विषयाचे स्पष्टीकरण केले आहे. त्याने वार्ता या गद्याचाही उपयोग केला आहे. छंदशास्त्रावरील अन्य ग्रंथ रघुनाथ रूपकगी तां रो आणि रघुवर जस प्रकाश यातही रामाची कथा अशाच प्रकारे सांगितलेली आहे हे उल्लेखनीय आहे

असे असले तरी, पिंगल सिरोमणी ग्रथ कुशल लाभनेच रचला असे ठामपणे म्हणता येत नाही कुशललाभचा शिष्य, जैसलमेरचा कुवर हर राजकडेही त्याचे कर्तृत्व देतात. ग्रथाच्या प्रकाशित आवृत्तीमध्ये आढळणारा प्रक्षिप्त मजकूर आणि कालविपर्यय यावरून खरा लेखक कोण हे ठरवण्यासाठी अधिक सशोधनाची आव-श्यकता असल्याचे दिसून येते.

मागे सागितल्याप्रमाणे दुर्गा सात्तसी, माधवानल कामकंदला आणि ढोला मारू या मध्ययुगातील लोकप्रिय लोककथा होत्या या कथावरील कुशल लाभची काव्ये या क्षेत्रातील महत्त्वाची खूण होय. ढोला मारूच्या कथेवरील विविध रूपातील द्विचरणात्मक रचना अत्यंत लोकप्रिय होत्या, विशेषतः कथावाचक व गायक लोकामध्ये कुशल लाभने त्या विभिन्न जागाहून गोळा केल्या, त्याना चकचकीत केले, स्वतःच्या चौपई त्यात मिसळल्या आणि रचनेला सुसगत व कलात्मक आकार दिला विभिन्न हस्तलिखितातून आढळणाऱ्या वेगवेगळ्या रूपांचे कारण यावरून लक्षात येईल

समयसुदर (१५५३–१६४६) हा विख्यात कवी आणि विद्वान होता. त्याच्या रचनांची बहुविधता व संख्या आश्चर्य वाटण्याइतकी मोठी आहे. त्याने संस्कृतमध्ये बरेच लेखन केले. राजस्थानीमध्ये त्याने लिहिलेली उपलब्ध काव्ये आहेत— सुमारे दोन डझन निवेदनात्मक काव्ये, बहुधा रास आणि चौपई; पदाचे

नऊ संग्रह-छत्तीसी या नावाने ओळखले जाणारे; आणि सुमारे ५०० गीते व स्फुट पदे. बहुतेक पदे विशिष्ट चालीत गाण्यासाठी आहेत. एक म्हण आहे– 'समयसुंदर रा गीतडा, कुमै राणै रा भीतडा' म्हणजे राणा कुंभाच्या बांधकामाची संख्या जशी अगणित आहे तशीच समय सुदरच्या गीतांची संख्या बेसुमार आहे.

समय सुदरची निवेदनात्मक काव्ये– सिंहल सुत प्रियमेलक रास, चम्पक सेठ चौपई, सीताराम चौपई, नलदमयती चौपई, मृगावती रास. वस्तुपाल तेजपाल रास इ. लोककथावर किंवा जैन परपरागत कथावर आधारित आहेत

समय सुदरचे काव्य त्यातील विषयाप्रमाणेच त्याची माडणी, आकार, वृत्त लोकप्रिय चाली आणि भाषेच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे त्याच्या काव्याच्या माध्यमाने त्याने लोकाच्या सांस्कृतिक व धार्मिक विकासासाठी मोलाची कामगिरी बजावली आहे. त्या काळचे अगदी हुबेहूब चित्रण त्याने कित्येक ठिकाणी केले आहे. १६३०(वि. सं. १६८७) मध्ये गुजरातमध्ये भयकर दुष्काळ पडला होता. त्या दुःखद परिस्थितीचे हुबेहूब व हृदयस्पर्शी वर्णन कवीने केले आहे. त्या परिस्थितीची त्यालाही झळ लागलेली होती. त्याच्या सत्यासिया दुष्काळ वर्णन छत्तीसी मधून एक उदाहरण पुढे देत आहोत :

'पतीने पत्नीचा त्याग केला व पत्नीने पतीला सोडून दिले. मुलांनी प्रेमळ वडिलाना सोडून दिले भावानी बहिणींना सोडून दिले बहिणीनी भावांना सोडून दिले. नात्याचे व प्रेमाचे सर्व महत्त्व संपले, महत्त्व उरले ते फक्त अन्नाला. असख्य लोक घरदार सोडून आश्रयासाठी देशोधडीला लागले. १६८७ चा दुष्काळ इतका मोठा होता की जे लोक घरदार सोडून दूरवर गेले त्यानाही अन्न मिळू शकले नाही असे समयसुदर म्हणतो.'

पद्मिनी आणि गोरा बादल या विषयावरही अनेक सुदर निवेदनात्मक काव्ये लिहिली गेली आहेत. हेमरतन सूरीचे (१५५९–१६१९) गोरा बादल चरित्र (किंवा गोरा बादल पद्मिनी चौपई) हे त्याचे उदाहरण होय. या ऐतिहासिक घटनेचे कवीने मोठे सहज सुदर, मनोवेधक व मार्मिक पद्धतीने वर्णन केले आहे. निष्ठा, नीतिमत्ता व पातिव्रत्य या गुणांवर भर देण्याचा त्याचा हेतू होता पद्मिनी, रतनसेन, गोरा, बादल, राघव चेतन आणि अल-उद्-दिन या सर्वांची चरित्रे वास्तववादी पद्धतीने रेखाटलेली आहेत कवी निकट सबधाला तडा न जाऊ देता त्याच्या पूर्वस्मृतीचे वर्णन करीत असल्यासारखे वाटते काव्य रजपूत राणीच्या शीलधर्माचे आणि धर्म, संस्कृती, परपरा व मूल्यांच्या रक्षणार्थ राजपूत वीरांच्या शौर्याचे व इमानाचे वर्णन करते. अल-उद्-दिनचा पराभव करून गोरा व बादलने राणा रतनसेनला सोडवले. युद्धात गोरा मारला गेला पण राणा मात्र किल्ल्यात परत आला. तेथे त्याचे आनदाने स्वागत झाले. काव्य सुखान्त आहे.

काव्यात ६१९ पदे (चौपई) आणि काही कवित्त आहेत. कवित्तांची रचना हेमरतनच्या पूर्वीच्या अज्ञात कवीने केलेली आहे. हेमरतनची महीपाल चौपई, अमर कमर चौपई, सीता चौपई आणि लीलावती ही देखील निवेदनात्मक काव्ये आहेत. पण त्याला ख्याती मिळाली ती पद्मिनी चौपईमुळे !

जिनराज सूरि (१५९०–१६४३) हा विद्वान व कवी होता. शालिभद्र धन्ना चौपई, गज सुकुमाल महामुनि चौपई आणि रामायण या त्याच्या निवेदनात्मक काव्यांपैकी विशेषत: पहिल्याला खूप लोकप्रियता लाभली. शालिभद्र धन्ना चौपई हे या विषयावर लिहिलेल्या सर्व काव्यामध्ये वरचढ आहे. त्याच्या स्फुट गीतामध्ये तीर्थंकर, विहरमान यांची स्तुती आणि शत्रुंजय व आबू सारख्या तीर्थस्थानाचे वर्णन केलेले आहे सर्व काव्ये गेय आहेत.

लब्धोदय (१६२३–१६९३) ने सात निवेदनात्मक काव्ये लिहिली. त्यापैकी पुढील चार उपलब्ध आहेत— पद्मिनी चरित चौपई, मलय सुंदरी चौपई, रतनचूड मणिचूड चौपई आणि गुणावली चौपई. पहिली दोन काव्ये शील धर्माची थोरवी दर्शविण्यासाठी लिहिलेली आहेत आणि बाकीची दोन अनुक्रमे दानधर्म व ज्ञान पचमीसाठी आहेत. पद्मिनी चरित चौपई या सर्वांत महत्त्वाच्या काव्यामध्ये, याच विषयावरील हेमरतनच्या काव्याची पद्धत व कथा स्वीकारलेली आहे. वेगवेगळ्या लोकसंगीतामध्ये व रागामध्ये गाण्यासाठी ते लिहिलेले आहे. हेमरतनच्या काव्याप्रमाणेच हे देखील सुखान्त आहे पद्मिनी हे नामविशेष नसून विशिष्ट गुण असलेल्या स्त्रीचे ते वर्णन आहे लब्धोदयाच्या काव्यात राघव आणि चेतन दोन व्यक्ती आहेत. हेमरतनच्या काव्यात मात्र ती एकच व्यक्ती आहे

जिनहर्ष (जसराज, १६२८–१७२२) याने सुमारे ७४ मोठी काव्ये रचली उदा. चंदन मालयगिरी चौपई, कुसुम श्री महासती चौपई, विद्याविलास रास, मृगापुत्र चौपई आणि मत्स्योदर रास इ. जैन पुराणांवर व आख्यायिकांवर ती बहुधा आधारित आहेत. याखेरीज त्याने नीती, धर्म आणि ऐहिकता यासारख्या संकीर्ण विषयांवर सुमारे ३५० स्फुट गीते व पदे रचली. प्रेमपत्रिका, दोधक छत्तीसी, वारहमासा रा दूहा, पनरह तिथि रा दूहा आणि नेमी राजिमती गीत यासारख्या त्याच्या कित्येक काव्यातून प्रेम, अभिलाषा व विरहाच्या गहन भावनाचे वर्णन केलेले आहे. काझी महमूद, मीराबाई यांच्या काव्याचा आणि ढोला मारू रा दूहाचा प्रभाव असल्याचे या पदावरून दिसून येते, काही उदाहरणे खाली दिली आहेत :

'जसा म्हणतो : विश्वासघातकी प्रियकरांचे प्रेम फार काळ टिकून रहात नाही. वाळूत पाणी झिरपून जावे तसे ते नाहीसे होते. विश्वासघातकी प्रियकराचे प्रेम नाहीसा होत जाणाऱ्या सकाळच्या सावलीसारखे असते, तेच एकनिष्ठ प्रियकराचे प्रेम वाढत जाणाऱ्या सायंकाळच्या सावलीसारखे असते.'

प्रियकर मला दाट नैराश्यात (प्रेमपत्रिका) टाकून परदेशी जात आहे. तो गेला तेव्हापासून मी त्याच्यासाठी उसासे टाकीत आहे आणि माझा श्वास वारंवार अडखळत आहे.

धर्मवर्धन (धरमसी, १६४३–१७२६) याने नीती व स्तुती, ऋतु आणि शूरवीर यासारख्या विविध विषयावर लेखन केले आहे. त्याची मुख्य निवेदनात्मक काव्ये आहेत : श्रेणिक चौपई अमरसेन वयरसेन चौपई आणि सुर सुदरी रास संकीर्ण विषयांवरील त्याची स्फुट पदे विख्यात आहेत. कित्येक लोकप्रिय काव्य शैलीचा त्याने वापर केला आहे. कवीने राजस्थानीखेरीज, सस्कृत व ब्रज भाषेतही काव्यरचना केली आहे. तत्कालीन, सामाजिक व राजकोय परिस्थितीचे वर्णन त्याने केले असून शिवाजी व दुर्गादाससारख्या थोर वीराचे गुणगान केले आहे. त्याच्या काही पदामधून सामाजिक इशारा दिलेला आहे. १६७६ मध्ये सुरत येथे शिवाजी मराठावर त्याने लिहिलेल्या एका डिंगल गीतांच्या काही ओळी पहा :

' त्याला शक्तीदेवीने प्रेरणा दिली की त्याच्या स्वतःच्या बाहुबलाने त्याला उत्स्फूर्त केले ? त्याने अजिक्य किल्ल्यावर यशस्वी हल्ले केले. त्याला तोड देण्याचे धैर्य अन्य कोणत्या शासकात आहे ! बादशहालासुद्धा त्याच्या पराक्रमाची भीती वाटते त्याच्याशी लढायचे धाडस करणाऱ्या सर्व दुष्टाना त्याने त्याच्या पायदळी तुडविले. त्याला शरण गेले तेच काय ते फक्त जिवत राहू शकले. शिवाजीची गर्जना ऐकून दिल्लीपतीदेखील माजरासारखा थरथरतो '

दौलतविजयच्या (१६४३–१७४३) खुम्माण रासचा खूप गवगवा झालेला आहे. साहित्याच्या काही इतिहासतज्ज्ञांनी या रासाचा हिंदी साहित्याच्या प्राचीन कालात (१०००–१४०० अदाजे) समावेश केलेला असला तरी खरे म्हणजे हा १८ व्या शतकातील आहे १७१२ च्या सुमारास तो रचला असावा. उपलब्ध हस्तलिखित अपूर्ण असून त्यात ३५७६ पदे आहेत त्यात मेवाडच्या राज्यकर्त्यांचा बाप्पा रावळ ते महाराणा राजसिहपर्यंतचा इतिहास सागितलेला आहे तसेच खुम्माण आणि पद्मावती याच्यावरच्या दोन स्वतत्र काव्यांचाही त्यात अतर्भाव आहे. खुम्माण रास ८ भागामध्ये विभागलेला आहे. दुसरा, तिसरा आणि चौथा भाग खुम्माण व त्याच्या विवाहावर आहे आणि सहाव्या भागात पद्मिनी व अल-उद-दिनचा प्रसंग सागितलेला आहे. बाकीच्या विभागामध्ये मुख्यतः अन्य राज्य-कर्त्यांशी सबधित घटना वर्णिलेल्या आहेत. महाराणा राजसिहाने जयसमंद तलावाला बाध बाधला येथे उपलब्ध मजकूर संपतो. दोहा, सोरठा, चौपई, कवित्त आणि गाहा छदाचा वापर प्रामुख्याने केलेला आहे.

खुम्माण आणि पद्मावती प्रसंगाशी संबंधित भाग त्याच्या काव्यमय गुणां-साठी उल्लेखनीय आहेत. त्यात वास्तविकता व काल्पनिकतेचे एकीकरण आणि वीर व शृंगार रसांचे मिश्रण आहे राजस्थानचे जनजीवन, गणगौर व सावनी तीज (श्रावणातील तृतीया) सारखे सण, तेथील स्त्रियांचे सौंदर्य व शृंगार, स्त्रियांचे खेळ व मौजमजा, त्या प्रसंगी गायिली जाणारी गाणी या सर्वांचे स्पष्ट व चित्रमय वर्णन त्यात केलेले आहे. असे वाटते की कवीने प्रारंभी खुम्माणशी संबधित चौथ्या भागापर्यंतच फक्त लिहावयाचे योजिले असावे; पण नतर त्याचा शिष्य रामसिंह याच्या सतत आग्रहावरून त्याने पुढील चार भाग लिहिले असावेत.

खुम्माण, दिल्लीच्या राजाची मुलगी रतिसुंदरीशी विवाह करतो. त्यानंतर तो शिकारीला जातो तेव्हा नलवर येथे तिलोत्तमेच्या प्रेमात पडतो. ती तिच्या पतीपासून विभक्त झालेली असते. नलवरचा राजा त्याच्या मुलीचे लासाचे खुम्माणशी लग्न लावून देतो.

रतिसुंदरी म्हणते :

' नरवरगडच्या स्त्रियानो ! कान देऊन माझी विनंती ऐका आणि माझा जिवलग मला कधी परत देणार ते सांगा.

नरवरगडच्या स्त्रियांनो ! तुम्ही खूप मोल देऊन माझा पती विकत घेतला आहे का ? मला तर तो गहाण ठेवलेल्या हारासारखा वाटतो आणि एक ना एक दिवस तुम्हाला तो मला परत द्यावाच लागेल '

तिलोत्तमा आणि लासाबरोबर खुम्माण चित्तोडला परत येतो. तिलोत्तमेचा पती चम्पकदत्त गझनीच्या महमूद बादशहाची मदत मागतो. बादशहा चित्तोडवर हल्ला करतो सोनगरा कान्हड दे आणि त्याचा पुतण्या कासमोड याच्यासह खुम्माण शर्थीने झुंज देतो आणि अखेर युद्धात विजयी होतो

कासमोडची पत्नी आपल्या पतीला म्हणते :

' स्वामी ! तुमच्या शौर्याचा जयजयकार असो ! तुम्ही जीवन व मृत्यूचे धनी आहात. मरण आले तरी माझा क्षणभरही विचार करू नका स्वर्गात निश्चितच आपली भेट होईल. मरण एकदाच यावयाचे असते; पण शूराचा मान बहुमोल असतो. जीवनाचे मोल देऊनही तुम्ही जर कीर्ती मिळवू शकला तर तो सौदा फायद्याचाच राहील क्षत्रिय धर्म हा सर्व धर्मात श्रेष्ठ आहे. योद्ध्याच्या शौर्याचा बहुमान राखलाच पाहिजे. म्हणून, जिवलगा ! रणांगणावर जा आणि शत्रूंच्या हत्तींच्या शिरावर तुमची तलवार विजेसारखी तळपू द्या

पद्मिनी : अल-उद-दिन प्रसंगाच्या वर्णनात कवीने हेमरतन सूरीच्या गोरा बादल पद्मिनी चौपईचे अनुसरण केले आहे. ढोला मारू, गावण सिवदास आणि

खिडिया जग्गा यांच्या वचनिका, गणपती कायस्थचे माधवानल कामकंदला प्रबंध आणि पृथ्वीराज रासौ यासारख्या अनेक सुप्रसिद्ध कृतींचा प्रभाव या काव्यातून दिसून येतो.

खुम्मान रास या कालखंडाचे प्रातिनिधिक काव्य म्हणता येईल.

विनयचंद्राने १६६८ ते १७१२ च्या दरम्यान लेखन केले. आपल्या भक्तिभावना व्यक्त करण्यासाठी त्याने बहुधा चोबीसी आणि बीसी सारखी संख्यात्मक पदे रचली. उत्तमकुमार चरित चौपई हे त्याचे प्रमुख निवेदनात्मक काव्य आहे. त्यात बनारसच्या राजा मकरध्वजाचा पुत्र उत्तमकुमार याच्या प्रेमाचे व सफरीचे आणि अखेरीस तो जैन मुनी झाल्याचे वर्णन आहे. त्याची बहुतेक पदे व स्फुट कवने लोकगीतांच्या लोकप्रिय चालीवर गाण्यासारखी आहेत. सामान्य माणसाच्या जीवनातील वाक्‌संप्रदाय व शब्दयोजना ही त्याच्या काव्यांची ठळक चिन्हे आहेत.

जयमल्लजी (१७०८–१७९६) हा स्थानकवासी पंथाचा आचार्य होता त्याच्या काव्याचे तीन विभाग करता येतात— उपदेशात्मक, स्तुती आणि आख्याने. उपदेशात्मक काव्ये आहेत– आत्मिक छत्तीसी, उपदेश तीसी, उपदेश बत्तीसी, जीव चेतावनी, पुन्य छत्तीसी, वैराग्य बत्तीसी इ. (३७ काव्ये) स्तुतिकाव्ये नऊ आहेत– चोबीसी स्तवन, चार मगल, चोसठ जातियो की सज्झाय, बीस विहरमान का स्तवन, शांति जिन स्तवन, इत्यादी चरित किंवा आख्यान काव्यामध्ये जैन सप्रदायात प्रसिद्ध असलेल्या किंवा लोकसाहित्यात लोकप्रिय असलेल्या व्यक्तींच्या कथा सांगितलेल्या आहेत. उदा. अर्जुन माली, उदयी राजा, कार्तिक सेठ, तेताली पुत्र, परदेसी राजा, महाराणी देवकी, मेघकुमार, नेमिनाथ, सती द्रौपदी आणि सुबाहुकुमार लोककथाना बहुधा लोकप्रिय कल्पनाबंधाच्या उदा. पूर्वजन्मीच्या कथा, माध्यमाने जैन जीवन पद्धतीच्या धाटणीत घातलेले आहे. त्याच्या सकीर्ण काव्यांमध्ये गोनम प्रिच्छा आणि चद्रगुप्त राजा का सोलह सपना याचा समावेश आहे. सर्व काव्ये सोप्या राजस्थानी भाषेत आहेत. जैन धर्म व तत्त्वज्ञानाची माहिती देणे, संप्रदाय दृढ करणे आणि सद्‌गुणांना उत्तेजन देणे हा कवीचा हेतू आहे.

तेरापथ शाखेचा (श्वेताम्बर) सस्थापक भीखणजी (१७२६–१८०३) यास दूरदृष्टी, काव्य प्रतिभा आणि जैन तत्त्वज्ञानाचे गहन अभिज्ञान होते जैन सप्रदायात आचरण व चारित्र्यातील सैलपणाविरुद्ध प्रतिक्रिया झाली होती. १७६० मध्ये तेरापथ शाखेची स्थापना ही अशीच एक प्रतिक्रिया होती. अधिकृत संहितेची भीखणजीने व्याख्या केली सोप्या भाषेत काव्यामधून लालित्यपूर्ण पद्धतीने त्याने आपली मते पुढे मांडली. त्याची काव्ये दोन प्रकारची आहेत : (१) मूळ व तात्त्विक बाजूचा परामर्ष घेणारी, उदा. नव पदार्थ, श्रावक बारह व्रत (२) निवे-

दनात्मक उदा. गोसाला री चौपाई, उदै राजारो बखाण आणि सुबाहुकुमार रो बखाण. यापैकी बहुतेक कथा जैन आगमावर आधारित आहेत पण त्याच्या विस्ताराची, निवेदनाची पद्धत मात्र त्याची स्वत:ची आहे. काव्याचे अंतिम लक्ष्य आहे निर्वेद. वर्णनाच्या ओघात लोकप्रिय म्हणींच्या रूपात त्याने नैतिक उपदेश केलेला आहे. काव्ये गेय आहेत. बहुतेकांना लोकप्रिय लोकगीताच्या चाली आहेत. जैन धार्मिक तत्त्वज्ञानाचा अर्थ लावणे व ते सामान्य माणसाला समजण्यायोग्य सुलभ करणे हे आचार्यांचे मुख्य उद्दिष्ट होते. या कामासाठी कथाचे माध्यम सर्वोत्तम असते आणि इतरांप्रमाणेच त्याने देखील हेच माध्यम हाती घेतले. तसे करताना त्याने घटनांची व भावनांची सुंदर वर्णने केली आहेत. तो सत्याचा उपासक होता. योग्य वाटलेले सत्य सांगायला तो भीत नसे. त्याच्या स्पष्टवक्तेपणाची अनेक उदाहरणे काव्यात आढळतात. फार काय त्याने २४ वे तीर्थंकर भगवान महावीरांवर टीका करावयाचे सोडले नाही.

मंखली व भद्रा याचा पुत्र गोशालक याची कथा भगवती सूत्राच्या १५ व्या शतकात दिलेली आहे. गोशालक भगवान महावीरचा शिष्य झाला. वैस्यायन नावाच्या एका मुनीच्या विक्षिप्त वागणुकीवर गोशालकाने एकदा टीका केली होती सूर्यपूजा करीत असताना तो पळून जाणाऱ्या उवा पकडून पुन्हा केसात सोडत होता टीकेमुळे वैस्यायन मुनी गोशालकावर संतापला. त्या रागाच्या भरात गोशालकाला भस्म करण्यासाठी त्याने त्याच्यावर तेजोलेस्या (अग्नियुक्त दृष्टी) टाकली. भगवान महावीराने शीतलेस्या (थंड दृष्टी) टाकून त्या अग्नीवर प्रतिक्रिया केली आणि गोशालकाला वाचवले. भगवान महावीराच्या या कृतीवर भीखणजीने टीका केली आहे. अहिंसेच्या दृष्टीने ती छद्म वेषातील चूक असल्याचे त्याने त्याच्या गोसाला री चौपईमध्ये म्हटले आहे. या बाबतीतील त्याचे मत जैन धर्मातील संप्रदायाभिमानी मतापासून अगदी भिन्न आहे.

ज्ञान सार (१७४४–१८४१) याने विविध चालीवर गाण्यासारखी गेय भक्तिगीते रचली छद चौपई समालोचना नावाची एक पद्यमय टीका देखील त्याने लिहिली आहे. तिच्यात ४१३ पदे असून मोहनविजयच्या छद राजा चौपई काव्यावर १८२० मध्ये लिहिलेली आहे. आनदघनच्या साहित्य कृतींचा त्याच्यावर खूप प्रभाव होता आणि त्याच्या चौबीसीवर त्याने बालावबोध नावाचे एक भाष्य लिहिले आहे. त्याचा माला पिंगल हा छंदशास्त्रावरील ग्रंथ आहे. पूरब देस वर्णनमध्ये त्याने बंगालच्या लोकांच्या, विशेषत: मुर्शिदाबाद विभागातील लोकांच्या चालीरिती, परंपरा, जीवनाच्या पद्धती व वेशभूषा इत्यादींचे वास्तववादी पद्धतीने वर्णन केले आहे. राजस्थानीची किंचित छटा असलेल्या ब्रजभाषेत तो लिहिलेला असून त्याचा रचनाकाल १७९३ च्या आसपासचा असावा.

## लौकिक प्रेम काव्य

प्राचीन कालात आपण लौकिक प्रेम काव्याची दखल घेतली आहेच. मध्य-युगीन कालखंडातही पद्यात व गद्यमिश्रीत पद्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात लौकिक प्रेमावर साहित्य निर्मिती झाली हे दोन प्रकारचे आहे :

एक– ज्यांचा लेखक ज्ञात असून स्वत:च्या रचनात्मक प्रवृत्तीप्रती जागरूक आहे अशा काव्यामध्ये भावनांच्या अभिव्यक्तीइतकेच किंबहुना त्याहून अधिकच महत्त्व संबंधित घटनांच्या वर्णनाला असते. मूळ मजकुरामध्ये मागाहून आणखी मजकूर घुसडला जाण्याची शक्यता यात त्या मानाने कमी किंवा अजिबात नसते विषय बहुधा प्राचीन साहित्यिक परंपरेतून घेतलेला असतो किंवा काल्पनिक असतो. माधवानल कामकदला, बुद्धि रासौ इ. अशा प्रकारची काव्ये आहेत.

दुसरे, अज्ञात लेखकाचे साहित्य. एक प्रकारच्या वास्तविक घटनेवर मुख्य कथा आधारित असते. कथा व तत्संबंधित पदे लोकांमध्ये लोकप्रिय असतात आणि बहुधा मौखिक परंपरेने आपणापर्यंत येऊन पोहोचलेली असतात ती जतन करून राखण्यासाठी त्याना नंतर लिपीबद्ध करण्यात आलेले असते. अर्थातच पदांमध्ये विषयासंबंधी प्रादेशिक फरक व पाठभेद आढळणे साहजिकच आहे. जेठवा-ऊजळी, नागजी-नागमती, शेणी वीजानद, बीझा-सोरठ, जलाल, बूबना इ कथा अशा प्रकारच्या आहेत. या कथावरील असंख्य स्फुट पदे दोहा व सोरठ्याच्या रूपात वेगवेगळ्या हस्तलिखितांमध्ये उपलब्ध आहेत. त्यामध्ये ढोलामारूचे दोहे प्राचीन असून त्याची संख्याही जास्त आहे. हे दोहे एकत्र स्वरूपातही उपलब्ध आहेत या काव्यविषयावरील पदे म्हणजे विविध परिस्थितीत आणि अनेक प्रकारे झालेली प्रेमाची उत्स्फूर्त अभिव्यक्तीच होय एखादी सुसंगत कथा त्यात सांगितलेली असतेच असे नाही, तर मधून मधून प्रसंगाचे ओझरते दर्शन फक्त होते कथेचा विषय बहुधा गद्य रूपात प्रचलित असलेल्या कथामधून मिळतो किंवा पद्यमिश्रित गद्यातून वा मौखिक परंपरेतून घेतलेला असतो. अभिव्यक्त केलेल्या भावना सार्वत्रिक असल्याने आणि शैली व आकार समान असल्याने अनेक लोकप्रिय पदे किंचित फेरफाराने एकापेक्षा अधिक कथांमध्ये मिसळली गेली आहेत. विश्वसनीय हस्तलिखित उपलब्ध नसल्याने ही पदे निवडून त्याचा विशिष्ट कथाशी संबंध जोडणे बहुधा कठीण असते. त्याचप्रमाणे या कथा प्रत्यक्षात घडलेल्या घटनामधून निर्माण झाल्या असण्याची आणि लोकांनी त्यात सुधारणा केली असण्याची किंवा त्या फुगवून सांगितल्या असण्याचीही शक्यता असते. उपलब्ध साहित्यावरून पात्रांचे, त्यांच्या कालखंडाचे व कार्यांचे ऐतिहासिकत्व ठरवणे शक्य नाही. त्याचे ऐतिहासिकत्व शोधण्याचा प्रयास बहुधा निष्फळ ठरतो. वंशपरंपरेने या कथा चालत आल्याने प्रत्येक पिढीत त्यात काही ना काही कमी-जास्त होत जाते आणि त्यामुळे मूळ

लेखकाचे नाव बहुधा नाहीसे होते. सार्वत्रिकता, भावनाचा सामान्य आधार, अभिव्यक्तीचा साधेपणा, भाषेचा ओघ व शैली यांच्यामुळे एकाने जे सांगितले ते लगेच सर्वतोमुखी व सर्वव्यापी होत असते. अशा शेकडो कथांपैकी काही मोजक्या कथांमध्येच मूल सत्य उघड केलेले असते. प्रेमाचा अस्सलपणा व अगाधता हे या कथांचे वैशिष्टय असते. नैसर्गिक मानवी भावनांच्या अनुभूतीतून त्या निर्माण झालेल्या असतात आणि म्हणूनच आजवर त्या टिकून राहिल्या आणि जोवर प्रेम अस्तित्वात आहे तोवर त्यादेखील अस्तित्वात राहतील.

विश्वासघात, क्रौर्य, कृतघ्नता, सामाजिक, धार्मिक व आर्थिक अडचणी, सदोष जुळणी आणि घरगुती भांडणे हे सर्व कोणत्या ना कोणत्या रूपात या कथा-मध्ये आलेले असते. दैववाद आणि काव्यात्म रूढींचा वापर या सर्व कथामधून सर्रास आढळतो. प्रचलित परंपराविरूद्ध यात प्रतिकार नसतो आणि प्रेमीजन त्याच्यापुढे मान तुकवितात किंवा त्यांच्यावर प्रभुत्व मिळविण्यासाठी मदत मागतात. निराश प्रेमी पक्षी, झाडे, ढग आणि निसर्गातील अन्य वस्तूशी नाते जोडतात. मानवी संबध, सामाजिक नियम, प्रेमातील वर्तणूक आणि वैयक्तिक कृती यामधील समस्या या कथामधून मांडलेल्या असतात. पदामधून दाखवलेले असते की प्रेमा-खेरीज जीवन शुष्क नीरस आहे आणि प्रेमाला जात, कूळ किंवा सामाजिक दर्जातील फरक मान्य नसतो.

माधवानल कामकंदला व ढोला मारूच्या कथा मध्ययुगीन कालखंडात अतिशय लोकप्रिय असल्याचे आम्ही मागे सांगितले आहेच. या विषयावर अनेक लोकप्रिय काव्ये लिहिलेली आहेत.

नरसाचा मुलगा गणपती कायस्थ याने १५२७ मध्ये महाकाव्याच्या शैलीत माधवानल कामकंदला प्रबंध रचला. तो ८ अगांमध्ये विभागलेला असून त्यात त्यात २५६५ दोहे (दोधक) आहेत. विक्रमाच्या प्रेम व रोमांसच्या कथाचक्राशी माधवानल व कामकंदलेच्या कथेचा संबंध जोडलेला आहे. प्रस्तुत काव्याची कथा थोडक्यात अशी आहे : माधव नावाचा कामदेवासारखा सुंदर ब्राह्मण, गोविंद-चंद्राच्या राज्यात पुष्पावती येथे रहात होता. गोविंदचंद्राच्या पट्टराणीचे रुद्र महादेवीचे माधवावर प्रेम बसले पण माधवाने तिचे प्रेम अव्हेरिले. त्यावर चिडून राणीने त्याला हद्दपार घालवले माधव तेथून रुक्मागदपुरीला गेला. तेथे नगरी-तल्या सर्व तरूण स्त्रिया त्याच्या प्रेमात पडल्या. तेव्हा तेथील पुरूषानी माधवाला हाकलून देण्याची विनती राजा रायचंदला केली. माधवाच्या आकर्षणाची परीक्षा पाहण्यासाठी राजाने त्याला आपल्या अंतःपुरात राण्यासमोर बोलावले. आपल्या गृहसौख्याला त्याचा धोका असल्याचे लक्षात येऊन राजाने त्याला राज्याबाहेर हाकलून दिले. भटकत भटकत माधव कामावती नगरीत आला. आपल्या कला-

कौशल्याने व बुद्धिमत्तेने त्याने तेथील राजा कामसेनच्या दरबारात मानाचे स्थान पटकावले. एकदा दरबारात कामकदला नर्तकीचे नृत्य चालले होते. एक काळा भुंगा तिच्या वस्त्रावर बसला आणि तिच्या वक्षाला त्याने दंश केला. तरीदेखील विचलित न होता तिने नृत्य चालू ठेवले. या गोष्टीकडे कोणाचेही लक्ष गेले नाही. फक्त माधवानेच ते पाहिले. त्याने तिला नागवेलीचे पान दिले. ते पान राजाने त्याला सन्मानसूचक म्हणून दिलेले होते. तेच पान त्याने नर्तकीला दिल्याचे पाहून राजा रागावला व त्याने माधवला नगर सोडून जाण्याची आज्ञा दिली. तो जायला निघाला तेव्हा कामकंदलेने त्याला एक रात्र तिच्याकडे राहण्याची विनती केली माधवाने ती मान्य केली व तिच्याकडे राहिला. दोघे प्रेमात पडले. पुढे माधव उज्जैनला गेला तेथे महाकालाच्या देवळाच्या भिंतीवर त्याने आपली विरहव्यथा व्यक्त करणारी पदे लिहिली. लोकांचे दु ख दूर करणाऱ्या विक्रमादित्य राजाने ती पदे पाहिली आणि एका म्हाताऱ्या कलावंतीणीच्या मदतीने ती पदे लिहिणाऱ्या माधवचा शोध लावला, माधवाची कामकदलेवरील प्रेमाची हकीगत ऐकून विक्रमाने त्या दोघा प्रेमिकांचे लग्न लावून देण्यासाठी कामसेन राजाला सांगितले; पण कामसेनाने नकार दिला तेव्हा विक्रमादित्य त्याच्या नगरीवर चालून गेला कामकदलेच्या प्रेमाची परीक्षा पाहण्यासाठी विक्रमादित्याने तिचे आपल्याकडे मन वळविण्याचा प्रयत्न केला. तो निष्फळ झाला तेव्हा त्याने तिला माधवाच्या मृत्यूची खोटीच बातमी सांगितली. ती खोटी बातमी ऐकताच कामकंदला मरण पावली. मग विक्रमादित्याने परत येऊन तोच प्रयोग माधवावर केला. कामकदला मरण पावल्याचे माधवला सांगितले. बातमी ऐकताच माधवही मरण पावला या दोघा प्रेमीजनांच्या, त्यापैकी एक ब्राह्मण होता व दुसरी दिव्य सौंदर्याची पुतळी होती, त्यांच्या मृत्यूला आपण कारणीभूत झालो या विचाराने विक्रम राजा हत-बुद्ध झाला. त्यावेळी त्याचा मित्र वेताळ त्याच्या मदतीला आला. वेताळाने माधव आणि कामकदला दोघांना पुन्हा जिवंत केले विक्रमाने त्या दोघांचे लग्न लावून दिले व दोघे सुखेनैव राहू लागले.

काव्य अनेक दृष्टींनी लक्षणीय आहे. मंगलाचरणात कवींच्या नेहमीच्या परंपरे-नुसार सरस्वती किंवा गणपतीचे आवाहन करण्याऐवजी प्रेम व सौंदर्याच्या देवाला कामदेवाला गणपती कायस्थ नमस्कार करतो. विरहव्यथेच्या अभिव्यक्तीची त्याची स्वत:ची अशी विशिष्ट शैली आहे बारहमासाप्रमाणे ती प्रमाणबद्ध आहे. तिसरी उल्लेखनीय गोष्ट म्हणजे अशा प्रकारच्या इतर काव्यांमध्ये फक्त नायिकेच्या सौंदर्याचे वर्णन असते. पण या काव्यात मात्र नायक व नायिका दोघांच्या सौंदर्याचे बारकाईने वर्णन केलेले आहे. शृंगाराच्या संयोग व वियोग या दोन्ही बाजूचे वर्णन हे या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे सहाव्या अंगामध्ये केलेले कामकदलाच्या विरह-

व्यथेचे वर्णन वाचनीय आहे. नायक व नायिकेचे प्रेम आदर्श आहे नायक नायिकेच्या बुद्धिमत्तेची परीक्षा पाहण्यासाठी तीन जागी समस्या-प्रहेलिका दिलेल्या आहेत. त्यासाठी २०० पदे खर्ची घातलेली आहेत. बुद्धिचातुर्याच्या परीक्षेखेरीज करमणुकीच्या दृष्टीनेही ती चागली आहेत. त्या काळचे ते एक साहित्यिक चिन्ह होते. घरगुती कामकाज, सामाजिक चालीरिती व परंपरा, धार्मिक समजुती, दरबार, राजपुरुषांचा डौल व नागरी जीवन याविषयीची बरीच माहिती काव्यात आलेली आहे. माधव व कामकंदला यांच्या पूर्वजन्मीच्या कथाही कवीने थोडक्यात दिलेल्या आहेत. काव्याची भाषा मरु-गुर्जर आहे

या कथाविषयाने अन्य अनेक कवींचे लक्ष वेधून घेतले आहे. या मागे दोन मुख्य कारणे आहेत. एक, प्रेमीजनाच्या विरह व मीलनाच्या सर्व परिचित शृंगार भावनाचा कथेत व परपरेत समावेश झालेला आहे दुसरे, मध्यकालीन दतकथाचा सुपरिचित नायक विक्रमादित्याशी या कथेचा दुवा जुळलेला आहे.

या विषयावरील दुसरे महत्त्वाचे काव्य आहे कुशल लाभ या जैन कवीने रचलेले माधवानल कामकदला चौपई. कुशललाभने आपला शिष्य, जैसलमेरचा युवराज हरराज याची जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी १५५९ मध्ये हे काव्य रचले यात ६६२ पदे बहुतेक चौपई आहेत. भाषा सोपी राजस्थानी आहे काही संस्कृत श्लोक व प्राकृत गाहा देखील आहेत. सुमारे चार डझन पदे, किंचित फेरबदलाने प्रस्तुत काव्य व ढोला मारू दोन्हीमध्ये समान आहेत. आता ही पदे या दोन्हीपैकी कोणत्या काव्यात मूळात होती हे अजून निश्चित व्हावयाचे आहे. गणपतीच्या प्रबंधामध्ये दिलेली कथाच यातही आहे. पण कुशल लाभाचे वेगळेपण दिसून येते ते त्याने सांगितलेल्या प्रेमिकांच्या पूर्वायुष्याच्या कथाच्या बाबतीत.

याच विषयावरील आणखी एक उल्लेखनीय काव्य आहे— दामोदरने ७९३ दोहयांमध्ये लिहिलेले माधवानल कथा १७ व्या शतकाच्या पूर्वार्धात कधी तरी काव्य रचले गेले असावे असे वाटते. कुशललाभाच्या काव्याप्रमाणेच यातही कवीने संस्कृत श्लोक व प्राकृत गाहा दिल्या आहेत अन्य लोकप्रिय काव्ये— ढोला मारू, बींझा सोरठ, भीमचे सदयवत्स वीर प्रबंध यातील काही दोहे किरकोळ परिवर्तन करून यात घेतलेले आढळतात माधवाच्या मोहकतेची प्रकर्षता दाखवण्यासाठी दामोदराने एक नवीच घटना यात आणखी घातली आहे. ती आहे— माधवाला पाहिल्याने मनवेगी नावाच्या मंत्र्याच्या पत्नीचा गर्भपात होतो. एवढा एक प्रसंग वगळता बाकी बाबतीत कवीने गणपती व कुशललाभ यांच्याच पावलावर पावले टाकली आहेत.

तिन्ही काव्ये प्रगल्भ साहित्यिक निर्मिती असून प्रेमाच्या विविध भावछटा अगदी स्वाभाविक व हलक्याफुलक्या पद्धतीने रंगविलेल्या आहेत.

राजस्थानीच्या प्रख्यात दंतकथात्मक काव्यांपैकी एक महत्त्वाचे काव्य आहे–ढोला मारु रा दूहा. १५ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास कोणा अज्ञात कवीने ते रचले काव्याची कथा सुप्रसिद्ध असून अगदी साधी आहे. लक्षणीय गोष्ट ही आहे की एका साध्या कथेतून प्रेमाच्या सघन व बहुरंगी भावना स्पष्ट व घरगुती शैलीने अभिव्यक्त केलेल्या आहेत. 'विरह' भावनेचे वर्चस्व असलेले हे एक भावुक काव्य आहे. ढाढी लोकाच्या हस्ते आणि मेघ, पक्षी यासारख्या निसर्गातील दूताकरवी मारवणी ढोलाला विरहाचे संदेश पाठवते. त्यातून विरही प्रेमिकांच्या भावनाच फक्त व्यक्त होतात असे नाही तर शारीरिक स्पंदनही व्यक्त होते. मूळात ते मानवी असल्याने त्याला सार्वत्रिकता आहे. प्रेमकाव्यात हे अगदी आगळे काव्य असून स्थानिक रंगानी समृद्ध आहे.

काव्य विषयाच्या लोकप्रियतेमुळे त्याची अनेक काव्यरुपे व संशोधित प्रती आढळतात त्यापैकी आपण येथे विचार करीत असलेले दूहा आणि कुशललाभाचे दोहा चौपाई या प्रती विशेष लोकप्रिय आहेत नागरी प्रचारणी सभा, वाराणसीने प्रसिद्ध केलेल्या दूहा प्रतीत ६७४ पदे आहेत. ग्रंथप्रसिद्धीचा हा प्रयत्न चागला असला तरी त्याच्या पुर्नसपादनाची आवश्यकता आहे कारण वेगवेगळ्या संप्रदायाच्या हस्तलिखितामध्ये जतन करून ठेवलेली अनेक पदे मजकुराची नीट छाननी न करता जशीच्या तशी यात घेतलेली आहेत अशी पदे काही वेळेला विषयाच्या दृष्टीने परस्परविरोधी असतात शैली व शब्दयोजना मन मानेल तशी बदललेली आहे किंचित परिवर्तनाने त्यापैकी कित्येक पदे अन्य काव्यामधूनही आढळतात जसे, कुशललाभाच्या माधवानल कामकदला चौपाईमध्ये आणि कबीराच्या साख्यामध्ये (नागरी प्रचारिणी सभेने प्रसिद्ध केलेल्या कबीर ग्रथावलीत दिलेली) याचा काहीच खुलासा कोठे केलेला नाही.

ढोला मारुची कथादेखील थोड्याफार बदलाने राजस्थान लगतच्या क्षेत्रात लोकप्रिय आहे

मारवणी मेघाना म्हणते :

'वीज हलकी आणि चपळ आहे, ती तळपते आणि मजसारख्या एकटीला भयभीत करते. अरे मेघा ! तू दयार्द्र आहेस. म्हणून माझ्या व्यथेत मला दिलासा देण्यासाठी तुझा गडगडाट सौम्य व मायाळू होऊ दे.'

मारवणी ढाढीना म्हणते :

'कार्यक्षम जासूदाच्या तोंडी पाठवलेला निरोप अनेक चमत्कार करू शकतो. तो फक्त प्रियेचे शब्दच सागू शकतो असे नव्हे तर तिची अश्रुपूरित प्रतिमादेखील रंगवू शकतो.'

ढोलाच्या देशी जाणाऱ्या प्रवाशाला मारवणी आपला प्रेमाचा संदेश पोच-विण्यासाठी सांगते त्यावेळचे तिचे वर्णन कवीने केले आहे :

' वेदनायुक्त शरीराने प्रियतमा तिचा संदेश प्रवाशाच्या हवाली करते नजर खाली करून ती पायाच्या अंगठ्याने जेव्हा जमिनीवर रेषा ओढते, तेव्हा नेत्रा-वाटे वाहणारे हृदयातील अश्रू त्याला सगळा संदेश सांगतात. '

मारवणी म्हणते :

' प्रेम माझ्या अंतःकरणात वृक्षासारखे वाढते विरहामुळे त्याची पाने गळतात आणि प्रेमाच्या स्मृतीने त्यास नवी पालवी फुटण्याचा हा रोजचा अनुक्रम मला दररोज नवीन व्यथा देऊन जातो. '

' संदेश लिहिण्यासाठी प्रियकराच्या देशात चर्मपट नाही की शाई वा लेखणी नाही ? प्रियकराकडून संदेश न आल्याने मी काय करू ?'

ढाढी म्हणतो :

' समुद्रापलीकडे शेकडो योजने दूरवर वीज लखलखते. ढोला नरवरमध्ये आरामात राहत आहे, त्याची प्रेयसी मारवणी मात्र पूगलच्या बोळामध्ये त्याच्या-साठी झुरत आहे. '

बीसू चारण मारवणीच्या सौंदर्याचे वर्णन करतो:

' या चर्मचक्षूनी मारूसारखे सौंदर्य आजवर अन्यत्र कोठे पाहिले नाही. तिच्या चेहऱ्यावर उषःप्रभेची झाक आहे. '

ढोला मारूची आख्यायिका थोडा बदल करून कुशललाभच्या ढोला मारवणी चौपईमध्ये सांगितलेली आहे. प्रस्तावनेत मारूचे आईवडील, राजा पिंगल आणि उमा देवडी यांच्या विवाहाचे वर्णन केलेले आहे. ही एक स्वतंत्र कथा असून वंशावली देण्याच्या चारण शैलीच्या निवेदनात्मक काव्याची आठवण करून देते. मूळ कथा अधिक व्यापक व सुगम्य करण्यासाठी कवीने काव्यविषयासंबंधी दुवे दिलेले आहेत कथेत पुढे काय होणार आहे याचेही संकेत तो अगोदरच देतो त्याने मान्य केले आहे की ढोला मारूची आख्यायिका परंपरेने प्रचलित असून तिचा त्याने स्वतःच्या चौपाईत समावेश केला आहे व भरीला स्वतःची आणखी काही पदे घातली आहेत. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की १५५० मध्ये म्हणजे प्रस्तुत चौपईच्या रचनाकाली राजस्थानच्या वायव्य भागात ही आख्यायिका अतिशय लोकप्रिय होती.

जल्हच्या बुद्धि रासौच्या उपलब्ध हस्तलिखिताचा काल १६४७ (वि सं. १७०४), आणि पूर्वी लिहिलेल्या एखाद्या हस्तलिखिताची ती नक्कल असावी असे वाटते. पदाच्या अनुक्रमात तीन पदांचा फरक आहे. ६३ व्या पदानंतर पुढच्या

पदाचा क्रमांक ६७ आहे आणि त्यानंतर पुढची सर्व पदे त्याच अनुक्रमाने अखेर-पर्यंत दिलेली आहेत. अशा प्रकारे, काही विद्वानांनी सांगितल्याप्रमाणे पदाची एकूण संख्या १४० असायच्या ऐवजी ती १३७ आहे. काव्य फार पूर्वी नव्हे, तर १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात कधीतरी रचलेले असावे असा निष्कर्ष काढता येतो. आश्चर्याची गोष्ट म्हणजे, जल्ह किंवा जल्हन हे चंद वरदाई कवीच्या मुलाचेही नाव होते. (पृथ्वीराज रासो लिहिणारा विख्यात कवी चंद वरदाई) यावरून बुद्धि रासो लिहिणारा कवी आणि चंद वरदाईचा मुलगा हे एकच असल्याची काही विद्वानांची समजूत झाली आहे. बुद्धि रासो लिहिणारा कवी जैन होता असेही एक मत आहे. या दोन्ही मताना भक्कम आधार नाही आणि म्हणूनच ते ग्राह्य नाहीत.

बुद्धि रासोची कथा काल्पनिक असावी असे वाटते. थोडक्यात ही कथा अशी चंपावती नगरीचा एक तरुण राजपुत्र होता तो अपार संपत्ती बरोबर घेऊन पर-देशी जातो. तेथे जलधि तरंगिणी (पुत्ती) नावाच्या एका तरुण व सुंदर कला-वतीणीकडे तो कित्येक दिवस राहतो. पुत्तीचे त्याच्यावर प्रेम बसते व ती त्याला पती मानू लागते. राजपुत्र आपल्या नगरीला परत जातो जाताना तो पुत्तीला पुढच्या वसंत ऋतूत पुन्हा येण्याचे वचन देऊन जातो. त्यानंतर पुत्ती विवाहित महिलेप्रमाणे सभ्य, साधे व संभावित जीवन व्यतीत करू लागते तिने पुन्हा आपले कलावतीणीचे पैसा गोळा करण्याचे आयुष्य घालवावे यासाठी तिचे मन वळवण्याचा अत्ता नावाची दुसरी एक चतुर व म्हातारी कलावतीण खूप प्रयत्न करते पण पुत्ती तिला दाद देत नाही व एकनिष्ठ राहते अखेर राजपुत्र परत येतो आणि दोघे मिळून सुखाने राहू लागतात.

काव्याचा मुख्य भाग दोन कलावंतीणींच्या— एक म्हातारी व दुसरी तरुण यांच्या संवादाचा आहे. काव्याच्या अखेरीस दिलेल्या माहितीवरूनही हेच स्पष्ट होते. प्रेमाचा लौकिक, व्यावहारिक ज्ञानावर विजय हा संवादाचा खरा मुख्य विषय आहे.

अत्ता म्हणते, ' अग सुंदर विरहिणी, माझ्या चेहऱ्यावरील वार्धक्याच्या खुणा पहा तारुण्य क्षणभंगुर आहे ते आहे तोवर धनदौलत गोळा कर, अग मृगनयनी ! '

पुत्ती उत्तरते, ' आई, वेड लावणाऱ्या संपत्तीविषयी बोलू नकोस माझं हृदय प्रेमाने वेडावून गेलं आहे. मी माझ्या प्रियकराच्या प्रेम व स्नेहाच्या छायेत उभी आहे, ते छत्राप्रमाणे माझ्यावर आच्छादलेले आहे '

कथानक साधे आहे. संवाद तीक्ष्ण, संक्षिप्त, मुद्देसूद आणि परिणामकारक आहेत. भाषेच्या दृष्टीनेही काव्य महत्त्वपूर्ण आहे. भाषा अपभ्रंशाचा ठसा व ब्रज भाषेचे मिश्रण असलेली राजस्थानी आहे.

दामोने १४५९ मध्ये सोप्या राजस्थानीत लखमसेन पद्मावती चौपई रचली त्यात ३०० पदे आहेत, मुख्यतः दोहा आणि चौपई तीन भागात ते विभागलेले आहे. काही सस्कृत श्लोक प्राकृत गाहादेखील आहेत

कथा म्हणजे चमत्कार, रोमान्स व शौर्य याचे समिश्रण आहे. कवीवर जैन धर्माचा पगडा असावा असे वाटते कारण काव्यनायक लखमसेन सूर्यास्तानंतर जेवणे अपवित्र समजतो काव्यसौदर्याच्या दृष्टीने प्रस्तुत काव्य फारसे उल्लेखनीय नाही. कारण प्रेम-प्रकरणाचे, शृगार भावनाचे किंवा शूर कृतीचे त्यात क्वचितच वर्णन केलेले दिसते मात्र सामाजिक-धार्मिक समजुतीची नोद व भाषेचे प्राचीनत्व या दृष्टी ते तेमहत्त्वाचे आहे. संधी, योगायोग, चमत्कार याची निवेदनात पेरणी आढळते. कथा नायक व नायिका याच्या शारीरिक सौंदर्याचे वर्णन निव्वळ परंपरागत आहे. कथेत इतस्तः नीतिवचने दिलेली आहेत. पूर्वीच्या घटनांच्या परिणामाना ती स्थिर स्वरूप देतात.

तीन चौपई पुढे देत आहोत

' अन्य लोकाच्या दु खाची जाणीव होणारे व त्याच्या सुखाने आनदित होणारे लोक फार कमी असतात इतराचे कठीण काम स्वत.वर ओढवून घेण्यास तयार असलेले लोकही अगदी दुर्मिळ असतात

इतराच्या विपत्तीने आनंदित होणारे, इतराच्या आनदाने दुःखी होणारे आणि त्याच्या कामासाठी झगडण्याची वेळ आली असता तोंड लपवणारेच लोक अधिक असतात

सिंह, बहिरी ससाणा आणि शूर पुरुष पडले तरी प्रत्येक वेळी पुन्हा उभे राहतात, तेच हत्ती, मेढी, स्त्रीचे स्तन आणि भित्री माणसे एकदा खाली पडली की पुन्हा उभी राहू शकत नाहीत '

जेठवै रा सोरठा (किंवा दोहा) या नावाने जेठवा ऊजळीच्या कथेवर सुमारे शभर पदे उपलब्ध आहेत. ती ऊजळीने तिचा प्रियकर जेठवाला उद्देशून म्हटलेली आहेत. यात कथानक नाही. कथा आणि काही पदे मौखिक परंपरेने आपणापर्यंत आलेली आहेत. किंचित फरक असलेले गुजराती रूप देखील गुजरातेत तितकेच लोकप्रिय आहे. १७ व्या शतकाच्या पुढील विभिन्न हस्तलिखितात हे सोरठे विखुर-लेले आढळतात. मूळ सोरठे १५०० च्या सुमारास रचले गेले असावेत. थोडक्यात ही कथा अशी आहे

धूमली राजनगरीचा राजपुत्र जेठवा शिकारीला जातो घोड्यावर बसला असतानाच पाऊस व वादळामुळे तो बेशुद्ध होतो. घोडा त्याला तशाच बेशुद्धावस्थेत अमरा नावाच्या चारणाच्या झोपडीशी घेऊन जातो. अमरा व त्याची तरुण मुलगी

ऊजळी राजपुत्राला शुद्धीवर आणायचा खूप प्रयत्न करतात. अमरा गरीब होता. जेठवाला ऊब आणण्यासाठी त्याच्यावर घालायला पुरेशी पांघरुणे त्याच्यापाशी नव्हती. म्हणून अमराने विचार केला की विवस्त्र आलिंगन देऊन जेठवाला ऊब देण्यासाठी तरुण ऊजळीला सांगावे त्याने लेकीला सांगितले की तो तरुण स्वजातीय असल्यास तो तिचे लग्न त्याच्याशी लावून देईल वडिलांनी सांगितल्याप्रमाणे ऊजळीने केले तिच्या शरीराची ऊब मिळाल्याने जेठवा शुद्धीवर आला त्याने ऊजळीला तिच्याशी लग्न करण्याचे आश्वासन दिले विपत्तीत दैवयोगाने झालेल्या मीलनाची प्रमात परिणती झाली पण ऊजळी चारणकन्या असल्याचे कळले तेव्हा मात्र जेठवा गोंधळला. कारण परंपरेनुसार चारण व राजपूतांमध्ये लग्नसंबंध वर्ज्य होता या प्रथेचे मानसिक बंधन असल्याने जेठवाने ऊजळीशी लग्न करण्याचा विचार सोडून दिला आणि राजवाड्यात परत जाऊन राहू लागला. त्यानंतर ऊजळी त्याला कधीच भेटू शकली नाही.

ऊजळीने म्हटलेल्या पदामधून तिची विरहव्यथा अनेक प्रकारे व्यक्त झाली आहे. प्रेमाचे आवाहन स्वीकारून तिची भेट घेण्यासाठी तिने जेठवाला काकुळतीने विनवले आहे. प्रेम, सतत रेंगाळणारे दुःख, विरहव्यथा, अनुनय, प्रार्थना आणि पुनर्मिलनाची आतुरता या सर्वांची सुरेख अभिव्यक्ती तिच्या पदांमधून झालेली आहे. स्त्रीसुलभ मर्यादाजन्य नैराश्य आणि चिरविरहाच्या निरर्थक अस्तित्वाची भीती याचे धारदार चित्रण झालेले आहे ऊजळी जेठवाला म्हणते :

' तुझ्याखेरीज कस रहायचं ? बंधन तुटल्यास रानातल्या हरणालादेखील जिवंत रहावंसं वाटणार नाही.

मानसरोवराचं पाणी यथेच्छ प्यायल्यावर लहान डबक्याच्या घाण पाण्याने कोणाची तहान कशी भागेल ?

उच्च आहे ते हाती लावण्यापलीकडचे आहे आणि हीन आहे ते मान्य होण्यासारखे नाही. उद्ध्वस्त करून टाकणाऱ्या या कचाटीत माझं आयुष्य वाया गेल आहे देवतेचे खरे मंदिर शोधण्यात मी अपयशी झाले आणि रिकाम्या देवालयात आराधना करण्यात आयुष्य वाया घालवल.

पाणी सगळे एकच, तसेच सर्व माणसे सारखीच. भेदभाव विसर माझ्या जिवलगा आणि ये, सखया, माझी प्रेमाची तहान भागवण्यासाठी वर्षणाऱ्या मेघासारखा ये. जलधरांनी चहूबाजूनी पृथ्वी वेढून टाकली आहे आणि ते मुसळधार वर्षाव करीत आहेत. पण दुर्दैव माझं ! त्यातील एकही थेंब माझ्यासाठी नाही.

तुझ्या वीणेच्या तारा झंकारून प्रेमसंगीताने तू मला मारून टाकल आहेस. माझ्याकडे पहा, तुझ्या गोड गुणाची मला किंमत आहे, तुझ्या जातीची मला चिंता नाही.

शेणी बीजानंदच्या कथेवरील सुमारे ८० पदे वेगवेगळ्या हस्तलिखितामध्ये उपलब्ध आहेत. ती १८ व्या शतकात किंवा त्यानंतर लिहिलेली असावीत प्रारंभी ती १६ व्या शतकात रचलेली असण्याची शक्यता आहे कथा खालीलप्रमाणे आहे :

बीजानंद नावाचा एक गरीब चारण वीणा वाजवण्यात निपुण होता. वेदा नावाच्या श्रीमंत चारणाची तरुण मुलगी शेणी नेहमी त्याची वीणा ऐकत असे. हळूहळू दोघाचे एकमेकावर प्रेम बसले. बीजानंदने शेणीला लग्नाची मागणी घातली वेदाने ती मान्य केली पण एका अटीवर. चंद्रासारखे ठिपके संपूर्ण काळ्या शरीरावर असलेल्या १०१ म्हशी बीजानंदने वेदाला वर्षाच्या आत द्यावयाच्या. ठरलेल्या काळात बीजानंद अट पुरी करू शकला नाही. शेणीने बीजानंदशीच लग्न करण्याची प्रतिज्ञा केलेली होती. ठरलेल्या काळाच्या अखेरीस जेंव्हा बीजा परत आला नाही तेव्हा निराश होऊन शेणी हिमालयात निघून गेली. हिमालयाच्या बर्फात गोठून जायचे तिने ठरवले बीजा परत आला, शेणी हिमालयात निघून गेल्याचे त्याला कळले तेव्हा तोही तिच्या पाठोपाठ गेला बीजा जेव्हा हिमालयात पोहोचला तेव्हा शेणी मृत्यूशय्येवर पडलेली होती. परत जाण्यासाठी तिचे मन वळवायचा बीजाने प्रयत्न केला. पण शेणीने नकार दिला. तिच्या अखेरच्या श्वासापर्यंत वीणा वाजवायची विनंती तिने बीजाला केली बीजा वीणा वाजवत राहिला आणि शेणीची प्राणज्योत मालवली. बीजाला वेड लागलं. तोही मग फार दिवस जगला नाही

शेणीच्या बीजावरील एकनिष्ठ, अपार प्रेमाचे मोठे तीव्र व कारूण्यपूर्ण वर्णन केलेले आहे बीजाच्या प्रेमाखेरीज शेणीला सारे काही तुच्छ वाटते. प्रियकराच्या भक्तीसाठी वाटेल ते रुप घ्यायची तिची तयारी आहे. शेणी म्हणते :

' लाल बांगड्यांनी नटलेल्या माझ्या या गुलाबी हातांचा काय उपयोग, जर ते बीजाच्या गळ्याभोवती टाकता आले नाहीत तर ?

एक संपूर्ण वर्ष उलटलं आणि जलधरानी परत येऊन पृथ्वीला हिरवा तजेला दिला. फक्त शेणीच काय ती सुकलेली दिसत आहे कारण बीजानंद परत आलेला नाही.

देवा ! बीजा जाणार असणाऱ्या वाळवंटातील मार्गावरची बावडी (पायऱ्यांची विहीर) मला कर, म्हणजे कपडे धुण्यासाठी तो त्या विहिरीच्या पायरीवर एक पाय ठेवील.

देवा ! बीजाच्या वाटेवरील निंबाचा वृक्ष मला . कर म्हणजे त्याच्या गार सावलीत त्याला त्याचा उंट चरायला सोडता येईल

बीजानंदला कळविण्यासाठी शेणी हिमालयाला एक निरोप देते, " अरे बीजानंदा ! हिमालयातील सरोवराच्या काठी मृत शेणीचा पाहुणा म्हणून ये. " '

वीजानंद परत येतो तेव्हा क्षणोक्षणी मृत्यू जवळ येत असल्याचे जाणवून ती निराशेने त्याला म्हणते, " माझ जवळ जवळ सार शरीर गारठून गेल आहे. तुझ्याबरोबर परत जाण आता मला अशक्य आहे. अरे वीजानंदा ! तुला निराश होऊन परत जाव लागेल "

नागजी–नागवती (नागमती)च्या कथेच्या पारंपरिक मौखिक रूपात काही विषयगत फरक आढळतो विभिन्न हस्तलिखितामध्ये उपलब्ध मजकुरातही असे परिवर्तन आढळते. १८ व्या शतकात किंवा त्यानंतर लिहिलेल्या हस्तलिखितामध्ये अदाजे ५० पदे उपलब्ध आहेत. त्यांपैकी काही पदांचा रचनाकाल १६ व्या शतकापर्यंत मागे नेता येतो. काही पदांमध्ये नायिकेचे नाव सुगना असे दिलेले आहे. कथा थोडक्यात अशी आहे :

नागजीचे नागमतीवर प्रेम बसते. नागजीची वहिनी त्या दोघांचे गुपचूप लग्न लावून देते. नागमतीच्या वडिलांना या लग्नाची काहीच माहिती नसल्याने नागमतीचे पूर्वी ज्याच्याशी लग्न ठरलेले असते त्याच्याशी ते तिचे लग्न लावून देतात. काही दिवसांनी नागजी नागमतीला भेटायला येतो. तिचे दुसऱ्या माणसाशी लग्न झाल्याचे पाहून त्याला भयंकर दुःख होते. तो नागमतीला सोडून जातो व 'आत्महत्त्या' करतो. नागमती नागजीला शोधत येते नागजी मरण पावल्याचे तिला आढळते. ती नवऱ्याबरोबर सासरी जायला निघते. सासरची वाट स्मशानाजवळून होती तेथे नागजीची चिता जळत होती. नागमतीला दु.खावेग आवरेना. ती बैलगाडीतून उतरली आणि नागजीच्या धगधगत्या चितेत तिने स्वतःला झोकून दिले. तिनेही स्वतःला जाळून घेतले.

नागजीचे, तिच्या खऱ्या नवऱ्याचे, मृत शरीर सापडल्यावर नागमतीला जे दुःख होते त्याच्या चित्रणात आणि तिच्या प्रियकर पतीने तिच्या वियोगापेक्षा मरण पत्करले हे जाणल्यावर तिला जो अश्रुपूर्ण शोक होतो त्याच्या वर्णनात काव्याचे मर्म आहे.

नागजी रागावून निघून गेला असे वाटून नागमती त्याच्या पाठोपाठ जात म्हणते :

' माझ्याकडून प्रेम खेचून घेण्याच्या बाबतीत वाटल्यास तू बंजाऱ्यासारखा घेणेकरी हो, पण सखया ! माझ्याशी असलेली तुझी नेहमीची चाल तोडू नकोस.

अरे नागजी ! माझ्या बोलण्याला तू काहीच उत्तर देत नाहीस. प्रियकरा लक्षात ठेव ! नंतर मग मी प्रतिसाद द्यावा म्हणून तुला काकुळतीने विनवणी करावी लागेल. '

नागजींच्या चितेपाशी उभी राहून ती म्हणते :

' अरे नागजी ! किशोरावस्थेतील प्रेम कदाचित सुप्त राहील, पण कधीही नाहीसे होणार नाही, जसे नागवेल कदाचित फुले देणार नाही, पण बहर काही संपत नसतो '

बींझा-सोरठची कथा सांगणारे ४१ पदे असलेले सर्वांत प्राचीन उपलब्ध हस्त-लिखित १६६१ चे आहे याखेरीज अंदाजे ७५ पदे अन्य वेगवेगळ्या हस्तलिखिता-मध्ये आढळतात. मूळ कृती १६ व्या शतकाच्या प्रारंभीची असावी काही जुन्या दोहृयांवरून नायिका सोरठचे खरे नाव सोनल असावे असे वाटते : 'राव खेंगारने सोनल व बींझाना आलिंगनबद्ध अवस्थेत पाहिले. त्याने राग आवरला आणि त्या दोघांना कापडाने झाकून टाकले'.

कथेचे पाठभेद आढळतात. लोकप्रिय राजस्थानी कथा अशी आहे :

सोरठ नावाच्या सुंदर तरुण स्त्रीचे पहिल्यांदा भटक्या जातीच्या श्रीमंत राजा रूरशी लग्न झाले होते. गिरनारच्या राव खेंगारने त्याला द्यूत खेळायला बोलावले. राव अगोदरच सोरठच्या सौंदर्यावर मोहित झालेला होता आणि तिला मिळव-ण्याची त्याची अभिलाषा होती. द्यूतामध्ये रूर पत्नी सोरठसकट सर्व काही हरला. खेंगारचा एक नातेवाईक बींझा सोरठला रावच्या राजवाड्याकडे घेऊन येताना स्वतःच तिच्या प्रेमात पडला तो सोरठला चोरून भेटू लागला. एकदा खेंगारने त्या दोघांना पाहिले. परिणामी त्याने बींझाला हद्दपार केले. बींझाने पाटणच्या नबाबाची मदत घेतली युद्धात खेंगार मारला गेला. पण सोरठ काही बींझाला मिळू शकली नाही. कारण नवाब तिला घेऊन गेला. बींझा सोरठशिवाय जगू शकला नाही तो मरण पावला. सोरठ कशीबशी बींझाच्या चितेपाशी पोहोचली आणि पुढील जन्मी तरी त्याच्याशी मीलन होईल या आशेने तिनेही देहत्याग केला.

सोरठची तिच्या प्रियकराविषयीची अभिलाषा, प्रेम व दु:खाच्या तिच्या भावना, तिची करुण मन:स्थिती या सर्वांचे पदामध्ये स्पष्ट, मोकळेपणाने वर्णन केलेले आहे. सोरठच्या लावण्याचे कवीने सुरेख चित्रण केले आहे :

' किल्ल्यातील राजवाड्यातून सोरठ खाली येते. तिच्या पायातील पैंजणाचा मधुर नाद होतो आणि तिच्या पावलांनी गिरनारचे कोट कगूरे भावनातिशयाने कंप पावतात. सोरठ ! सुकेशरचना केलेली सौंदर्यखनी, चंद्राकडे पाहू नकोस, नाही तर चंद्र मूर्च्छित होईल आणि सधिप्रकाश लोपून जाईल. '

सोरठ बींझासाठी तळमळते .

' बींझाला मी सज्जात भेटले आणि त्याच्या आलिंगनासाठी मी आतुरले बींझा, लाडक्या, मी दुसऱ्या कोणासाठी राणी असेन पण तुझ्यासाठी मात्र मी तुझ्या पायांची धूळ आहे. '

जलाल-बूबनाच्या कथेवरील सुमारे ११० दोहे उपलब्ध आहेत. १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात व १७ व्या शतकाच्या प्रारंभी बहुधा ते रचले गेले असावेत. कथा थोडक्यात अशी आहे '

थट्टा भाखरचा बादशहा मृगतमायची याची बहीण गाहणी हिचे बलखचा राजा कुलनहसीब याच्याशी लग्न झाले होते. कुलनहसीबची राजधानी गजनीपूरला होती. कुलनहसीबच्या मृत्यूनंतर जहागीरदारांनी राजधानीत बंड केले तेव्हा गाहणी आपल्या दोन मुलांना घेऊन थट्टा भाखरला परत आली. त्या दोन मुलांपैकी जलाल, बादशहा मृगतमायचीचा विशेष लाडका होता. सिंध समुद्रचा बादशहा भंवर याला दोन मुली होत्या – मूमना आणि बूबना. मूमनाचे मृगतमायचीशी आणि बूबनाचे जलालशी लग्न लावून देण्याची भवरची इच्छा होती. पण जलालशी वाङ्निश्चय झालेल्या बूबनाशी लग्न करायची खुद्द मृगतमायचीला इच्छा झाली आणि काझीला लाच देऊन त्याने आपली इच्छा पूर्ण केली अशा प्रकारे जलालचे मूमनाशी लग्न झाले आणि बूबना जलालची बायको व्हायच्या ऐवजी त्याची मामी झाली. पण त्यामुळे त्यांच्या प्रेमात खंड पडला नाही. उलट ते अधिकच वाढले. त्यांच्या चोरून नेहमी भेटीगाठी होत राहिल्या तरी उघडपणे ते कधीही एकत्र येऊ शकले नाहीत आणि दु:खातच त्यांचा अंत झाला.

मौखिक परंपरेतील कथा अशी दु:खान्त आहे. पण लिखित स्वरूपातील कथेत मात्र शिवपार्वती जलाल बूबनाला कबरीतून पुन्हा जिवंत करतात कथा सुखान्त करण्यासाठी नंतर हे परिवर्तन करण्यात आले असावे. मुस्लिम प्रेमीजनांना शिवपार्वती जीवदान देतात यावरून दोन्ही धर्मांच्या लोकांना परस्पराबद्दल त्या काळी आदर होता हे सूचित होते. लिखित स्वरूपातील कथेत प्रेमाचा विषय अन्य प्रेमकथांपेक्षा वेगळ्या पद्धतीने हाताळला आहे. इथे प्रेमाला शारीरिक आकर्षणाने सुरवात होते आणि त्यातून कामेच्छु विलास व लैंगिक समाधान निर्माण होते त्यानंतर प्रेम हे जीवन व मृत्यूचा निर्णय करणारे एकमेव कारण राहते. शृंगाराच्या संयोग व वियोग दोन्ही बाजूंची असामान्य मोकळेपणाने दखल घेतलेली आहे. अधूनमधून कारुण्याच्या छटाही आहेत. कथेच्या पारंपरिक मौखिक रूपात कोणतेही अलौकिक तत्त्व नाही. प्रेमीजन दैवापुढे हात टेकतात.

जलाल म्हणतो :

'मी माझे जीवन व आत्मा माझ्या प्रिय व्यक्तीला तारण देऊन टाकला आहे. जर मी जिवंत राहिलो तर तिच्या भेटीचा आनंद लाभ मला होईल. जर मी (युद्धात) मरण पावलो तर मला स्वर्ग लोक लाभेल.'

बूबना म्हणते :

'प्रियकरावरील माझे अपार प्रेम कोणत्याही पत्रातून व्यक्त करता येणार नाही माझे प्रेम सागरासारखे अमर्याद आहे पत्राच्या कक्षा लहान डबक्यासारख्या आहेत. त्यात ते कसे सामावणार ?

प्रेम गुप्त शत्रूसारखे असते. त्याचा ससर्ग कोणालाही न होवो. ज्वाळा आणि धूर न दिसताच ते सुंदर शरीर जाळीत राहते

माझे शरीर घरात पडलेले असते पण माझा आत्मा मात्र माझ्या प्रियकरापाशी उडून जातो माझे हृदय काळजीने जळते. दूर असलेल्या जिवलगा ! वेलीखेरीज फुलल्यासारख्या वाटणाऱ्या फुलासारखा तू आहेस.'

भेट झाल्यावर जलाल जेव्हा बूबनाचा निरोप घेऊ लागतो तेव्हा ती म्हणते :

'तुला 'जा' म्हणून सागायला माझी जीभ धजत नाही. पण तू कोठेही असलास तरी माझे अत करण तुझे शुभचिंतनच करते तू दूर असलास की सर्व सुखे मला सोडून जातात. तू आलास म्हणजेच फक्त माझा आनद परत येतो.'

## छन्दःशास्त्र, अलंकारशास्त्र व शब्दकोश

राजस्थानी भाषेत छन्द शास्त्रावर अनेक ग्रथ लिहिलेले आहेत. त्यापैकी काहींमध्ये अलंकारशास्त्र व शब्दकोशही सामावलेले आहेत.

छन्दःशास्त्रावरील सर्वांत प्राचीन उपलब्ध ग्रथ आहे– पिंगल सिरोमणी. जैन कवी कुशल लाभने तो लिहिला असे म्हणतात त्याचा आम्ही मागे उल्लेख केला आहेच

चारण जोगीदास कुंआरिया (१६१३–१६८३ अंदाजे) याने १६६४ मध्ये हरि पिंगल प्रबंध रचला. आपला आश्रयदाता प्रतापगडचा महारावत हरिसिंह (१६२८–१६७३) याच्या आग्रहावरून त्याने तो रचला. तीन प्रकरणांमध्ये तो विभागलेला आहे. पहिल्या प्रकरणाचे विषय आहेत– काव्य प्रयोजन, गुरु, लघु-गण, प्रस्तारचे स्पष्टीकरण, मात्रा वृत्ताची नावे व लक्षणे, काव्यदोष इ दुसऱ्या प्रकरणात वर्णवृत्तांचे विवरण, त्यांचे प्रकार व लक्षणे दिलेली आहेत दंडक वृत्ताविषयी सागितल्यावर २२ प्रकारांच्या डिंगल गीताचा खुलासा केलेला आहे तिसऱ्या प्रकरणात हरिसिंहाच्या वंशावळीचे, त्याच्या विशेष गुणाचे व कार्यांचे तसेच पठाणांशी त्याने केलेल्या लढायांचे वर्णन आहे. ग्रथाला हरिसिंहाचे नाव दिलेले आहे. जोगीदास प्रज्ञावंत कवी होता शिवाजी मराठ्यावरील त्याचे डिंगल गीत स्फूर्तिदायक आहे

पिंगल प्रकाश, लखपत पिंगल आणि हमीर नाम मालाचा लेखक आहे चारण हमीरदान रतनू (१८ व्या शतकाचा पूर्वार्ध). पिंगल प्रकाश १७११ मध्ये लिहिलेला आहे त्याचे दोन भाग आहेत– एक मात्रा वृत्तावरील व दुसरा वर्ण वृत्तावरील त्यात ७१ प्रकाराचे छप्पय, २३ प्रकारचे दोहे अणि २६ प्रकारच्या गाथा, ईशप्रार्थनेच्या काही उदाहरणासह दिलेल्या आहेत लखपत पिंगल चार प्रकरणामध्ये विभागलेला असून त्यात विविध प्रकारची वृत्ते, २६ प्रकारच्या गाथा, २४ प्रकारची डिंगल गीते, अष्ट प्रत्यय इत्यादी दिलेले आहे गीते बहुतेक कवीचा आश्रयदाता लखपत याची प्रशंसा करणारी आहेत हमीर नाम मालेत ३११ पदे आहेत. पर्यायवाची शब्दाचा, विशेषतः साहित्यिक राजस्थानी शब्दाचा, तो शब्दकोश आहे.

मनसाराम (मांच्छ कवी) (१७७०–१८३३) याने १८०६ मध्ये रघुनाथ रूपक गीता रो रचले या ग्रंथाला त्यातील आटोपशीरपणा, स्पष्टता आणि पद्धतशीर मांडणी यांमुळे लोकप्रियता लाभली. मांच्छ हा जोधपूरच्या महाराजा मानसिंहाच्या मर्जीतला होता. ग्रंथ ९ विलासामध्ये विभागलेला आहे पहिल्या दोन विलासाचे विषय आहेत— लघु, गुरु, वर्ण, गण, दग्धाक्षर, वयण सगाई (अनुप्रास), काव्य दोष, उक्ती आणि तिचे प्रकार, रस आणि त्याची लक्षणे इत्यादी बाकीच्या सात विलासांमध्ये मुख्यतः डिंगल गीताचे ७२ प्रकार, गद्य शैली, दवावैत आणि वचनिका, जथा, नीसाणी आणि कुंडलिया वृत्ते, त्याची लक्षणे व उदाहरणे या सर्वांचे विवरण केलेले आहे. संपूर्ण रामकथा उदाहरणामधून या सात विलासामध्ये सांगितलेली आहे हे लक्षणीय आहे. उदाहरणाचा भाग रसाळ निवेदनात्मक काव्याचा असून रामकाव्याच्या परंपरेत महत्त्वाचा आहे. त्याच्या अन्य काव्याचा घाणेराव की गझलचा उल्लेख मागे केलेला आहेच

आढा किसना द्वितीय याने बहुतेक साहित्य १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात लिहिले. त्याचे रघुवर जस प्रकास हे लक्षण काव्य १८२४ मध्ये लिहिलेले आहे. हा आणखी एक संशोधनात्मक प्रबंध असून पाच भागामध्ये विभागलेला आहे. पहिल्या भागात गण, दग्धाक्षर, लघु, गुरु, वर्ण इत्यादींचे स्पष्टीकरण आहे दुसऱ्यात २२४ मात्रा वृत्ते, दवावैतसह गद्य शैली, डिंगल गीताशी संबधित वचनिका आणि चित्र काव्य हे सर्व दिलेले आहे. तिसरा भाग छप्पयचे वेगवेगळे प्रकार आणि ११७ वर्ण वृत्ताविषयी आहे चौथ्या भागात डिंगल गीतांचे ९१ प्रकार, त्याची आवश्यक लक्षणे, उदा. वयण सगाई, उक्ती, जथा, दोष, रचनेचे नियम, इत्यादींचे विवेचन केलेले आहे अखेरच्या भागात नीसाणीचे १२ मुख्य प्रकार, त्याचे ३४ विभाग आणि कडखा या मात्रा वृत्ताचे स्पष्टीकरण आहे. या विषयाचे विवेचन करताना कवीने राम महिमाही वर्णिलेला आहे, यास्तव ग्रंथास

हे नाव दिलेले आहे. गद्य व पद्यात केलेले विवरण स्पष्ट आहे छप्पय, गीत, त्याची चिन्हे व नीसाणी यावर टाकलेला प्रकाश हे या ग्रथाचे वैशिष्टय आहे. या विषया-वरील अन्य ग्रंथाचाही किसनाने संदर्भ दिलेला आहे, उदा लखपत पिंगल, हरि पिंगल आणि रघुनाथ रूपक

मेवाडच्या महाराणा भीमसिंहाचा किसना आवडता होता. महाराणाने याला सिसोदा गाव बक्षीस दिले होते. महाराणाच्या आग्रहावरून १८२२ मध्ये किसनाने भीम विलास रचले. त्यात महाराणाची वंशावळी, जीवन व राज्य-व्यवस्था याचे तपशीलवार वर्णन केले आहे. ते उत्कृष्ट काव्य तर आहेच, शिवाय ऐतिहासिक दृष्टयाही महत्त्वाचे आहे. कविराजा श्यामलदासाने वीर विनोद लिहिताना भीम विलासचा कित्ता गिरवला आहे. तो बहुतांशी पिंगलमध्ये लिहि-लेला असल्याने आपल्या, या इतिहासाच्या कक्षेबाहेर आहे. समकालीन व्यक्तीवर, उदा. महाराणा भीमसिंह, जोधपूरचा महाराजा मानसिंह आणि रतलामचा महा-राजा बलवतसिंह याच्यावर लिहिलेली त्याची स्फुट डिंगल गीते ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाची आहेत.

उदयराम गूंगाचा कविकुल बोध हा देखील या परपरेतील एक विचारणीय ग्रंथ आहे. दहा तरगामध्ये तो विभागलेला असून विषय आहेत— गीत, त्यांचे प्रकार व जथा, शस्त्रास्त्रे व हत्यारे, डिंगल व पिंगलमधील सवाद, उक्ती, रस, अवधान माला, एकाक्षरी नाममाला आणि अनेकार्थी नाममाला. अखेरच्या तीनांमध्ये पर्यायवाची शब्दाची व एकावयवी शब्दांची यादी दिलेली आहे. उदय-रामने डिंगल गीतांचे ८४ प्रकार, उक्तीचे १८ प्रकार, जथांचे २१ प्रकार इत्यादींचे पद्धतशीरपणे स्पष्टीकरण केलेले आहे उदयराम थबूकडा गावचा होता जोधपूरच्या महाराजा मानसिंहचा (१७८२–१८४३) तो समकालीन होता. कच्छ-भूजचा राजा भारमल व त्याचा मुलगा देसलजी याच्या तो मर्जीतला कवी होता. स्पष्टीकरणात त्याने देसलजीची प्रशंसा केलेली आहे.

या क्षेत्रात मोलाची भर घालणारे अन्य महत्त्वाचे ग्रंथ व त्यांचे लेखक आहेत— जोधपूरच्या हरिकिसनचे रूप-दीप पिंगल, मोगडाच्या सिढायच हरदानचे छंद दिवाकर, बूंदीच्या कविराजा मुरारिदानचे डिंगल कोष, राजकोटच्या दीवान रणछोडदासचे रण पिंगल (तीन भाग), सेवापुराच्या कविया हिंगलाजदानचे प्रत्यय पयोधर आणि कडियाँच्या सावलदान आसियाचे महाभारत रूपक. डिंगल कोष हा मुख्यतः पर्यायवाची शब्दाचा कोष आहे. पण डिंगल गीताच्या पंधरा प्रकारांचेही त्यात विवेचन केलेले आहे. नागराज डिंगल कोष हा पर्यायवाची शब्दाचा आणखी एक कोश आहे.

## गद्य

प्राचीनता, अखंडता, विविधता, व्याप्ती आणि लालित्य या दृष्टीने राजस्थानी गद्य-साहित्य समृद्ध आहे. गद्याचे पुढील विभाग करता येतील— (१) धार्मिक (२) ऐतिहासिक (३) अभिजात आणि (४) संकीर्ण : यात अनुवादाचाही समावेश होतो.

### धार्मिक गद्य

जैनांचे धार्मिक गद्य लेखन, विशेषत. बालावबोध आणि टब्बा या रूपातील गद्य महत्त्वाचे आहे संस्कृत व प्राकृत धार्मिक ग्रंथाचा खुलासा करण्यासाठी ते लिहिलेले आहेत

बालावबोधमध्ये मुख्य मुद्दा विशद केलेला असतो सामान्य वाचकाला तो समजण्यासारखा करण्यासाठी त्यात संदर्भाच्या लोकप्रिय कथा दिलेल्या असतात. मूळ विषय समजण्यासाठी सहाय्यक म्हणून या कथा लक्षणीय आहेत. शिवाय गद्याची उदाहरणे त्यातून मधून मधून पुरविली जातात. भाषेच्या विकासाचे अध्ययन करण्यासाठी त्यातून सामग्री मिळते.

टब्बामध्ये बहुधा शब्दाचे अर्थ किंवा शब्दशः अनुवाद दिलेला असतो

गद्याचे सर्वांत प्राचीन उपलब्ध नमुने म्हणजे जैनांचे साहित्य होय. ताडपत्रावर १२७३ मध्ये लिहिलेला 'आराधना' हा गद्याचा सर्वात प्राचीन नमुना आहे. अशा प्रकारची आणखी काही उदाहरणे आहेत— नवकार व्याख्यान (१३०१), सर्व तीर्थ नमस्कार स्तवन (१३०२) आणि अतिचार. धार्मिक बाबींवरील या लघु टीपा असून विशिष्ट पारिभाषिक शब्दांचा वापर केलेला आहे

प्रौढ व ओघवत्या गद्याचे नमुने, तरुण प्रभ सूरीने १३५४ मध्ये लिहिलेल्या षडावश्यक बालबोधमध्ये पहिल्यादाच उपलब्ध होतात. संदर्भादाखल दिलेल्या अनेक कथा ललित गद्याचे सुंदर नमुने आहेत. याच शैलीत त्या नंतरच्या कालात १९ व्या शतकापर्यंत शेकडो कथा सतत लिहिल्या गेल्या.

माणिक्यचंद्र सूरीने १४२१ मध्ये, सयमक गद्यात पृथ्वीचंद्र चरित्र (वाग्विलास) लिहिले ती अद्वितीय वर्णनात्मक कृती आहे. पैठणपूर पाटणचा राजा पृथ्वीचंद्र आणि अयोध्येचा राजा सोमदेव याची कन्या रत्नमंजरी यांच्या प्रेमाची ती कथा असली तरी तिचा मुख्य उद्देश नावावरून सूचित होतो त्याप्रमाणे, वस्तू व आजूबाजूच्या वातावरणाचे चित्रमय व आलंकारिक वर्णन करणे हा आहे. स्थळ, ऋतू, नद्या, पर्वत, राने, दरबार, सैन्य, हत्ती, घोडे, युद्धे, लग्ने इत्यादींचे सजीव चित्रण केलेले आहे. निसर्ग व ऋतूचे वर्णन निवडक उपमा व भाषाशैलीत बारीक

तपशिलासह केलेले आहे. अन्य कित्येक लेखकानी हीच परपरा आणखी समृद्ध केली. सभा शृंगार आणि वर्णकसमुच्चय (२ भाग) या नावाने अशी वर्णने अनुक्रमे नागरी प्रचारिणी सभा आणि एम एस. युनिव्हर्सिटी, जी. ओ एस. बडोदा यानी प्रकाशित केली जाहेत.

तेरापथ (श्वेतांबर) सप्रदायाचा चौथा आचार्य जीतमलजी (जयाचार्य) (१८०३–१८८१) हा कदाचित १९ व्या शतकातील सर्वात मोठा कथालेखक असावा त्याने असख्य कथा लिहिल्या.

धार्मिक गद्य रचनेखेरीज कित्येक ऐतिहासिक व ललित कलाकृती १५ व्या शतकाच्या पूर्वार्धात लिहिल्या गेल्या. या बाबतीत १४३० ते १४३५ च्या दरम्यान कधीतरी रचलेली अचलदास खीची री वचनिका ही सर्वप्रथम कृती होय. मनोहारक सयमक गद्याचे उतारे त्यात आढळतात. आपण त्याचा मागे विचार केला आहेच.

## ऐतिहासिक गद्य

पथ, गुच्छ, आचार्य, जात किंवा घराणे इत्यादीच्या जैन बखरी इतिहासासाठी महत्त्वपूर्ण असल्या तरी त्यात साहित्यिक गुण नगण्यच असतात. अशा प्रकारच्या अन्य साहित्यकृतीच्या बाबतीतही हेच म्हणता येईल.

ऐतिहासिक व शौर्यात्मक गद्य विपुल लिहिलेले आहे. इतिहास, संस्कृती व साहित्याच्या दृष्टीने ते महत्त्वाचे आहे, शिवाय ते विविध प्रकारमांध्येही उपलब्ध आहे, उदा. (१) वंशावली (२) पीढियावली (३) पट्टावली (४) ख्यात (५) वात किंवा बात (६) विगत (७) हकीगत (८) हाल (९) वचनिका (१०) दवावैत पहिले तीन वशावळीच्या स्वरूपाचे आहे ख्यातमध्ये इतिहास व वशावळी असते. सामान्यत: त्यात सबधित वृत्तात व वर्णने असतात. वात म्हणजे कथा त्यात एखाद्या व्यक्तीचे, घटनेचे, समाजाचे, सन्दर्भाचे, इत्यादी वर्णन किंवा थोडक्यात इतिहास असतो. विगतमध्ये एखाद्या जागेची, वस्तूची, इत्यादी माहिती असते या क्षेत्रात मुहणोत नैणसी (१६१०–१६७०) (तीन भागांमध्ये प्रकाशित) विरचित मारवाड या परगणा री विगत हा महत्त्वाचा टप्पा आहे. मारवाड राज्याचे ते सर्वेक्षण व स्थलवर्णनकोश आहे. हकिगत आणि हाल (साखला दहियां सू जागलू लियो तैरो हाल, पातसाह औरगझेब री हकीगत इ )मध्ये एखाद्या घटनेचे तपशीलवार वर्णन असते. वचनिका आणि दवावैतमध्ये पदे आणि सयमक गद्याचे उतारे असतात. गाडण शिवदास लिखित अचलदास खीची री वचनिका, खिडिया जग्गाने लिहिलेली वचनिका राठौड रतनसिंघजी महेसदासौत री आणि जयचंद जतीची माताजी री वचनिका या सुप्रसिद्ध आहेत काही उल्लेखनीय दवावैत आहेत- भाट मालीदासाची

दवावैत नरसिंघदास गौड की, द्वारकादास दधवाडियाची महाराजा अजितसिंघ की दवावैत, आणि सिंढायच दयालदासची महाराज रतनसिंघजी की दवावैत. काही वेळा ख्यात, वात आणि वंशावळीतसुद्धा स्पष्ट फरक करणे कठीण जाते. ही सर्व वर्णनात्मक, कथात्मक किंवा माहितीपर असतात अशा साहित्यकृतीमध्ये काही वेळा जिवत व हृदयाला हात घालणारे वर्णन आढळते.

सर्वांत प्राचीन उपलब्ध ख्यात आहे राठोडा री वसावली सीहैजी सू कल्याण मलजी ताई. ही १५७३ च्या सुमारास लिहिलेली असावी लेखक मात्र ज्ञात नाही वंशावळी नाव दिलेले असले तरी वस्तुतः ही ख्यात आहे अकबराच्या काळापासून ख्यात लेखनाची पद्धत लोकप्रिय झाली होती. बहुतेक सर्व राजे, फार काय जहागीरदार व ठाकुरानीदेखील त्याच्यावर ख्यात लिहून घेतल्या होत्या. या बाबतीत वैयक्तिक प्रयत्नदेखील झाले होते. मुहणोत नैणसी ( १६१०–१६७० ), आसिया बाकीदास ( १७८१–१८३३ ), आणि सिंढायच दयालदास ( १७९८–१८९१ ) यानी लिहिलेल्या ख्यात विख्यात व लोकप्रिय आहेत. या सर्वांनी विशेषतः पहिली व तिसरीने, इतिहास, संस्कृती व साहित्यात मोलाची भर घातली आहे. लेखनाचा उच्च दर्जा, ओघवती भाषा आणि काही वेळा ललित राजस्थानी गद्य यांचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे नैणसी व दयालदास याच्या ख्यात होय. कित्येक कवींची उपयुक्त माहिती आणि ज्ञात व अज्ञात काव्यांचे नमुने त्यातून मिळतात. बादर ढाढीच्या नीसाणीचे (वीरमायण) प्राचीनत्व आणि गाडण पसायत, खिडिया चानण, वगैरे प्रारंभीच्या चारण कवीचा काल निश्चित करण्यात किंवा एखाद्या मतास पुष्टी देण्यास नैणसीची ख्यात उपयुक्त आहे. या दृष्टीने त्याने लिहिलेली 'मारवाड रा परगणा री विगत' देखील तितकीच महत्त्वाची आहे. नैणसीची ख्यात म्हणजे मध्य-युगीन राजपूत व राजस्थानचा इतिहास याचे भांडार आहे बांकीदासच्या ख्यात-मध्ये असंख्य ऐतिहासिक व अन्य विषयावरील स्फुट व संक्षिप्त टीपा आहेत. नैणसीच्या ख्यातप्रमाणेच दयालदास – रचित ख्यातही महत्त्वाची आहे. त्यात राठोडांचा इतिहास, विशेषतः बीकानेर घराण्याचा, दिलेला आहे त्याचे अन्य दोन ग्रंथ 'देशदर्पण' आणि 'आर्याख्यान कल्पद्रुम' हे देखील ऐतिहासिक दृष्टीने महत्त्वाचे आहेत

आणखी एक महत्त्वाची ऐतिहासिक कृती आहे दलपत विलास. १६०० च्या सुमारास कोणा अज्ञात लेखकाने तो लिहिला. त्यात बीकानेरच्या राजा रायसिंहाचा पुत्र दलपतसिंह (१५६४ – १६१३) याच्या प्रारंभीच्या जीवनाचे वर्णन आहे. तदनुषंगाने अन्य निवेदनेही त्यात केलेली असून मोगल दरबाराचे मनोवेधक ओझरते दृश्य त्यातून दिसते उपलब्ध हस्तलिखित अपूर्ण आहे, ' अन्यथा उपयुक्तता व रसाळपणा यांच्या बाबतीत अकबर नामा, मुन्तखाब-उल-तवारीख आणि तबाकत

इ-अकबरी यांसारख्या विख्यात इतिहासानाही त्याने मागे टाकले असते.'[1] वाङ्मयीन दृष्टीनेही ते महत्त्वाचे आहे कारण व्यक्तिगत माहितीच्या आधारे त्यात एका समकालीन ऐतिहासिक व्यक्तीचे चित्र रेखाटलेले आहे. १६ व्या शतकातील प्रौढ राजस्थानी गद्याचे ते उत्कृष्ट उदाहरण आहे

## ललित गद्य

वर उल्लेखिलेले वाग विलास आणि अचलदास खीची री वचनिका हे ललित गद्याचे सर्वांत प्राचीन नमुने आहेत. दोन्ही वचनिका शैलीत आहेत.

या क्षेत्रात वात किंवा बात साहित्याचा क्रमांक वरचा लागतो. वात म्हणजे प्रत्यक्षात विशिष्ट शैलीने सांगण्यासाठी असलेल्या कथा. सागणारा व ऐकणारा दोहोमध्ये एक प्रकारचा वैयक्तिक संबध स्थापित होतो. ऐकणाऱ्यापैकी निदान एकाने तरी हुंकार दिलाच पाहिजे वेळ घालविण्याचा त्याचा मुख्य उद्देश असला तरी त्यात भरपूर माहिती असते. त्यात व्यक्तिचित्रण असते (हर राज रैं नैंणा री वात, महाराज पदमसिंघ री वात, हरदास ऊहड री वात, इ.), समाज किंवा समूहाचे वर्णन असते. (भाटियां री वात, बुंदेलां री वात, सांचोर रैं चहुवाणां री वात इ ) आणि घटना, स्थळे व परिस्थितीचे वर्णन किंवा निवेदन असते. (राव बीकै बीकानेर बसायो तै समै री वात, नरवद सत्तावत सुपियार दे लायो तै समै री वात इ.). वातचा खरा आनंद मिळण्यासाठी संपूर्ण वातावरण तसे लागते म्हणजे, सागणाऱ्याचे नैपुण्य, शैली, श्रोत्याची उत्सुकता व वेळ हे सर्व जमून यावे लागते. वाचण्यात त्यातली बरीच गंमत निघून जाते. वात बहुतेक मौखिक परंपरेने, एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे चालत आलेल्या असतात ही परपरा जिवत राहावी यासाठी १७ व्या शतकात व त्यापुढील काळात वात लेखनबद्ध केल्या जाऊ लागल्या त्याचे प्राचीनत्व व लेखक माहित नसतो. खरे म्हणजे त्या लोकसाहित्याचा वारसा असून कालानुसार त्यात बदल होत गेलेला असतो. सर्व प्रकारच्या व आकाराच्या शेकडो वात विभिन्न हस्तलिखितांमध्ये उपलब्ध आहेत. काही प्रमुख वात, उदा. कुंवरसी साखलो, राहब साहब आणि बात बगसीराम पुरोहित हीरां की आणि कित्येक लहान वात प्रकाशित झाल्या आहेत

काही विशिष्ट वात ज्ञात व्यक्तींनी परपरागत रूपात व शैलीत लिहिलेल्या आहेत. उदा. व्यास भवानीदासची राजा भोज री पंदरवी विद्या री बात, महाराजा बहादुरसिंहाची रावत प्रतापसिंघ म्होकमसिंघ हरिसिंघोत री वात, कृपाराम वणसुरची सगुणा सत्रसाल री बात आणि चारण नर्बदची राजा रिसालू री वार्ता. वात, डिंगल गीते आणि दोहे विपुलतेने उपलब्ध आहेत.

---

१. दशरथ शर्मा संपादित दयालदास री ख्यात (भाग II) प्रस्तावना पृ. ५-६

वातचे विषय असतात— शौर्य (कुँवर रणमोल री वात, राजा नरसिंध री वात, राजा भीम री वात इ.), प्रेम (ढोला मारू, जलाल बूबना, मूमल महेंद्र इ.), विनोद (च्यार मूर्खां री वात, खुदाय बावली री बात, फोफानद री बात, पोपांबाई री वात इ.), नीती (गोदावरी तीर रै जोगी री वात, बंधी बुहारी री वात, अकाल री बात इ.), जिज्ञासा (मांधाता री बात, जीजो डाभी री वात, माडणसी कूम्पावत री वात इ.) आणि निर्वेद (रावल मल्लिनाथ पथ में आयी तै री वात, रामदे तंवर री वात इ.).

वातचे कथानक ( १ ) ऐतिहासिक, ( २ ) अर्ध ऐतिहासिक, किंवा (३) काल्पनिक असते. पहिल्यात, वशावळ आणि ऐतिहासिक व्यक्ती वा घटनाचा तपशील दिलेला असतो. मोहिलां री वात आणि राव जोधै रै बेटा री वात या अशा प्रकारच्या वात आहेत. दुसऱ्या प्रकारामध्ये व्यक्ती वा घटना ऐतिहासिक असतात, पण त्या काल्पनिक प्रसगामध्ये व वर्णनामध्ये बसवलेल्या असतात. अशा वात रंजक व मनोवेधक असतात आणि साहित्यकलेच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असतात. तिसऱ्या प्रकारच्या वात, काल्पनिक पात्रे व घटनांवरील असतात. अद्भुताचा भाग त्यात त्या मानाने जास्त व उघड असतो पक्षी व प्राण्यानादेखील यात मानवी गुण असल्याचे दाखविलेले असते. राजा भोज अर खापरै चोर री वात, आणि साहुकार री वात या अशा वात आहेत.

वातची शैली रजक असते. ती निवेदनात्मक असते (पलक दरियाव री वात), वर्णनात्मक असते. (खीची गंगेव नीम्बावत रो बेपोरो), विचारपूर्ण असते (जसनाथ जाट री वात, माघ पिंडत, राजा भोज अर डोकरी री वात इ.) किंवा भावनाप्रधान असते (जैतसी ऊदावत री वात, पीठवै चारण री वात, राजा भीम री वात इ.)

काही वात उत्कृष्ट साहित्यिक रचना असतात. त्यात आटोपशीसरपणा असतो, निवडक शब्दयोजना असते. वर्णन चित्रमय असते, सूचकता व भावनाची गहनता असते. आधुनिक साहित्यात अशा प्रकारचे लेखन दुर्मिळच आढळते. वीझरै अहीर री वात हें याचे एक उदाहरण आहे एक ग्रामीण युवती रात्रीच्या वेळी तिच्या प्रियकराला भेटायला जाते आणि अजाणता त्याला वीरा (भाऊ) सबोधते. लगेच त्या शब्दाचा अर्थ व त्याचे पावित्र्य उमगून, स्वतःच्या सर्व भावनाना दडपून, ती माघारी फिरते

अनेक कथामध्ये म्हणी किंवा उक्ती दिलेल्या असतात किंवा 'म्हणीवर आधारित कथा' असतात. वात साहित्याचे हे अद्वितीय वैशिष्टच होय. कित्येक म्हणींचे उक्तीचे मूळ शोधण्यासाठी या कथा मनोरजक सूत्र पुरवतात. अशा शेकडो कथा प्रकाशित झालेल्या आहेत. त्यापैकी काही उदाहरणे आहेत— मार कै आगै भूत मागै, आगै सैं पाछा भला, मुजरै का मार्या मारां हा, बेह का धाल्या ना टलै, आदमी

कोनी कमावै आदमी को दिन कमावै, तू वेश्या मैं भाड, राम कै घर देर है अंधेर कोनी, बात भली दिन पाधरा, सपत है जथै लिछमी है, तरवार को घाव भर ज्यावै जीभ को घाव कोनी भरै, गड्डू कै बलू[1] इत्यादी म्हणींवरच्या कथा आहेत.

कथा ही वातसारखीच असली तरी ती मुख्यत: धार्मिक व पौराणिक विषया-वर असते. लहान कथा, जसे– वैसाख महातम री कथा आणि काजली तीज री कथा आणि मोठ्या कथा, जसे– राम कथा, या बहुसंख्येने उपलब्ध आहेत त्यातल्या त्यात लहान कथा विपुल आहेत

वातची भाषा बहुधा राजस्थानी व खडी बोली आणि उर्दूचे मिश्रण असलेली राजस्थानी आहे (बहलिमा री वात, राहब साहब इत्यादी). कथा राजस्थानी ब्रज मिश्रित राजस्थानी भाषेत आहेत.

## संकीर्ण

विविध दप्तरे, पत्रे शिलालेख, आठवणी व स्मृती यातून गद्याचे सुंदर नमुने हाती लागतात.

वैताल पंचविंशतिका आणि अशा प्रकारच्या अन्य कथांची राजस्थानी रूपे उपलब्ध आहेत. देईदान नाइताचे वैताल पच्चीसी हे याचे एक उदाहरण होय.

---

१ या म्हणींचा अनुवाद करावा असे कोणाला वाटेल. पण वाङमयाच्या अभ्यासकांना ठाऊक असेल की विशिष्ट शब्दयोजना व त्यात निहित सांस्कृतिक गर्भितार्थ यामुळे म्हणींचा अनुवाद करता येत नसतो.

## प्रकरण चौथे

# लोकसाहित्य

राजस्थानचे लोकसाहित्य इतके समृद्ध, वैविध्यपूर्ण व सजीव आहे की त्याचे सौंदर्य व महत्त्व व्यक्त करण्यासाठी एक वेगळा ग्रंथच लिहावा लागेल. प्रस्तुत इतिहासात त्याचीं स्थूल रूपरेषाच काय ती देता येईल त्याचे खालीलप्रमाणे विभाग करता येतात : (१) लोकगीत (२) लोकगाथा (३) लोककथा (४) लोकनाट्य व लोक सुभाषित– यात म्हणी, वाक्प्रचार, सुभाषिते याचा समावेश होतो.

### (१) लोकगीते

लोकगीतामध्ये मानवाच्या भाव-भावनाची अभिव्यक्ती असते. जीवनाच्या धार्मिक व इतर पैलूंशी त्याचा सबध असतो. धार्मिक कृत्ये, पूजा, जागरण, इ. विषयीची गीते धार्मिक असतात. विशिष्ट प्रसग, घटना व मानवी जीवनाच्या अन्य बाबीशी सबधित गीतांहून ती वेगळी असतात. अनेक विद्वानांनी असख्य लोकगीते प्रकाशित केली आहेत.

धार्मिक गीतांच्या बाबतीत महत्त्वाची उल्लेखनीय गोष्ट म्हणजे त्याचे मूळ व परंपरा एकीकडे निर्गुण धर्तीची 'सबद' आणि सगुण पद्धतीची 'भजन' किंवा 'हरजस' नावाने ओळखली जाणारी गीते, गोरख, भरतरी, कबीर, हरजी भाटी, रूपांदे, मीरांबाई, चंद्रसखी, बख्तावर, तुलसीदास व इतर संताच्या नावावर प्रचलित असल्याचे आढळते. या विख्यात संताचे किंवा सबद लेखकांचे नाव असलेली ही सर्व लोकप्रिय गीते वा पदे त्याच संतानी लिहिलेली असतास असे नाही. खरे म्हणजे ती लोकगीते असतात आणि त्याचा हमखास प्रसार व्हावा व ती लोकप्रिय व्हावीत यासाठी सुप्रसिद्ध संतांची नावे त्याना जोडण्यात आलेली असतात. दुसरीकडे, जैतगिरि, लिखमोजी, माली, दीप पुरी, घासीराम, विष्णुदास, जती भग्गा बाबाजी पंबार, आशा भारती, सत देवायत, नारायणजी, पंचोजी, बगसोनी खाती व नेमाराम यासारख्या काही सतांच्या पदांना लोकगीतांचे स्वरूप आले असून त्यांना लोकगीतेच समजण्यात यावे.

गोगीजी, पाबूजी व रामदेवजी यासारख्या सुप्रसिद्ध लोकदेवताची असख्य लोकगीते लोकप्रिय आहेत. राजस्थानच्या विख्यात पच पीरापैकी रायदेवजी (१४१८–१४५८ अदाजे) यांनी कित्येक पदे रचल्याचे समजतात. लोकामध्ये ती खूप लोकप्रिय आहेत. त्या पदाचा येथे उल्लेख करावयास हवा. ती पदे दोन प्रकारची आहेत– (१) चौबीस प्रमाण आणि (२) गीते (किंवा सबद)

दोन्ही भक्तीवरील सकीर्ण पदे असून त्यात त्याची बोधवचनेही आहेत. चौबीस प्रमाणात गुरु, माया, ज्ञान, भक्ती, भाव, साखी, अलख व आगम, इत्यादी-सारख्या चोवीस विषयांवरील त्याची मते दिलेली आहेत त्याचे भक्त तो पवित्र ग्रथ मानतात. प्रमाणी, विश्वासी, बीसनामी व महाधर्म नावाचा एक पंथ असून प्रस्तुत चौबीस प्रमाण हे त्याचे धर्मशास्त्र आहे. निर्गुण भक्ती, देव आणि गुरुची थोरवी, आत्मबोधाचे प्रतिपादन, मूर्तिपूजेपासून मुक्ती, इशारा व उपदेश यावरील पदे आहेत भावना सहजपणाने व तीव्रतेने लोकप्रिय राजस्थानीत व्यक्त केलेल्या आहेत. पदे बहुतेक मौखिक परंपरेने मिळतात. त्याखेरीज एक हस्तलिखितही उपलब्ध आहे. ते दोनशे वर्षाइतके जुने असल्याचे म्हणतात. त्यात देखील चौबीस प्रमाणाला दुजोरा दिलेला आहे. असे असले तरी रामदेवजीच्या पदांचे अधिक संशोधन होणे अगत्याचे आहे. ते होईस्तोवर आपण या पदांना रामदेवजीचे नाव असलेले लोकसाहित्य समजायला हरकत नाही

लक्षात घेण्यासारखी एक मजेदार गोष्ट म्हणजे काही भक्तिगीते लोकप्रिय परंपरागत लोकगीताच्या धर्तीवर रचलेली आहेत. मीरांबाईच्या नावावर लोकप्रिय असलेली कित्येक पदे लोकगीतांतील बनडा व जँवाई विभागाच्या धर्तीवर रचलेली आहेत. या सर्व अप्रकाशित परंतु लोकप्रिय संतवाणीचा सग्रह व अभ्यास होणे जरूर आहे. कारण त्यातून बरीच मनोरंजक माहिती मिळू शकेल. काही गीताचा तर एक वेगळा विभागच तयार होतो. असे काही विभाग आहेत : (१) बनडा (नवरदेव), (२) जँवाई (जावई), (३) ओल्यूं (आठवणी), (४) जलाल (जलाल बूबनाच्या प्रेमकथेवर आधारित गीते), (५) डफ (होळीच्या उत्सवाच्या वेळी डफाच्या साथीवर म्हटली जाणारी गाणी, याना 'धमाल' किंवा होळी असेही म्हणतात), (६) बधावा (सण किंवा मंगलकार्याच्या वेळी म्हटली जाणारी मंगलगीते), (७) घोडी (वरातीच्या प्रसगी नवरदेव घोड्यावर स्वार होतो त्यावेळी म्हटली जाणारी गाणी), (८) गणगौर (गौरीच्या सणाची गाणी), (९) भात (लग्नातील एका विधीशी सबंधित गाणी), (१०) रातिजगो (विवाहात रात्री जाग्रण करतात त्यावेळी गायिली जाणारी गाणी), आणि (११) तीज (श्रावणातील तीजेच्या लोकप्रिय सणाच्या वेळी म्हटली जाणारी गाणी).

अशी कित्येक गाणी अभिजात आहेत. ओल्यू, पणिहारी, पींपली, सपनो,

मूमल, गणगौर, जँवाई, घूघरी इ. ही त्याची काही उदाहरणे होत. ही गीते त्याच्या चालीसाठीही लोकप्रिय आहेत मुलीच्या सासरी पाठवणीच्या वेळची गाणी विलक्षण करूण आहेत. हरस आणि जीण यांच्या गीतातून बहीण-भावांच्या प्रेमळ सबंधाचे वर्णन आहे

शेकडो लोकगीतांचे प्राचीनत्व ठरवता येते एम. डी. देसाई यानी त्याच्या जैन गुर्जर कवियो ( भाग ३, ग्रंथ २ ) मध्ये सुमारे २५०० लोकप्रिय लोक-गीताच्या चालींची यादी दिलेली आहे या चालीच्या धर्तीवर जैन कवीनी त्यांची पदे रचलेली असल्याने प्रत्येक पदाच्या सुरवातीला त्यानी त्या चालीचा निर्देश केलेला आहे १६ व्या शतकापासून पुढे ही प्रवृत्ती दिसून येते. काही जुन्या गीतांच्या चाली पुढे दिलेल्या आहेत. या चालीची लोकगीते अद्याप लोकप्रिय आहेत. (१) टोडरमल जीतियो रे (१६०९), (२) झिरमिर झिरमिर हो सेल मारु वरसेलो मेहृ (१७१०), (३) सरवर पाणी लेजा मारू म्हे गया हो रोजी (१६९४), (४) सात सोपारी हाथ जोशी पूछण धण गई (१६८५), (५) म्हाने दे ने नणदल पोमचो (१६९४), (६) घर आवोजी आबो मोहोरियो (१७२२), (७) ढोला रहो तोहूँ राधू खीचडी (१८०१) (८) वरसाली होळी आवी प्राहुणी रे (१६१६) (९) जुओ जुओ नणदल जागिडा तू रूप (१६६७) (१०) विणजारा रे लोक देसाउरी थाय (१६०८) आणि (११) आज सहर मे सुरता जोगिसर आयाजी (१७६१)

लोकगीताच्या अध्ययनात नरोत्तमदास स्वामी, रामसिंह तँवर आणि सूर्य-करण पारीक याची नावे विशेष उल्लेखनीय आहेत. मनोहर शर्मा व गोविंद अग्रवाल यानीही या क्षेत्रात विशेष कार्य केले आहे. लक्ष्मीकुमारी चूंडावत, दीनदयाल ओझा, गणपतिस्वामी, पुरुषोत्तम मेनारिया, स्वर्णलता अग्रवाल आणि शिवसिंह चोयल यानीही लोकगीताच्या अध्ययनाला महत्त्वाचा हातभार लावला आहे.

## (२) पोवाडे (लोकगाथा)

पोवाड्यांचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण करता येईल–– (१) शौर्याचे (२) रोमांचकारी (३) पौराणिक व ऐतिहासिक (४) प्रेमाचे आणि (५) निर्वेद (विरक्तीचे).

प्रेम गाथाचा लौकिक प्रेम काव्याच्या अंतर्गत अगोदर विचार केलेला आहेच.

### शौर्यगाथा

पाबूजी का पवाड्याची एकूण संख्या ५२ असून त्यात राठोड पाबूजीच्या शौर्याचे वर्णन असल्याचे पूर्वी सांगितले आहेच. भोपा लोक हा पोवाडा गातात.

पोवाड्यातील प्रसग दाखवण्यासाठी ते एक 'फड' (चित्रे रगवलेला पडदा) बाळगतात

खरनाल (नागोर) गावाच्या ढोल्या शाखेचा जाट बखता याचा तेजोजी हा मुलगा होता पाबूजीप्रमाणेच त्याचीही लोकदेवता म्हणून पूजा करतात. दिलेला शब्द पाळण्यासाठी आणि गायीचे रक्षण करण्यासाठी त्याने प्राण दिले. तेजा लोक-काव्य आणि तेजाजीमध्ये त्याच्या शौर्याचे वर्णन आहे

गलालेंग (गुलालसिंह) हा चौहान शाखेचा राजपूत होता. डूंगरपूरचा महा-रावल रामसिंहच्या (१७०२–२७२९) कारकिर्दीत फडाणाच्या युद्धात तो मारला गेला होता. गलालेंग गाथा त्याच्या शौर्याच्या कृत्यांवर रचलेली असून जोगी लोक ती गातात. वागड प्रदेशात ती लोकप्रिय आहे. जुइता जोगी याने ती पहिल्यादा रचली असे म्हणतात.

डूगजी व जवारजीविषयी पुढे तपशिलाने दिलेले आहे. त्याच्या छावली व गीतांमध्ये त्याच्या शौर्याचे वर्णन असून ते अतिशय लोकप्रिय आहे, विशेषतः शेखा-वाटी प्रदेशात

## रोमांचकारी गाथा

बगडावत हे २४ बगडावत भावाच्या लढायावरील काव्य आहे. बाघरावची ती मुले होती वृद्ध राजपूत राजा राणच्या रावाची बायको जयमती (जइलू) ही युद्धाचे मूळ कारण होती. सवाई भोज (किंवा भोज) या देखण्या आणि वीर बग-डावत बंधूशी तिचे प्रेमसबध होते. रावच्या राजपूतामध्ये व बगडावतांमध्ये झालेल्या युद्धात तेजा नावाच्या बगडावताखेरीज बाकीचे सगळे बगडावत बंधू मारले गेले. नंतर भोजाची गरोदर पत्नी साधू हिला मुलगा झाला. त्याचे नाव उदय राव (देव-नारायण) त्याने राणच्या रावाचा वध करून सूड घेतला. बगडावताचा एक भाट होता त्याचे नाव चोधू. तो देखील कथेतील एक पात्र आहे. त्याने १५,००० पद्यामध्ये ही गाथा रचली असे म्हणतात. पण ती उपलब्ध नाही ज्या प्रदेशात या घटना घडल्या तो हल्ली अजमेर, भीलवाडा नावाने ओळखला जातो. तेथे ही गाथा अजून लोकप्रिय आहे. देवनारायणला देवाचा अवतार समजतात व त्याची पूजा करतात. सवाई भोजाचीदेखील पूजा करतात व त्याचे देऊळ भीलवाड्यातील आसिंद गावाजवळ आहे भोपा लोक ही गाथा गातात. चित्रे रेखाटलेला फड (पडदा) सुमारे २५ हात लांबीचा असतो आणि गाथा गायनासाठी नेपथ्यादाखल वापरतात गाथेचे तिन्ही भाग लोकप्रिय आहेत. पहिल्यात सपूर्ण कथा आहे. दुसऱ्यात बगडावत बधूंच्या मृत्यूपर्यंतचा भाग आहे आणि तिसरा देवनारायणावरील आहे. लक्ष्मीकुमारी

चूंडावतने भोपाकडून गाथा मिळवून तिचे संपादन केले. गाथेच्या दुसऱ्या व तिसऱ्या आवृत्तीचे संपादन अनुक्रमे के. के. शर्मा व महेन्द्र भानावत यानी केले.

बगडावतावर काव्येही लिहिलेली आहेत. रघुराम रोहडिया या चारणाने लिहिलेले देव लीला काव्य हे अशा प्रकारचे निवेदनात्मक काव्य आहे. त्यात वच-निका नावाच्या गद्याचे मिश्रण असलेल्या सुमारे १००० पदामध्ये संपूर्ण कथा सांगित-लेली आहे.

निहालदे सुलतान ही सुलतान व निहालदे यांची प्रेमकथा आहे. सुलतानाच्या प्रम प्रकरणापेक्षाही त्याच्या शौर्याकडे या गाथेचा अधिक कल आहे. तारुण्यात सुल-तान गोरखनाथाचा शिष्य झाला त्यानी त्याला चार आदेश दिले : (१) पत्नीखेरीज अन्य सर्व स्त्रियाना मातृवत समजणे (२) परधन मातीसारखे समजणे (३) सत्याचे पालन करणे आणि (४) रणभूमी कधीही सोडून न जाणे. सुलतानाने या आदेशांचे पालन केले. जोगी लोक ही गाथा गातात. गाथेची भाषा राजस्थानी असून हरि-याणवी भाषेच्या छटा तिच्यात आहेत.

## पौराणिक गाथा

आंबा रास, द्रौपद पुराण, भिमो भारत, अहमनो इ. गाथा अनुक्रमे दुर्वास-ऋषी, द्रौपदीचे वस्त्रहरण, भीम आणि अभिमन्यु याच्या महाभारतातील प्रसगावर रचलेल्या आहेत. अहमनो गाथा काही अशी मागे सांगितलेल्या डेलहजीच्या कथा अहमनीला जवळची आहे ध्रुवलीला ही सुप्रसिद्ध ध्रुव बाळाची गोष्ट आहे

## पौराणिक व ऐतिहासिक गाथा

नरसीजी रो माहेरो हे हृदयस्पर्शी काव्य आहे. सुप्रसिद्ध भक्त कवी नरसीच्या मातृहीन मुलीच्या नानीबाईच्या पारपरिक सासुरवासाचे वर्णन त्यात असून 'भात' किंवा 'माहेरा'चा प्रसग कसा अलौकिकरित्या साजरा झाला त्याचे त्यात वर्णन केलेले आहे. काव्याचे अनेक पाठभेद व संशोधित प्रती उपलब्ध आहेत. काव्य करुण-रसाने ओतप्रोत असून मधूनमधून मानवी संबंधावर उपरोध केलेला आढळतो. मानवी सबंधाशी स्नेहाने बद्ध झालेल्या परमात्म्याचेही त्यात वर्णन आहे. काव्यातील सार्वत्रिक भावनामुळे ते अतिशय लोकप्रिय आहे. अनेक कवींनी त्यांच्या काव्य-रचनेसाठी हा विषय निवडला आहे

## निर्वेद गाथा

सुप्रसिद्ध नाथ सिद्ध, गोपीचंद आणि भरतरी यांच्या जीवन व कार्याचे तसेच त्याच्या वैराग्याचे वर्णन करणाऱ्या गाथा राजस्थानात लोकप्रिय आहेत. जोगी

लोक या गाथा गातात अनेक कवींना त्यापासून स्फूर्ती मिळून त्यानी या विषयावर काव्यरचना केली आहे.

## (३) लोककथा

मध्यकालीन गद्याच्या विभागात 'वात' वर आपण विचार केला आहेच. लोककथानी अनेक आधुनिक लेखकाचे लक्ष वेधून घेतले आहे. विजयदान देथा व गोविंद अग्रवालसारख्या लेखकानीही या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केले आहे या लेखकानी या लोककथा स्वत च्या भाषाशैलीच्या छटा देऊन सादर केल्या. मात्र तसे करताना या कथांचा संक्षिप्तपणा, परिणामकारता व उद्दिष्ट यांना बाध येऊ दिलेला नाही. लोककथाची निवेदनाची प्रचलित शैलीही त्यानी तशीच ठेवली आहे

विजयदान देथा अधिक सुसूत्रपणे कार्य करीत असून बातां री फुलवारी या नावाने ते लोककथांचे सग्रह प्रसिद्ध करीत आहेत. डझनाच्या वर त्याचे सग्रह प्रसिद्ध झाले आहेत पण त्याची भाषा बहुधा प्रादेशिक बोलीभाषा आहे.

गोविंद अग्रवाल यानी हजाराच्या वर लोककथा जमवल्या आहेत त्यांपैकी बऱ्याचशा राजस्थानी व हिंदीमध्ये प्रसिद्ध झाल्या आहेत. परिणामकारकता व रसाळपणामुळे त्या खूप लोकप्रिय झाल्या आहेत.

राजस्थानी लोकगाथा ३० मध्ये लक्ष्मीकुमारी चूंडावतनेही अनेक लोककथाचे पुनर्कथन केले आहे. त्यानी मुलासाठीही अशा लोककथा लिहिल्या आहेत. (हुकारो दो सा आणि टाबरां री वातां).

मूलचद 'प्राणेश' (हियै तणा उपाय), मनोहर शर्मा व नानूराम संस्कर्ता (घर की रेल), देवकिशन राजपुरोहित (दांत कथानां, वर जूडी रो तप), मोहनसिंह (आपणी कथावां) यानी काही चातुर्यकथा प्रसिद्ध केल्या आहेत. इतरही काही लेखकांनी लोककथा प्रसिद्ध केल्या आहेत.

## (४) लोकनाट्य

यांचे स्थूल मानाने ख्याल, स्वॉंग व लीला असे विभाग पाडता येतील. ख्याल हे सामाजिक, ऐतिहासिक, धार्मिक किंवा धर्मनिरपेक्ष विषयांवरील असतात. वेगवेगळ्या प्रदेशात लोकप्रिय असलेल्या ख्यालांचे कारागिरी व शैलीच्या दृष्टीने पुढील गट तयार करता येतात— माच, तुरी-कलगी, कुचामणी, शेखावाटी, नौटंकी, मेवाडी, अलिबक्षी, किशनगढी, रम्मत, जयपुरी, हाथरसी, नागौरी, झाडशाही, दंगली इ.

ख्याल फार झपाट्याने नाहीसे होत आहेत ही दुर्दैवाची गोष्ट होय.

ख्याल झमटडा, टूटिया, टूटकी, जमरा बीज, न्हाण, बादशाह की सवारी, बहुरूपिया की सवारी आणि भवाई हे सुप्रसिद्ध स्वांग होत

लीला पौराणिक प्रसगावरील असतात. रास लीला, राम लीला, रासधारी लीला, सनकारिक लीला, रावलो की रम्मत आणि गवरी ही त्याची काही उदाहरणे आहेत. या कलेच्या अध्ययनात देवीलाल सामर, महेन्द्र भानावत व इतरानी महत्त्वाचे कार्य केले आहे.

## (५) लोकसुभाषित

अनेक विद्वानानी असख्य म्हणी, वाक्प्रचार, उखाणे, उक्ती इ. प्रसिद्ध केल्या आहेत. मुरलीधर व्यास, नरोत्तमदास, स्वामी, अगरचद नाहटा, कन्हैयालाल सहल आणि गोविंद अग्रवाल हे उल्लेखनीय आहेत ।

## प्रकरण पाचवे

# अर्वाचीन काल (१८५० पुढील)

### काळाबरोबर वाटचाल (१८५०–१९४७)

इ. स. १८१९पर्यंत राजस्थानातील सर्व संस्थाने ब्रिटिश आधिपत्याखाली आली. संस्थानिकांनी ब्रिटिशांबरोबर तह, करार केले आणि त्यांना बाह्य आक्रमणापासून संरक्षण मिळू लागले. मात्र यासाठी त्यांना ब्रिटिशांना वर्षाकाठी खंडणी द्यावी लागे, जहागिरदार आणि त्यांचे राजे यांच्या दरम्यान ब्रिटिश मध्यस्थाचे काम करू लागले. संस्थानाच्या अन्तर्गत व्यवहारात ब्रिटिशांनी ढवळाढवळ करायची नाही असे करारानुसार ठरले होते; परंतु राजकीय आणि आर्थिक अशा काही ना काही कारणाने ते वारंवार हस्तक्षेप करीत. १८१९ ते १८५८ हा काळ संक्रमणावस्थेचा होता. ब्रिटिशांशी संपर्क आल्यामुळे शतकानुशतकाच्या सांस्कृतिक परंपरेला धक्के बसत होते. नव्या आणि सुसंघटित ब्रिटिश लष्करी पद्धतीपुढे राजपुतांचे व अन्य योद्ध्यांचे वैयक्तिक शौर्य निरर्थक ठरू लागले. तार (१८५१), रेल्वे (१८५४) यांसारखे वैज्ञानिक शोध, प्रशासन पद्धतीमधील बदल आणि नवी शैक्षणिक पद्धत हे संक्रमणावस्थेचे काही प्रमुख घटक आहेत. १८५४मध्ये चार्ल्स वूडने पाठवलेल्या इंग्रजी शिक्षणासंबंधीचे कागदपत्रांनी सध्याच्या शैक्षणिक पद्धतीचा पाया घातला. अगदी खालच्या थरापासून ते वरच्या पातळीपर्यंत या कागदपत्रांनी शिक्षणाची एकसंध पद्धती आणली. १८३२ मध्ये लॉर्ड विल्यम बेंटिंक अजमेरला आले आणि राजस्थानच्या प्रमुख संस्थानिकांना बोलावून घेतले. जोधपूरचे महाराजा मानसिंह वगळता इतर सर्व संस्थानिक त्यांना भेटायला गेले. सांभर तलावाचा मिठाचा व्यापार आणि अफूचा व्यापार त्यांच्या धोरणामुळे तोटयात चालला होता. त्या काळच्या ढासळत्या व्यापारी परिस्थितीचा कवी शंकरदान सामौर यांनी धिक्कार केला आहे. संस्थानामधल्या प्रशासकीय यंत्रणेचे तीन-तेरा वाजले होते आणि अराजकामुळे ती सतत ढासळत होती. त्यात सुधारणा करण्याची ब्रिटिशांनी पर्वा केली नाही मोठ्या संस्थानांच्या राजधान्यांमध्ये रेसिडेंट या पदावर राजनैतिक अधिकारी नेमण्यात आले. संस्थानांच्या दरबारात कारस्थाने आणि दुटप्पी व्यवहार

याना ऊत आला होता. समर्थ सत्ताधारी फार थोडे उरले होते. मराठा, पिंढारी आणि बाह्य आक्रमणापासून सुरक्षित झालेल्या संस्थानिकाना ब्रिटिशांशी सहकार्य करणे हे आपले कर्तव्य वाटत होते. संपूर्ण राजस्थानमध्ये सांस्कृतिक मूल्यांचा ऱ्हास होत होता, विशेषत. ब्रिटीशाचा हस्तक्षेप त्यात जास्तच भर घालत होता आपल्या राजाबद्दल असलेली लोकांची शतकानुशतकाची जुनी निष्ठा डळमळू लागली होती.

१८३३ मध्ये ब्रिटिशानी शेखावाटी क्षेत्रात शेखावाटी ब्रिगेड नावाची लष्करी तुकडी उभारली. १८३४ मध्ये पाटोडाचे एक प्रभावी आणि शूर सैनिक डुगरसिंह (डुगजी) याने ब्रिगेडमधून बाहेर पडून उठाव केला. ब्रिटिश आणि त्याचे श्रीमंत तद्देशीय समर्थक याना लुटण्याचे काम त्याने सुरू केले. पुढे डुगरसिंहाचा चुलतभाऊ बठोठचा जवाहरसिंह (जवाहरजी) त्याला सामील झाला लोढसरचे (बिकानेर) ठाकूर खुशालसिंह बीदावत याने त्याना मदत देणे सुरू केले भैरवसिंह गौड याने विश्वासघात केल्यामुळे डुगजी पकडला गेला आणि आग्र्याच्या किल्ल्यात त्याला कैद ठेवण्यात आले. १८४६मध्ये तो जवाहरजी, लोटिया जाट, करणिया मीणा, ठाकूर खुशालसिंह आणि इतरांच्या मदतीने तुरुंगातून पळून गेला. डुंगजी आणि जवाहरजी यानी नतर नसीराबादची ब्रिटिश छावणी लुटली डुगजीला १८४७ मध्ये पुन्हा पकडण्यात आले आणि नतर लगेचच जवाहरजीलाही अटक करण्यात आली. आग्रा आणि नसीराबादच्या त्यांच्या वीर कृत्यामुळे ते लोकप्रिय होऊन लौकरच लोकसाहित्याचे नायक झाले. अज्ञात लेखकाने लिहिलेल्या छावली या निवेदनात्मक काव्यासह अनेक काव्ये त्याच्याबद्दल लिहिली गेली या काव्याचे कवी असे— लिखमीदान, ऊजल, शकरदान सामौर, बुधाजी आसिया, गिरवरदान कविया, गगादान सान्दू, रामदयाल कविया आणि तेजदान आसिया.

१८५७ मध्ये गदर या नावाने प्रसिद्ध असलेला उठाव झाला त्यावेळी तो दडपण्यासाठी बूंदीचे महाराव रामसिंह वगळता राजस्थानातील इतर सर्व संस्थानिकानी ब्रिटिशांना सक्रिय मदत केली. काही थोडे जहागिरदार ठाकूर मात्र बंडखोर आणि उद्दाम झाले. खरे पाहता त्यांनी आपल्या संस्थानिकाविरूद्ध नव्हे तर ब्रिटिशाविरूद्ध बड केले. हरिसिंह बीदावत थाथावता, बिशनसिंह मेडतिया गूलर, शिवदानसिंह आसोप, श्यामसिंह बाडमेरा चौहत्तन, नाथूसिंह देवडा भटाना (सिरोही), बलवन्तसिंह गोथडा बून्दी, पृथ्वीसिंह हाडा कोटा, रावत जोधसिंह कोठारिया, केसरीसिंह सलुम्बर, खुम्माणसिंह लोढसर आणि खुशालसिंह आउवा याचा बंड करणाऱ्या जहागिरदारात समावेश होता. आउवाच्या ठाकूर खुशालसिंहाने १८५७ च्या बंडामध्ये फार महत्त्वाची कामगिरी बजावली. त्याला आसोप, गूलर, बाजावास, आलणियावास, रूपनगर आणि सलुम्बरच्या ठाकूरांच्या सैन्याने सहाय्य केले. ब्रिटिश समर्थक जोधपूरचे सैन्य आणि ब्रिटिश

सैन्याशी घनघोर युद्ध केल्यानंतर ठाकूर खुशालसिह आउवाहून निसटून गेला या सुटकेनतर त्याला सलुम्बरच्या रावने मदत केली. कोठारियाच्या रावत जोधसिंहने या बडखोर ठाकुराला आश्रय दिला उमरकोटचा सोढा रतन राणा एका ब्रिटिश सर्वेक्षकाची हत्त्या करून अरवली पर्वतामध्ये भटकत होता. त्याची खुशालसिहाशी गाठ पडली व तो काही दिवस त्याच्यापाशी राहिला.

खुशालसिह, रतन राणा, भटाणाचा नाथूसिह आणि इतर हे लोकगीताचे धीरोदात्त नायक झाले. बारहट तिलोकदान, बारहट बिसनदास, सूर्यमल्ल मिश्रण आणि इतरांनी आउवावरील आक्रमणावर डिंगल गीते रचली आणि ठाकूर खुशाल-सिहाच्या शौर्याची प्रशंसा केली मोतीराम आसिया, रामलाल तापरीया आणि कमजी दधवाडिया यानी रावत जोधसिह कोठारियावर डिंगल गीते रचेली. बखत-राम आसिया, सदायच बुद्धा आणि साधू राघोदास यांनी रचलेल्या गीतात सलुम्बरच्या रावत केसरीसिहाची प्रशंसा केलेली आहे

गदर उठाव अयशस्वी झाला आणि १८५८ च्या अखेरीपर्यंत ब्रिटिशानी भारतावरची आपली सत्ता एकसध आणि भक्कम केली

या सक्रमणकाळातल्या दोन कवीकडे विशेष लक्ष द्यायला पाहिजे. ते म्हणजे बूंदीचे सूर्यमल्ल मिश्रण आणि बोबासरचे (सुजानगढ, बिकानेर) शंकरदान सामौर

सूर्यमल्ल मिश्रण (१८१५–१८६८) आधुनिक काळातील, चारण शैलीचे अखेरचे महान विद्वान् आणि कवी समजले जातात त्यांना बूंदीचे महाराव रामसिह (१८११–१८८९) याचा राजाश्रय लाभला होता आणि त्याच्या सागण्यावरून मिश्रणने १८४० मध्ये 'वशभास्कर' लिहायला सुरवात केली. चम्पू शैलीत आणि विविध वृत्तांत व गद्यात लिहिलेले हे गद्यकाव्य अशा प्रकारची एक वेगळीच ऐतिहासिक कृती समजली जाते आणि त्याला एखाद्या ज्ञानकोशाचे स्वरूप आहे· या वंशभास्करमध्ये, बूंदीच्या महाराव रामसिहाच्या चौहान पूर्वजांची केवळ कथा आहे असे नव्हे तर अन्य राजपूत राजघराणी आणि त्याच्या इतर जातीची माहिती· ऐतिहासिक घटना, आख्यायिका आणि संकीर्ण विषयाचा समावेश आहे या कृतीची मूळ भाषा पिंगल आहे. परंतु, सस्कृत, प्राकृत, अपभ्रंश आणि मरूभाषा किंवा डिंगलही काही ठिकाणी वापरण्यात आल्या आहेत. दुर्दैवाने कवी हा ग्रंथ पूर्ण करू शकला नाही. हे एक प्रमुख ऐतिहासिक निवेदनात्मक काव्य आहे, इतिहास नव्हे ! इतिहासाच्या दृष्टीने पहाता त्यात बऱ्याच त्रुटी आहेत; तरीही बुद्धसिंह, उम्मेदसिंह, रामसिह आणि इतर समकालिनावरच्या ७ व्या आणि ८ व्या राशीना बरेच ऐतिहासिक मूल्य आहे. सेना, युद्ध, योद्धे, शहरवस्त्या, सामाजिक प्रथा आणि सण-उत्सवांची वर्णने यात विपुल प्रमाणात असून अत्यत मनोरजक आहेत.

२८८ दोहे असलेले त्याचे वीर सत्सई से आणखी एक प्रसिद्ध काव्य अपूर्ण

आहे. यात व्यक्त करण्यात आलेले भाव कोणा एका व्यक्तीसबंधी नसून सर्वसाधारण वीररसाने ओथबलेले भाव व्यक्त करण्यात आले आहेत कवीने याबाबत आपल्या पूर्वाधिकाऱ्याचा मार्ग अनुसरला आहे त्याने मध्ययुगीन राजपुताच्या उदात्त आदर्शाचे परिणामकारक पद्धतीने चित्रण केले आहे, हे आदर्श बहुतेक वेळा शूर महिलाद्वारे प्रकट करण्यात आले आहेत समकालीन आणि भावी पिढ्यानी हे आदर्श आचरणात आणावे हा त्यामागचा हेतू असे राजस्थानी भाषेतील हे एक वीररसात्मक अद्वितीय आणि प्रभावी काव्य आहे या सत्सईतल्या दोह्यावर हेमचद्राचे अपभ्रंश व्याकरण, प्राकृत पैंगलम आणि ईसरदासाच्या हालाँ झालाँ रा कुंडलिया यामधील कविताचा आणि बाकीदासाच्या कविताचा खूपच परिणाम झालेला दिसतो. १८५७ च्या बंडाच्या वेळी आणि त्यानतर हा काव्यग्रथ रचला गेला. लुप्त झालेले राजपूत शौर्य पुन्हा जागे करणे हे या ग्रथाचे उद्दिष्ट होते. १८५७च्या बडापासून कवीने प्रेरणा घेतली असेलही परतु तीन दोह्यांव्यतिरिक्त बडाचा कोठेही उल्लेख नाही. (क्र. ४, ५, ६–सत्सई, संपा. सहल व इतर वि.स २००५) मात्र कवीने आपल्या मित्रांना लिहिलेल्या पत्रातून त्याकाळच्या राजकीय परिस्थितीवरच्या कवीच्या प्रतिक्रिया दिसतात. या बडाबाबत लोकाचे कर्तव्य काय असावे याबद्दलच्या त्याच्या सूचना गर्भित स्वरूपात दिसून येतात. त्याचे पूर्वाधिकारी बाकीदास याने केलेल्या बंडाच्या प्रत्यक्ष आवाहनासारखे आवाहन त्याने केले नाही, तर ते त्याने कवितेतील रूपकाद्वारे केले. ऐतिहासिक काव्याच्या युगातील अखेरचा महान कवी सूर्यमल्ल हा होता.

सूर्यमल्लाने बूदीचे महाराव रामसिंह याच्यावर ' राम रजाट ' (१४५ पदे) आणि भिणायचे राजा बलवन्तसिंह यांच्यावर बलवद्-विलास (५८४ पदे) ही दोन निवेदनात्मक काव्ये लिहिली. राम रजाट हे काव्य १८२५ मध्ये रचले गेले, त्यावेळी कवी केवळ दहा वर्षांचा होता. त्याची स्फुट डिंगल गीते आउवाचे ठाकूर खुशालसिंह, नरसिंगगढचे चैनसिंह, डुंगजी आणि जवाहरजी या समकालिनाच्या स्तुतीपर आहेत. त्याची धातू रूपावली ही कृती विशेष गुणवत्तेची नाही. चन्दोमयूख आणि सती रासो या कृतीही त्याच्याच समजल्या जातात, परंतु त्या उपलब्ध नाहीत अतिशय विद्वान आणि महान प्रतिभाशाली सूर्यमल्लचा समकालीन राजस्थानी काव्यावर मोठाच प्रभाव होता.

सतसईमधील तीन दोहे खाली देत आहोत :

(१) अश्वांचा पृष्ठभागच आपल घर करणारे भूमीचा स्वामी म्हणवून घ्यायला पात्र आहेत.

हे घर असे की ढालीच्या सावलीचे त्याचे छत आहे तर बदुका त्याचे खाब आहेत.

(२) माझ्या पतीच्या कीर्तीने मी आश्चर्यचकित होते, त्याचे वर्णन मी कसे करू, हे सखी ? त्याचे मस्तकरहित शरीरही आक्रमक शत्रूला ठार करते त्याच्या हृदयालाही नेत्र आहेत का ?

(३) पाळण्यात जोजवताना माता बालकाला मृत्यूचीच अगाई गाते, ती म्हणते 'बाळा, शत्रूच्या पायानी तुडवल्या गेलेल्या भूमीवरच्या आयुष्यात काय रे गमत।'

शकरदान सामौर (१८२४–१८७८) यास अनेक कारणांसाठी आधुनिक काळातील पहिला महान 'चारण' कवी म्हणता येईल. त्याने ब्रिटिशाच्या विरुद्ध, त्याच्या भ्रष्ट, स्वार्थाविरुद्ध आणि अप्रामाणिक हेतूबद्दल प्रथम रणशिंग फुकले देशातल्या सामाजिक व राजकीय परिस्थितीच्या दैन्याचे वर्णन केले. १८५७ च्या क्रातीमध्ये ब्रिटिशाविरुद्ध झुझलेल्या वीराच्या स्तुतीपर कवने लिहिली, लोकाना काव्याद्वारे प्रोत्साहन दिले काळाचे आव्हान स्वीकारण्यासाठी त्याने ठाकूर आणि जहागिरदाराना प्रेरणा दिली. ब्रिटिशाना पाठिंबा देणाऱ्या सस्थानिकांवर कठोर टीका करताना त्याने मागेपुढे पाहिले नाही. तसेच आपली प्रतिभा वेठीला धरून ज्या कवीनी देशद्रोही सत्ताधाऱ्याची स्तुती आरभली त्याच्यावरही त्याने निर्भयपणे टीकेची झोड उठवली. अन्यायाविरुद्ध त्याने आवाज उठवला. तो राजकवी नव्हता वा त्याला कधी राजाश्रय लाभला नाही.

त्याची स्फुट डिंगल गीते, छप्पय आणि दोहे हे मौखिक परपरेने चालत आले आहेत. ते विविध विषयावर आहेत. काही गीते ठाकूर खुम्मनसिंह बीदावत लोढसर, डुगजी आणि जवाहरजी, तात्या टोपे यासारख्या वीरावर तर काही ब्रिटिशाची धोरणे, टोळधाडीने झालेला विध्वस, धरणे यासारख्या समकालीन घटनांवर आहेत काही गीते शक्ती आणि भैरव यांच्या स्तुतीपर आहेत. शक्ती किंवा देवीची वर्णने करणारी गीते आणि छप्पय यांना एकत्रितपणे 'सगती सुजा' म्हटले जाते. काही छप्पयमध्ये भागीरथीचा महिमा वर्णिला आहे. त्याना भागीरथी-महिमा असे नाव आहे. दोहा छदातील काव्ये आहेत– वखत रो बायरो, देशदर्पण, साकेत घातक. त्यात देशातील त्या काळच्या अत्यत गोंधळाच्या सामाजिक, आर्थिक आणि राजकीय स्थितीचे वर्णन आहे. सस्थानिकांचे व्यवहार, ब्रिटिशाची घातक धोरणे, त्याची दडपशाही करणारी प्रशासकीय व्यवस्था, पददलिताची स्थिती, व्यावहारिक जीवनातील वस्तुस्थिती याचेही प्रभावी व स्पष्ट चित्रण यात दिसते. त्याची शैली साधी व भाषा ओघवती राजस्थानी आहे. तो खऱ्या अर्थाने लोककवी होता, राष्ट्रवादी होता, प्रागतिक आधुनिक कवी होता, उत्तर भारतीय भाषातील समकालीन साहित्येतिहासात अद्वितीय, लोकोत्तर होता.

तो सूर्यमल्ल मिश्रण (१९७ पृष्ठावरील दोहा) याच्याही पुढे एक पाऊल जाऊन म्हणतो—

'राजपूत प्रथा आणि मृत्यूची प्रतिष्ठा यासाठी मातेला बालकाला काहीच शिकवावे लागत नाही. ती आपल्या स्तन्यावरच विसबते वाघाला झडप घालून छिन्नभिन्न करायला कोण शिकवते !'

रवींद्रनाथ टागोर आणि मैथिलीशरण गुप्त यांनी उर्मिला म्हणजे मूक स्वार्थत्यागाचे प्रतीक असे वर्णन केले आहे, त्यासाठी त्यांची योग्य ती प्रशसाही झाली; परन्तु त्यांच्या कितीतरी आधी शकरदान सामौर याने तिच्या मूक स्वार्थ-त्यागाची दखल घेतली होती '

'हे तुलसीदासा तुझ्या सुदर रामायण रचनेबाबत धन्य आहे तुझी !
मला आश्चर्य एकाच गोष्टीचे वाटते की उर्मिलेच्या मूक स्वार्थत्यागाकडे तू दुर्लक्ष कसे केलेस ?'

शंकरदान सामौर याच्या आणखी काही पक्ती अशा— बखत रो बायरो-मधील—

१) देशभक्तांची जीवने हालअपेष्टांची आहेत, तर स्वार्थी लोकांची सध्या भरभराट होत आहे. हे रामजी, आत्मसन्मान जपणे आता कठीण झाले आहे !

२) ब्रिटिशांशी संबंध येऊन नोकरशाही भ्रष्टाचारी झाली आहे. हे रामजी, सामान्य माणसाचे सध्या भयंकर हाल होत आहेत.

३) ब्रिटिशांच्या शोषणामुळे सर्व व्यवसाय नष्ट झाले आहेत. भुकेले लोक जीवनाचा भार कसा वाहू शकतील ?

४) सघर्ष करणे, आपल्याच बाधवाची हत्त्या करणे आणि एकमेकांविरुद्ध तलवारी उपसणे एवढाच धदा आमच्या तथाकथित योद्धयांना सध्या राहिला आहे

५) सध्याची व्यवस्था एखाद्या बहुमजली इमारतीसारखी आहे– गरिबांच्या झोपड्यांच्या उद्ध्वस्त अवशेषावर उभी असलेली.

देश दर्पणमधील पंक्ती–

१) चिंगीझखानसारख्या आधीच्या आक्रमकांनी राजाचे राजवाडे फक्त लुटले, पण ब्रिटिश गरिबांच्या झोपड्याही वगळत नाहीत.

२) गरीब देशबांधवा, मी तुझ्यापुढे नतमस्तक आहे देशाच्या भवितव्याचा खरा भार तुझ्यावर आहे. तू खराखुरा सरदार आहेस (खांद्यावर मस्तक असण्याची पात्रता केवळ तुझीच).

## तात्या टोपेवरील गीतातील दोन पदे

१) शूर वीरा तात्या, तू संपूर्ण हिंदमध्ये वादळ निर्माण केलेस. जसे, हनुमानाने त्याच्या प्रचड गदेने लकेत दहशत निर्माण केली होती.

२) नष्ट होत चाललेल्या राजपूत शौर्याचे अखेरचे स्फुल्लिंग तुझ्या तलवारीत चमकले, युद्धातील तुझे शौर्य अथक आणि कल्पनातीत होते. निराश युद्ध देवतेने राजपुताचा हात सोडला होता हे शूरा तू तिची संगत केलीस, छत्तीस कुळी क्षत्रियाचा तू खरा लायक वारस ठरलास आणि मातृभूमीची प्रतिष्ठा राखलीस.

## चळवळी, राष्ट्रवाद आणि स्वातंत्र्य

### राजस्थान आणि राजस्थानीवरच्या साहित्यकृती

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धात ब्रिटिशानी आपली सत्ता दृढमूल केली. त्याच्या या प्रयत्नामुळे भारतात राष्ट्रीयत्वाची आणि ऐक्याची जाणीव व्हायला लागली कर्नल टॉड यांचे Annals and Antiquities of Rajasthan हे पुस्तक प्रथम १८२९ मध्ये प्रकाशित झाले. हिंदू आणि मुसलमानामधील वैराचे चित्रण करून इतिहासाचे जातीय आणि गटबाजीच्या सदर्भात विश्लेषण करण्यासाठी त्यात सूचक धागादोरा दिलेला असला तरी या पुस्तकानेच राष्ट्रीय अभिमानाची भावना निर्माण करण्याचे कार्यही थोडेफार केले. राजपूत वीर आणि त्यांच्या स्त्रिया यांच्या शौर्याच्या त्यात केलेल्या वर्णनाने लोकांना आणि लेखकांना प्रेरणा दिली. त्यातील विषयावरच नतरच्या लेखकानी आपल्या कलाकृती रचल्या

देशातील सामाजिक, धार्मिक चळवळी आणि इतरत्र घडलेल्या राजकीय घटना याचा राजस्थानावरही परिणाम झाला, त्याच्या प्रतिक्रिया उमटल्या. राष्ट्रीयत्वाची भावना मूळ धरू लागली. स्वामी दयानंद आणि त्याच्या आदर्शवादाने त्याला बरीच चालनाही मिळाली. श्यामजी कृष्ण वर्मा, बारहट केसरीसिंह आणि स्वामी दयानदाच्या इतर काही शिष्यांनी सर्व अडचणींना तोड देत राष्ट्रीयत्वाच्या भावनेची ज्योत तेवत ठेवली मुबईमध्ये १० एप्रिल १८७५ रोजी झालेली आर्य समाजाची स्थापना व मुबईतच डिसेंबर १८८५ मध्ये झालेली भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसची स्थापना या दोन मोठ्या विधायक घटना घडल्या. पौर्वात्यासबंधीच्या अभ्यासात आता युरोपीय विद्वानही विशेष रस घेऊ लागले. प्राचीन काळातील समृद्धीच्या जाणिवेने नव्या आशा निर्माण झाल्या.

१८७१ मध्ये महाराणा शंभूसिंह याने कविराजा श्यामलदासला मेवाडचा विस्तृत व तपशीलवार इतिहास लिहिण्यास उद्युक्त केले. त्याचा वीर विनोद हा ग्रथ राजस्थानच्या इतिहासावरचा एक अमोल ग्रंथ आहे. नंतर भारतीय शिलालेख आणि राजस्थानच्या इतिहासाच्या अध्ययनास गौरीशकर हिराचन्द ओझा यानी एका वेगळ्याच उचीवर नेऊन ठेवला.

जोधपूरच्या रामकरण आसोपा (१८५७-१९४३)याच्या साहित्य कलाकृती म्हणजे आधुनिक राजस्थानी भाषा आणि साहित्याच्या इमारतीचा पाया आहेत. ते शिलालेख, इतिहास आणि काव्यशास्त्राचे गाढे विद्वान होते. व्याकरण, कोशरचना कला व साहित्याचा इतिहास हे कोणत्याही जिवत भाषेचे तीन अत्यावश्यक घटक आहेत १८९६ मध्ये प्रकाशित झालेले आसोपाचे मारवाडी व्याकरण हे पुस्तक आधुनिक काळातील अशा प्रकारचे पहिलेच पुस्तक आहे. त्याने राजस्थानी भाषेचे २ शब्दकोश तयार केले. एकात ६० हजार तर दुसऱ्यात २० हजार शब्द दिलेले आहेत, दुसरा शब्दकोश पहिल्याचे सक्षिप्त स्वरूप आहे; परन्तु दुर्दैवाने या दोहों-पैकी एकाही शब्दकोशाला प्रसिद्धी लाभली नाही. राजस्थानी प्रथमच शिकणाऱ्या-साठी त्याने ३(तीन)प्राथमिक पुस्तके लिहिली—मारवाडी पुस्तक भाग १, २ व ३ (१९०६). मारवाडमधील शाळात ती पाठ्यपुस्तके म्हणून लावण्यात आली होती व ती जवळजवळ २० वर्षे चालू राहिली. त्याने रतनू वीरभाणचे राजरूपक, कविया करणीदानचे सूरज प्रकाश आणि आसिया बाकीदासच्या कविताचे सपादन केले त्याने गीतेचे सोप्या राजस्थानी गद्यात भाषांतर केले तो चारण साहित्य शैलीचा मोठा विद्वान होता आणि हिंदीतील त्याचा मारवाडचा इतिहास हा त्याच्या विद्वत्तेचा पुरेसा पुरावा आहे. हिंदी आणि सस्कृत भाषेची त्याने केलेली सेवाही उल्लेखनीय आहे. त्याने भागवत पुराण आणि तुलसीदासाचे रामायण याचा खडी बोलीत अनुवाद केला. तसेच हिंदी भाषा प्रथमच शिकणाऱ्यासाठी सचित्र बालबोध हे पुस्तक लिहिले. हिंदी व्याकरण हे त्याचे पुस्तक १९११ (वि. स. १९६८) मध्ये प्रकाशित झाले कामताप्रसाद गुरु यांच्या सुप्रसिद्ध हिंदी व्याकरण या पुस्तकापूर्वी ९ वर्षे ते प्रकाशित झाले. २० हजार श्लोक असलेल्या त्याच्या, सस्कृतमधील राष्ट्रौढय या महाकाव्यात राठोडाचा इतिहास असून ते कलहणाच्या राजतरंगिणी-सारखे आहे. १९१४ मध्ये त्याने डॉ तेस्सितोरि याला राजस्थानी भाषा आणि साहित्य शिकविले. दूरदर्शीपणा आणि कल्पनाविलास हे दुर्मिळ गुण असलेला तो उच्च दर्जाचा विद्वान होता राजस्थानी भाषा आणि साहित्याच्या पद्धतशीर अभ्यासाचा मार्ग त्याने खुला केला.

या विद्वानानी राजस्थानचा इतिहास, संस्कृती, भाषा आणि साहित्याच्या अभ्यासाला चालना दिली. मॅकॲलिएस्टर, ग्रियर्सन आणि तेस्सितोरि याच्या-सारख्या परकी विद्वानांच्या ग्रंथकृती आणि भाडारकर, सुनीतिकुमार चॅटर्जी आणि मुनीजिन्‌विजय यांच्यासारख्या भारतीय विद्वानानी हा अभ्यास वाढीला लावला. २० व्या शतकाच्या तिसऱ्या आणि चौथ्या दशकाच्या सुमारास सूर्यकरण पारीक, रामसिंह, नरोत्तमदास स्वामी, मोतीलाल मेनारिया आणि अगरचद नाहटा याच्या-सहित निष्ठावान विद्वानाची एक तुकडी राजस्थानी भाषेच्या विकासासाठी उभी ठाकली.

लुगी पिओ तेस्सितोरि या इटालियन विद्वानाचे ग्रंथ ऐतिहासिक महत्त्वाचे असून दखलपात्र आहेत. या विद्वानाचा जन्म इटलीत डडिने या गावी १८८७ मध्ये झाला आणि मृत्यू बिकानेरमध्ये १९१९ मध्ये झाला. एप्रिल १९१४ ते जुलै १९१६ या काळात कलकत्त्याच्या Indian Antiquary च्या लागोपाठ दोन अंकांमध्ये त्याचे 'Notes on the Grammer of the old westein Rajasthani with special Reference to Apabhramsh' आणि 'गुजराती आणि मारवाडी' हे दोन लेख प्रसिद्ध झाले होते. त्याने खिडिया जग्गा यांच्या कवितांचे (वचनिका राठोड रतन सिंघजी री, महेसदासौत री, १९१७) संपादन केले होते. काही डिंगल मजकुराव्यतिरिक्त पृथ्वीराज राठोड (वेलि क्रृष्ण रुक्मिणी री, १९१९) आणि विठू सूजा नागराजोटा (छद राऊ जैतावी री, १९२०) याच्याही कवितांचे त्याने संपादन केले. त्याने ऐतिहासिक हस्तलिखिते व भाटाचे पोवाडे यासंबधी वर्णनात्मक तीन सूची तयार केल्या : (1) Prose Chronicles of Jodhpur (1917), (2) of Bikaner (1918), (3) Bardic Poetry, बिकानेर (१९१८) त्याने तीन परिशिष्टांसह A Scheme for the Bardic and Historical Survey of Rajputana हे पुस्तकही तयार केले या सर्वेक्षणाचा परिणाम म्हणजेच त्याचे ४ अहवाल : (1) A Progress Report on the Preliminary work done during the year 1915 in connection with the proposed Bardic and Historical Survey of Rajasthan, सहा परिशिष्टांसह (१९१६), (2) Touring Report, 1916 मध्ये केलेले काम व एक परिशिष्ट (१९१७), (३) १९१७ या वर्षात केलेले काम, २ परिशिष्टासह (१९१९) आणि (४) १९१८ मध्ये केलेले काम एका परिशिष्टासह (१९२१) राजस्थानी भाषेच्या अभ्यासातील तेस्सितोरीचे पहिले योगदान म्हणजे त्याने १९१३ मध्ये, लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्ये लिहिलेला लेख होय. लेखाचे नाव— Origin of the Dative and Genitive and Dative-Postposition in Gujarati and Marwari.

स्वामी कृष्ण वर्मा आणि बारहट केसरीसिंह, या स्वामी दयानंदाच्या दोन शिष्यांनी, खरवाचा राव गोपालसिंह आणि ब्यावरचा सेठ दामोदरदास राठी याच्यासह, राजस्थानात क्रांतीकारी चळवळ उभारली. राजस्थानच्या दक्षिण भागात स्वामी गोविंद याने १९०५ मध्ये एक सप (Samp) सभा स्थापन केली. खरे पहाता ही एक स्वदेशी चळवळ होती, ब्रिटिशांनी १९०८ मध्ये लष्करी कारवाई करून ती मोडून काढली. मात्र या चळवळीचे परिणाम होत राहिले. नवनवीन सुधारणा अस्तित्वात आल्या. याबाबत बिकानेरचे महाराजा गंगासिंह हे अग्रणी होते. इतर सुधारणांबरोबर, फार पूर्वी म्हणजे १९१३ मध्ये त्यांनी विधिमंडळ सभेची निर्मिती केली. चालू शतकाच्या पहिल्या काही वर्षात राजस्थानात क्रांति-

कारी फार सक्रिय होते. परन्तु पहिल्या जागतिक युद्धाच्या अखेरीपर्यंत त्याचे सर्व बेत फिसकटले. १९१३ मध्ये सुरू झालेली शेतकऱ्याची बिजोलिया चळवळ १९२२ मध्ये संपुष्टात आली

१९१६ मध्ये लखनौ येथील कांग्रेस अधिवेशनात गांधीजी प्रथमच भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर उदयास आले १९२० मध्ये बाळ गंगाधर टिळकाच्या मृत्यूनतर, गांधीजी अत्यत प्रभावी नेते म्हणून पुढे आले आणि पुढील अनेक वर्षे त्यानी देशाच्या राजकीय चळवळीचे नेतृत्व केले

अशा रीतीने, पहिल्या जागतिक युद्धानतर नवी सास्कृतिक जाणीव आणि राजकीय जागृती देशात मूळ धरू लागली. १९१८ च्या, कांग्रेसच्या दिल्ली अधिवेशनात, बिजयसिंह पथिक, गणेश शकर विद्यार्थी आणि चादकरण सारडा याच्या प्रयत्नामुळे राजपुताना-मध्य भारत सभेची स्थापना झाली, जमनालाल बजाज सभेचे अध्यक्ष झाले. राजस्थानमधील राजकीय हालचालीची अशा प्रकारे भारतीय राष्ट्रीय कांग्रेसशी सागड घातली गेली नतर ही सभा कांग्रेसमध्ये विलीन झाली. आणि कांग्रेसच्या आदेशानुसार प्रादेशिक चळवळीत भाग घेऊ लागली.

कांग्रेसच्या १९२७ च्या अधिवेशनात सस्थानातही प्रातिनिधिक सरकारे स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला त्यानुसार १९३१मध्ये जयपूर येथे प्रथमच प्रजामडळ स्थापन करण्यात आले हरिपुरा येथे १९३८मध्ये झालेल्या कांग्रेस अधिवेशनात विविध सस्थानामध्ये राजकीय सघटना सुरू करण्याचा निर्णय घेण्यात आला. जोधपूर, मेवाड, अल्वर, जैसलमेर, शाहपुरा, इत्यादी ठिकाणी प्रजामंडळे स्थापन करण्यात आली. १९३९मध्ये जवाहरलाल नेहरूंची देशी राज्य लोकपरिषदेचे अध्यक्ष म्हणून निवड झाली. सर्व प्रजामडळे या परिषदेला सलग्न करण्यात आली त्यामुळे परिषदेचा कांग्रेसशी मोठ्या प्रमाणावर आणि घनिष्ट सबंध आला.

दुसऱ्या जागतिक युद्धादरम्यान राजस्थानच्या राजकीय देखाव्यात काहीही बदल झाला नाही. १९४३मध्ये बिकानेरचे महाराजा गंगासिंह याचे निधन झाल्यानतर, देशाच्या व्यापक राजकीय स्थितीवर संस्थानिकांचा प्रभाव पडणे संपुष्टात आले. १९४५ मध्ये अखिल भारतीय देशी राज्य परिषदेचे उदयपूर येथे अधिवेशन भरले आणि जवाहरलाल नेहरूची तिचे अध्यक्ष म्हणून फेरनिवड झाली. प्रातिनिधिक सरकाराची जोरदार मागणी करण्यात आली. परिणामी आदोलने सुरू झाली. काही सस्थानात प्रातिनिधिक सरकारे नावापुरती का होईना अल्पकाळ स्थापन करण्यात आली जयनारायण व्यास (जोधपूर), हिरालाल शास्त्री (जयपूर), हरिभाऊ उपाध्याय (अजमेर), गोकुळभाई भट्ट (सिरोही), माणिक्यलाल वर्मा (उदयपूर), राजबहादूर आणि जुगलकिशोर चतुर्वेदी

(भरतपूर), भोगीलाल पडया (डुंगरपूर), रघुवरदयाल गोयल (बिकानेर), सागरमल गोपा (जैसलमेर) आणि इतर प्रजामंडळाचे आघाडीचे कार्यकर्ते होते. १५ ऑगस्ट १९४७ रोजी शतकानुशतके अस्तित्वात असलेले गुलामीचे पर्व सपुष्टात आले.

१८५७ ते १९४७ हा ९० वर्षांचा काळ देशभर वाढत्या राष्ट्रवादाचा होता. सामाजिक, धार्मिक आणि राजकीय अशा सर्व चळवळींना, व्यापक राष्ट्रवाद आणि मानवी स्वातंत्र्याच्या कल्पनेने कोणत्या ना कोणत्या रूपात प्रेरणा मिळत गेली

## काव्य

### पारंपरिक काव्य

आधुनिक काळात राजस्थानी काव्य पारंपरिकही राहिले आणि त्याला नवे स्वरूपही आले प्रथम आपण प्रवाहानुसार वर्गीकरण न करता, पारंपरिक काव्याचे अवलोकन करूया. कारण १९४७–५० पर्यंत पारंपरिक आणि आधुनिक काव्य एकमेकात मिसळलेलेच होते, त्यात स्पष्ट भेद करणे शक्य नाही.

रामनाथ कविया (१८०१–१८७९) याने दोहा–सोरठामध्ये पद्यरचना केली. पाबूजी रा सोरठामध्ये (३२ पदे) राजस्थानच्या दंतकथामधल्या लोक-देवता पाबूजी राठोड याच्या वीर कृत्याचे आणि वीरमरणाचे वर्णन आहे

पाबूजीच्या लग्नाचे वऱ्हाड उमरकोटला पोचते तेव्हा वधूची भावजय तिला वराचे दर्शन घ्यायला सांगते त्यावेळी नकळत वधूच्या तोंडून तिचे भवितव्य वर्तवले जाते—

'माझा स्वामी या जगी माझा हात हाती घेईल आणि आम्ही एकत्र स्वर्गाची वाट चालू. वैवाहिक सुखोपभोग घेण्यासाठी स्वर्गलोक हीच आमची भूमी राहील. माझा स्वामी माझ्याबरोबर तेथे येईल आणि आपली धीरोदत्त संगत मला देईल.'

करुणा बावनी (५९ पदे), महाभारतातील सभापर्वात वर्णिलेल्या द्रौपदीवस्त्र-हरणावर आधारित आहे. कवीने द्रौपदीची मनःस्थिती सुलभ आणि रसाळपणे वर्णिली आहे, त्याला किंचित उपहासाची, वक्रोक्तीची झालर आहे

द्रौपदी म्हणते,

'ज्या माझ्या पाचही पतींच्या पदाघाताने पृथ्वी थरथरा कापत होती ते आता माझ्या तोंडाकडे नुसतेच पहात आहेत, त्याच्या नजरा खाली वळल्या आहेत आणि अगठ्याने जमीन उकरत आहेत— जणू काही माझा झालेला अपमान त्याना स्पर्शच करत नाहीये !'

ती भगवान कृष्णाची करुणा भाकते–

' त्रिलोकीच्या रक्षणकर्त्या, काय घडतय ते तुला माहित आहे तुझ्यापासून काही लपत नाही. तुला दिसत नाही द्रौपदीचा अपमान होतो आहे ? आणि धर्माचा नाश होतो आहे ?'

रामनाथ कविया याने चारण देवी करणीजी हिच्या स्तुतीपर कवने लिहिली, तसेच सूर्यमल्ल मिश्रण शकरदान सामौर आणि इतरावर मारसिये रचले

सघन भावना, कारुण्य, सूचकता, भाषेचा साधेपणा आणि सहजता ही त्याच्या काव्याची वैशिष्टये आहेत त्याच्या कविता अतोनात लोकप्रिय होत्या, त्या पुन्हा-पुन्हा म्हटल्या जात आणि कित्येकदा त्याची नक्कलही केली जाई. त्यामुळे त्याच्या मूळ कवितांमध्ये इतराच्या भर घालण्याने मिश्रण झाले आहे.

स्फुट कविताव्यतिरिक्त पाबूजीवरची काही शौर्यात्मक कथाकाव्येही आहेत उदा० मोडजी असिया याचे पाबू प्रकाश (१९३२, वि. स. १९८९) आणि जोढा अगरसिंहाचे पाबू प्रकाश (पाचवी आवृत्ती, १९५७). स्वरुपदास (१८०१–१८६३) हा दादू सप्रदायाचा अनुयायी होता आणि सस्कृत, राजस्थानी, पिंगल आणि हिंदू धर्माचा गाढा विद्वान होता. हृन्नयनाजन, रासरत्नाकर, पाखड खडन, वर्णाय मजरी, दृष्टान्तदीपिका, वृत्ती बोध, चिज्जड बोध पत्रिका, सूक्ष्मोपदेश, तर्क प्रबंध, साधारणोपदेश, अविवेक पद्धती आणि पाण्डव यशेन्दू चद्रिका किंवा उक्ति चद्रिका या त्याच्या २ पुस्तकापैकी शेवटचे सर्वात उत्तम व अतिशय लोकप्रिय आहे. त्यात १६ भागात महाभारताचा मुख्यतः पद्यमय साराश आहे. राजस्थानी मिश्रीत ब्रज भाषेत ते लिहिलेले आहे.

साद्दू रायसिंह (१८१३–१८७८) हा भक्त कवी होता. त्याची नीती आणि भक्तीवरची सुमारे शंभर पदे मोतियाई रा सोरण या नावाने प्रसिद्ध आहेत. मोतिया हा रूपनगरचे ठाकूर नवलसिंह यांचा चाकर होता, त्याने कवीच्या दुखण्यात त्याची सेवाशुश्रुषा केली त्यामुळे अतिशय खूष होऊन कवीने आपले सर्व सोरठे मोतियाला सबोधून लिहिले

कवी म्हणतो–

' सुवर्णनगरी लकेत दशानन रावणाने राज्य केले, काय नशीब पहा ! त्याच्या मृत्युशय्येजवळ, अखेरच्या क्षणी त्याच्या तोंडी घालण्यासाठी एकही सुवर्णकण नव्हता !

ज्याच्या घरात सोन्याच्या राशी आहेत पण कुणाच्याही मदतीकरता त्याचा कणभरही उपयोग करीत नाही त्या कंजुषाचा धिक्कार असो !'

राव बखतावर (१८१३–१८९४) हा उदयपूरचा महाराणा स्वरूपसिंह याचा लाडका कवी होता आणि त्यानंतरच्या ३ सत्ताधाऱ्यांनीही त्याचा आदर केला. त्याची रसोत्पत्ती, स्वरूप यश प्रकाश, सभूयशप्रकाश, सज्जन यशप्रकाश, फत्तह यशप्रकाश, सज्ज चित्रचंद्रिका संचार्णव, अन्योक्ति प्रकाश, सामंत यश प्रकाश आणि संगीतावरील एक अशी पुस्तके बहुतेक ब्रज भाषेत आहेत; परंतु १८७९ मध्ये रचलेले केहरप्रकाश हे मोठे काव्य मात्र बहुतांशी राजस्थानी भाषेत आहे त्यात थोडी ब्रज भाषेची झाक आहे. केसरीसिंह आणि कमलप्रसन्ना नावाची गणिका याची प्रेमकथा यात वर्णिली असून विविध प्रकारच्या १४८६ वृत्तामध्ये, दहा भागात, तिची गुंफण केलेली आहे. पद्यमय गद्याचाही त्यात समावेश आहे कवीने त्याला 'वार्ता' असे नाव दिलेले दिसते

प्रसिद्ध कवी रामनाथ कविया याची कन्या समानबाई (१८२५–१८८५)ही प्रसिद्ध भक्त कवयित्री होती. तिचा विवाह अलवरच्या किशनगढमधील माहुळद खेड्यातील रामदयाल याच्याशी झाला होता. तिच्या ईश महिमा (१०६ सवैया) राधिका शरीरोपमा (२९ पदे), श्रीकृष्णोपमा (१८ पदे) आणि पति पत्रोपमा किंवा पतिशतक (६ पदेच फक्त उपलब्ध) या सर्व पद्यरचना ब्रज भाषेत आहेत. मात्र राजस्थानीत ती सुमारे ७० पदासाठी विशेषकरून प्रसिद्ध आहे ही काही पदे रामविवाहाच्या वेळच्या गीताच्या स्वरूपातील आहेत. इतर कृष्णलीलेवर आहेत, तर उरलेली भक्तीपर आहेत.

जोधपूरमधील शेरगढच्या बिराई खेड्याच्या लुद्रदानचा मुलगा कविया चिमणजी (१८३३–१८८७) चारण काव्य परंपरेतील एक विद्वान व प्रतिभावान कवी होता. त्याने विविध विषयावर लहानमोठ्या सुमारे २१ कविता लिहिल्या. त्याची वर्गवारी तीन विभागामध्ये अशी करता येईल— (१) ऐतिहासिक आणि वीरश्रीयुक्त कविता उदा. सोढायण, प्रागराव रूपग, रम्माण रा झुलणा, राणै उम्मेदसिंघ रा छंद आणि आनंदसिंघ रा मरसिया (२) भक्तीपर ईश्वरस्तुतीच्या कविता, पौराणिक, लोकगीतांतील देवदेवताच्या स्तुतीपर, हरिजन मोरध्वार्थी, पिछमी पीर रा छंद, गुमान भारती री वेल आणि रामदेव चरित (३) जसवंत पिंगल आणि भारवा प्रस्तार यासारख्या छंदोमय आलंकारिक रचना.

सोढायण या महत्त्वपूर्ण ऐतिहासिक निवेदनात्मक काव्यात परमार जातीच्या सोढा राजपूताच्या शौर्याच्या आणि वीरकृत्याच्या कथा वर्णिल्या आहेत. हे काव्य रचले गेले तेव्हा सोढा लोक बहुधा सिंधमधल्या (सध्या पाकिस्तानात) थाट आणि पारकर भागात रहात होते. सोढायण हे या प्रकारचे एकमेव काव्य आहे

चिमणजीने परंपरागत चारण काव्याच्या बहुतेक सर्व प्रकारांमध्ये बहुमोल

भर घातली. नवीन प्रकार अस्तित्वात येण्याच्या काळातच त्याच्या कविता रचल्या गेल्याने तो फारसा लोकप्रिय झाला नाही. काही वर्षांपूर्वी त्याच्या कविता प्रसिद्ध होईपर्यंन्त तो जवळजवळ अज्ञातच राहिला

गुमानसिंह (१४०–१९१४) हा मेवाडच्या लछमनपुराचा जहागिरदार होता तो महान योगी आणि भक्त कवी होता अध्यात्मिक ध्यानधारणा हाच मुख्यत्वे त्याच्या काव्याचा विषय होता अतिशय रसाळ भाषेत त्याने भक्तीभावना प्रकट केली आहे. त्याची भाषा बहुताश राजस्थानी असून त्यावर थोडा बोलीभाषेचा प्रभाव आणि ब्रज भाषेची छटा आहे. मोक्ष भवन, मनीष लक्ष चद्रिका, योग भानू प्रकाशिका, गीतासार, योगाक शतक, सुबोधिनी, रत्नसार, तत्त्वबोध, राम रत्न-माला, लय योग बत्तीसी, समयसार बावनी, अद्वैत बावनी, राजनीति, श्रीराम गोपी गीत अष्टक आणि गुमान पदावली ही त्याची पुस्तके आहेत.

गुमान पदावलीमधील एका पदातील काही पक्ती ·

'माझ्या आत्म्याच्या मोत्याला मी भोक पाडले आहे भोक पाडलेला हा मोती मी एका माळेत गुफला आहे. आत्म्याचा अविध्य मोती म्हणजे केवळ एक दगड— त्याला भोक पाडले म्हणजे तो किती मौल्यवान ठरतो हे सत जाणतो म्हणूनच मी माझ्या आत्मरूपी मोत्याला भोक पाडले आहे ईश्वरनामाचा दोरा करून आत्म्याच्या मोत्यात मी तो ओवला आहे. एखाद्याने अन्तर्चक्षुंनी पाहिले तर त्याला मोत्याचे सौदर्य दिसेल, त्याला त्यात लाखो चद्राचा प्रकाश दिसेल हे योगी, सत्य-शोधका, गुमान म्हणतो त्यावर विश्वास ठेव, मर्त्य जगातील मोती केवळ वेश्येला शृगारतो मी माझ्या आत्म्याच्या मोत्यापर्यंत पोचलो आहे.'

बारह शिवबक्ष पालहावत (१८४४–१८९९) हा अल्वरच्या महाराजा मंगलसिंहाचा राजकवी होता त्याचे अल्वर की षट्ऋतु झमाल हे काव्य राजस्थानी भाषेतील १२८ झमाल पदाचे आहे कवीने महाराजाचे वैभव, स्त्रियाचे सौदर्य, शिकार आणि उत्सवाचे ऋतूच्या वर्णनाद्वारे चित्रण केले आहे. त्याचे वृदावन शतक ब्रज भाषेत असून काही पक्ती पिंगलमध्ये आहेत. अल्वर राज्य का इतिहास हा अल्वर संस्थानाचा पद्यमय इतिहास आहे. त्याची भाषा ब्रज, खडी बोली आणि उर्दू भाषा यांचे मिश्रण आहे.

ऊमरदान लालस (१८५१–१९०३) आपल्या मातापित्याच्या मृत्यूनंतर खेडापा परंपरेच्या राम स्नेही संप्रदायाचा मांगीराम यांचा शिष्य झाला. १८८३ मध्ये तो स्वामी दयानदाच्या संपर्कात आला आणि स्वामींच्या विचारसरणीने तो प्रभावित झाला. नंतर त्याने गृहस्थाश्रम स्वीकारला अमरकाव्य या नावाने त्याचा काव्यसंग्रह प्रकाशित झाला. सामाजिक सुधारणा आणि त्याकाळच्या सामाजिक

स्थितीचे वास्तववादी चित्रण त्याच्या काव्यात दिसते. सामाजिक कुप्रथावरील त्याचे उपरोधिक काव्य धारदार आणि सडेतोड असून काही वेळा त्याची भाषा अत्यंत खरखरीत झाली आहे. त्याची वर्णने मनोरजक, प्रभावी आहेत, त्यात प्रचलित उपमा, उत्प्रेक्षा, म्हणी याची खैरात दिसून येते भाषा सोपी राजस्थानी आहे.

१८९९ मध्ये (वि. सं १५९६) पडलेल्या भयकर दुष्काळात गरीब स्त्रियांची काय अवस्था झाली होती याचे वर्णन करणारी त्याची दोन पदे आहेत ·

' स्त्रियानी सुवर्णालंकार, रौप्यालंकार घालणे आणि प्रसाधने वापरणे आता स्वप्नवत झाले आहे. संवत वर्ष १९५६ मध्ये पडलेल्या भयानक दुष्काळात त्या सैरभैर भटकत आहेत. त्याच्या बोटात साधी अंगठीही नाही त्याच्या कपाळी कुकू नाही. काजळविरहीत नेत्रकडा भिजल्यासारख्या आहेत. सधवा आणि विधवा याच्यात आता फरकच दिसत नाही

मारवाडातील सुखवस्तू कुटुंबातील स्त्रियानाही उपवास काढावे लागत आहेत. दिवसभर किंवा लागोपाठ कित्येक दिवस त्याना अन्नाची भ्रात पडत आहे. काही फोल अपेक्षेने त्या खोल श्वास घेऊन शरीर आणि आत्मा एकत्र ठेवायचा प्रयत्न करत आहेत. बिचाऱ्या स्त्रिया त्याना अन्नही देऊ न शकणाऱ्या पुरुषाच्या घराला त्या बाधल्या गेल्या आहेत'.

महाराज चतुरसिंह (१८७९–१९२९) हा महान योगी, भक्त आणि मेवाडचा कवी समजला जातो. मेवाडमध्ये अद्यापही त्याचे काव्य लोकप्रिय आहे त्याने एकूण १८ पुस्तके लिहिली, ती सर्व बहुतेक लहान आहेत— भगवत् गीता की गीतांजली टीका, परमारथ विचार, योग सूत्र की टीका, सांख्य तत्त्व, साख्य कारिका, मानव मित्र, राम चरित्र, शेष चरित्र, अलख पच्चीसी, तुहि अष्टक, चतुर चितामणि, महिमा स्तोत्र, चद्रशेखर स्तोत्र (मेवाडी टीका), हनुमान पचकसमान बत्तीसी, चतुर प्रकाश, अनुभव प्रकाश, बाळकां री पोथी आणि नवो रोग

यातील मुख्य विषय योग, भक्ती, नीती, सामाजिक विषमता आणि शास्त्राज्ञा हे आहेत. त्याने महिला आणि शेतकऱ्याच्या उद्धाराचे आवाहन केले आहे. तसेच सर्व सामाजिक कुप्रथा, गैरव्यवहार आणि अधश्रद्धाचा त्याग करायचेही आवाहन केले आहे. सघन विचार व्यक्त करण्यामधील प्रतिभा, नव्या उपमा, उत्प्रेक्षा, ओघवती भाषा आणि रसाळपणा ही वैशिष्टये पहाण्यालायक आहेत. काही धर्मग्रथावर त्याने गद्यात भाष्यही केले आहे. मुलांना त्यांच्या मातृभाषेत शिक्षण देण्याची त्याने कळकळीची विनती केली. त्यासाठी त्याने बाळका री पोथी हे पुस्तक लिहिले. त्याच्या सर्व पुस्तकाची भाषा सोपी राजस्थानी असून तीवर मेवाडी बोली भाषेचा थोडा प्रभाव आहे.

चतुर चिंतामणीमधील तीन पदे पहा :

'सन्मानाने आणि विनती करून बोलावल्याखेरीज कुठल्याही घरात पाऊल टाकू नका रेल्वेच इंजिनही सिग्नलने आमंत्रण दिल्याशिवाय स्टेशनात येत नाही '

'प्रसंगानुसार घडा उलटा करा वा सरळ करा. तुम्हाला पोहायचे असेल तर घडा उलटा करा, पाणी भरायचे असेल तर सरळ करा '

'लेखणी, शाई मजकुराला जबाबदार असत नाही. तुमच्या मनाच्या ठेवणी-नुसार तुम्ही विनम्रपणे लिहाल किंवा अभद्रही लिहाल. '

मोडसिंह महियारियाचा जन्म १८६१ मारवाडात झाला. गणेशपुरी त्याचा गुरु होता. सूर्यमल्ल मिश्रणने आपल्या काव्याचे नाव 'वीर सतसई' ठेवले खरे, परन्तु ते सर्व म्हणजे सातशे पदे पूर्ण करू शकले नाहीत. मोडजीने सातशे पदे लिहिण्याचा प्रयत्न केला पण अखेर त्याच्या वीर सतसईमध्ये त्याहून जास्त पदे झाली, स्वतःच्या ४५३ पदाव्यतिरिक्त त्याने सूर्यमल्लकडून २८८ पदे उसनी घेतली आणि एक बाकीदासाकडून घेतले. सूर्यमल्ल आणि मोडजी यांच्या काव्याचा प्रकार एकच होता. मोडजीच्या भावना किंवा विचार सूर्यमल्लाइतके सखोल नव्हते काही थोड्या दोहयात मोडजीची सखोलता दिसून येते कवी म्हणून मोडजी फारशा उंचीवर नव्हते, परन्तु चारण काव्याच्या परंपरेतील अखेरचा दुवा म्हणून ते दखलपात्र आहेत.

जयपूरमधील सेवापुरा खेड्यातील हिंगलाजदान कविया (१८६१–१९४८) हा चारण काव्यशैली परपरेतील अखेरचा महान प्रतिभावान कवी समजला जातो त्याने बरीच काव्यरचना केली त्यापैकी खालील विशेष प्रसिद्ध आहेत. 'मृगयामृगेंद्र' यामध्ये कुचामणचे शेरसिंह यांच्या शिकारीचे वर्णन आहे तसेच शिकारी व सावज याच्यातील काल्पनिक सवाद आहे, 'प्रत्यय पयोधर' हे छदशास्त्रावरील पुस्तक, खुडाद खेड्यातील इंद्राबाईच्या वाढदिवसानिमित्त रचलेले 'साल गिरह' सतक. इंद्राबाई देवीचा अवतार समजली जात असे. बिकानेरचे राव जैतसी आणि काम-राण यांच्यातील युद्धाचे वर्णन करणारे 'मेहाई महिमा' राव जैतसीला करणीजी देवीने मदत केली त्याचेही वर्णन त्यात आहे. दुर्गेच्या स्तुतीपर 'दुर्गा बाहत्तरी'. आखेट अपजस आणि वाण्या (वाणिया) रासौ या दोन्ही उपरोधिक कविता. त्याने काही किरकोळ कविताही रचल्या. त्यात रूपसिंघ रूपक आणि करणीजी, इन्द्राबाई व भवानी (शक्ती) देवीच्या स्तुती डिंगल गीतात केलेली आहे भुजग प्रयात, शिखरिणी आणि कवित्त छंद वापरले आहेत. त्याच्या काव्याचे मुख्य विषय ऐति-हासिक, वीरकृत्य आणि शक्तीच्या रूपातील देवीची भक्ती हे आहेत त्याने स्वार्थी

व्यापारी आणि शूर वीराचा आविर्भाव आणणारे भेकड यांचा उपहास केला. वीर रस आणि शक्तीचे वर्णन जोमदार आहे भाषा मुख्यत्वे साहित्यिक राजस्थानी असून कवीचे तिच्यावर विलक्षण प्रभुत्व असलेले दिसते

केसरीसिंह बारहट (१८७१–१९४१) हे क्रांतिकारी आणि राष्ट्रवादी कवी होते देशाच्या स्वातंत्र्यासाठी त्यानी आणि त्याच्या कुटुबाने महान स्वार्थत्याग केला. आपल्या स्फुट कवितांद्वारा त्यांनी जागृतीचा प्रयत्न केला. त्यांनी संस्थानिकाना त्याच्या गतकालीन वैभवाची आठवण करून दिली आणि त्याना ब्रिटिशांच्या स्वार्थी धोरणाविरूद्ध इशारा दिला त्याचे चेतावणी रा चूगट्या (१३ सोरठे) ऐतिहासिक आहे.

ते काव्य मेवाडचा महाराणा फतेहसिह यास उद्देशून लिहिलेले आहे लॉर्ड कर्झन याच्या निमंत्रणावरून तो १९०३ मधील दिल्ली दरबाराला उपस्थित राहण्यासाठी जाणार होता. त्यावेळी कवीने त्याला त्याच्या प्राचीन गौरवाची जाणीव करून दिली. परिणामी महाराणा दरबाराला उपस्थित राहिला नाही. पुढे त्याचे गंभीर राजकीय परिणामही झाले

चार सोरठे खालीलप्रमाणे–

'मेवाड आणि महाराणा याना हिंदुस्थानच्या हृदयात स्थान आहे, फायद्या-एवजी त्यांनी गौरवाची आठवण ठेवली, त्यानी डोंगरदऱ्या पार केल्या, आपला प्रदेश सोडला परतु स्वातंत्र्याची गौरवशाली परपरा कायम राखली.'

'मेवाडचे राणे विपत्तीतही खबीर राहिले, असे असता हे फतमल (फतेसिंह), केवळ एका कागदावरच्या आदेशाने तू कसा डळमळलास ?'

'ब्रिटिश दरबारात सर्व राजे रजवाडे नतमस्तक होऊन आणि हात पुढे करून स्तुतीपर बोलतील, अरे, फता (फतेहसिंहा), तुझे वीरबाहू ब्रिटिशापुढे अपमानित होऊन कसे पसरले जातील ?'

'दिल्लीचा अभिमानी किल्ला आश्चर्याने तुझ्याकडे नजर टाकेल, सिसोदियाचे आजवर कधी न झुकलेले मस्तक त्याच्यापुढे खाली वाकताना पाहून तो शांतपणे हसेल'

उदयराज ऊजल (१८८५–१९६७) हा चारण साहित्याचा अभ्यासक होता आणि पारंपरिक शैलीचा उत्तम कवी होता. राजस्थानी भाषेचा प्रसार आणि मान्यतेसाठी त्याने केलेला प्रयत्न प्रशसनीय आहेत त्याच्या काव्याचा मुख्य सूर राजस्थानबद्दल प्रेम, त्याचे वैभव, भाषा आणि साहित्य हाच होता. त्याच्या पदात राजस्थानच्या नष्ट होत चाललेल्या वैभवाबद्दल खेदाची भावना व्यक्त होते. तसेच ते जपू शकणाऱ्याना त्याने विनंती केली आहे. प्राचीन वीरांच्या कथा

शब्दबद्ध करून त्याने समकालीन स्वातंत्र्यसैनिकाचीही प्रशसा केली. त्याने सोरठा, दोहा, डिंगल गीत आणि छप्पई ह्या वृत्तांचा बहुतेक वापर केला त्याच्या सोरणची एक पक्ती राजस्थानीप्रेमींची घोषणा झाली आहे ती ओळ अशी— ' दीपै वारा देस ज्यारा साहिन जगमगै ' (तेजस्वी साहित्य असलेले देशच झगमगते असतात) त्याच्या अनेक साहित्यकृतीपैकी खालील खूप प्रसिद्ध आहेत— धूडसार, मारवाड रा वीर दूध प्रकास, मातृभाषा दोहावली, भाणियै रा दूहा, स्वराज शतक, उज्ज्वल सतक तेजसतक, सर्वोदय सतक, श्रमसतक, सतीसतक, जागीरदारा रै अवगुणा रा दूहा, गाधी रा दूहा, विज्ञान रा दूहा आणि भाषा सतक.

गाधीजी केसरीसिंह बारहट आणि हिंदी व राजस्थानीवरील त्याची ३ पदे खाली दिली आहेत :

' ओ भाणिया ! ख्रिस्ताला सुळावर का चढवले ते समजणे कठिणच ! पण गाधींच्या भवितव्याने आपल्याला हेच दिसते की जगाचा तारणकर्ताही मारला जातो '

' मिहाने (केसरीसिंह) देशासाठी आपली जमीन, आपले प्रियजन आणि मर्त्य जगातील सर्व मालमत्ता, उदरनिर्वाहाचे साधनही त्यागिले !'

' हिंदी आणि मरुभाषा दोन्ही समृद्ध होवोत. एक देशाची भाषा म्हणून आणि एक माझ्या राज्याची म्हणून !'

नाथूसिंह महियारिया (१८९१ वि. स. १९४८–१९७३) हा चारण शैलीच, वीररसाचा आणि राष्ट्रवादी विषयाचा कवी होता. वीर राजस ई गांधी सतका हाडी सतक, चूडा सतक, झाला मान सतक, वीर सजक, कश्मीर सतक, इत्यादी त्याची काव्ये प्रसिद्ध आहेत त्याने मुख्यत्वे ऐतिहासिक आणि वीररसात्मक जुनी शैली, पदरचना आणि परपरा अवलंबिली. ईसरदास, बांकीदास आणि सूर्यमल्ल मिश्रण यांच्या काव्याचा त्याच्यावर प्रभाव पडला असला तरी त्याचे काव्य ठरा-विक साच्याचे व पारंपरिक नमुन्याचे नाही आणि हेच त्याच्या काव्याचे अगभूत सामर्थ्य आहे. त्याने पारपरिक मूल्ये आणि वीरकथांतील आदर्शांचा नवा अर्थ लावला. तसेच समकालीन जाणिवेशी संपर्क ठेवला, आधुनिक राष्ट्रवादी भावनाशी प्रामाणिकता ठेवली. आधुनिक काळातील राष्ट्रीय नेत्यांची आणि वीराची त्याने प्रशसा केली. काव्यात्मतेच्या दृष्टीने वीर सतस ई अतिशय महत्त्वाचे ठरते.

त्यातील दोन पदे अशी—

" 'रजवट' ची (राजपुताची गुणवत्ता)एकच साधी कसोटी आहे. वाटेल ते करून स्वतःच्या प्राणांचे रक्षण करण्याची इच्छा असणाऱ्या माणसात 'रजवट' असणे शक्य नाही. एखाद्या महान कार्यासाठी प्राणार्पण करण्याची तयारी जेथे असते तेथेच 'रजवट' असते."

ओ साखी ! छत्र-चामर ढाळून घेणारा तो खरा राजपूत नव्हेच, देशासाठी प्राणाहुती देतो तोच खरा राजपूत.

जोबनेरचा रावल नरेन्द्रसिंह (१८९३–१९६७) हा इतिहासतज्ज्ञ आणि चारण शैलीचा कवी होता. त्याचे सुमारे ७०० सोरठे वीर पूजा सत्साई या नावाने प्रारंभी होते; परंतु त्यात नंतर आणखी काही सोरठ्यांची भर पडल्यावर ते १,००० झाले आता त्यांना एकत्रितपणे 'वीर हजारा' म्हटले जाते ते अद्याप प्रकाशित व्हायचे आहेत वीर हजारा हे ऐतिहासिक काव्यच आहे, त्यात वीरश्रीवर भर आहे करणीजी, राम, हनुमान, कृष्ण, बुद्ध, पारसनाथ, पज्जवनराय, सूरजमल जाट, प्रतापसिंह नरूका, राणा प्रताप, राणाराजसिंह, पाबूजी राठोड, अमरसिंह राठोड, बल्लू चापावत, दुर्गादास राठोड, तेजोजी जाट, बारहट केसरीसिंह आणि शैतानसिंह भाटी या देवदेवता आणि योद्ध्यांचे त्यात वर्णन आहे. चारण शैलीच्या नष्ट होत चाललेल्या पारंपरिक काव्यामधील त्याचे योगदान उल्लेखनीय आहे

कविराव मोहनसिंह (१८९९–१९६४) हा विद्वान आणि कवी होता. त्याने राजस्थानी आणि ब्रज अशा दोन्ही भाषांत पद्यरचना केली त्याच्या काव्याची संख्या खूपच मोठी असून त्यांपैकी बरीच अद्याप प्रकाशित व्हायची आहेत काव्यांची नावे अशी– मोहन सत्सई, वीर चरित्र सत्सई, कुम्भा कीर्ति प्रकाश, प्रताप यश चंद्रोदय, महाराणा चरितामृत, व्यंग्यार्थ प्रकाश, कुंडलिया शतक, नीति शतक, मृगया बावनी, भूपाल भूषण, कर्म यश कलानिधी, मान पच्चीसी, वणिक बहत्तरी, रामदास पच्चीसी, जयमल पच्चीसी, प्रपंच पच्चीसी, भूपाल पच्चीसी, दुर्गा बावनी, राज बहार, रघुवंश चरित आणि विनय पाठ.

वीर चरित्र सत्सईमध्ये सोप्या राजस्थानीमधील ७२१ दोहे असून ते महत्त्वाचे आहेत. कवीने महाराणा प्रताप, राव चंद्रसेन, सुरताण देवडा, राठोड दुर्गादास, शिवाजी, छत्रसाल बुंदेला, गुरु गोविंदसिंह आणि महाराणा रणजितसिंह या महान योद्ध्यांच्या वीरकथा मोठ्या प्रभावीपणे सांगितल्या आहेत शैली मात्र परंपरागत आहे.

आचार्य तुलसी (जन्म १९१४) हा तेरापंथाचा (श्वेतांबर) ९ वा आचार्य असून राजस्थानीत चरित्र काव्याच्या परंपरेचे त्याने पुनरुज्जीवन केले. त्याने राजस्थानीत माणकमहिमा, डालिम चरित्र, कालू यशोविलास आणि मगन चरित्र या रचना रचल्या. त्या अनुक्रमे माणक गणी, डाल गणी, कालू गणी (६ वे, ७ वे आणि ८ वे आचार्य) आणि तेरापंथाचे मुनी मगनलाल यांची जीवने, कार्ये आणि शिकवणुकी यावरच्या आहेत भाषा सोपी आणि शैली साधी आहे.

या परंपरेतील इतर काही कवी असे— बूंदीचा मुरारीदास (१८३८–१९०७) गुजूकीचा बारहट बालाबक्ष पालूहावट (१८१३–१९१७) कोटा–

इद्रगढचा महाराजा सग्रामसिह (१९ व्या शतकाचा उत्तरार्ध), मेडता-भुवालचा मुकुद दान (१८८६–१९५२), उदयपूरची राव मान कुमारी (जन्म १९०५), किशनगढ-नरवरचा ठाकूर रेवतसिह भाटी (जन्म १९०२), उदयपूरचा केसरीसिह सोन्याणा, जोधपूर, ऊजलाचा फत्तेहकरण ऊजल, जोधपूरचा साधू भावन दास, जयपूरचा अक्षयसिह रतनू, त्याचप्रमाणे जोधपूरचे हनुमंतसिह देवडा, देवकरण बारहट, इन्दोकली आणि शक्तीदान कविया.

संतभक्ती आणि नीतिकाव्य याचे योगदानही काही कमी नाही. आधुनिक कालात एखाद्या धार्मिक पथाच्या असलेल्या कवीने आणि अशा पंथाच्या नसलेल्या कवीनेही धार्मिक व आध्यात्मिक कविता लिहिण्याची परंपरा चालू राहिली, परन्तु शैली मात्र जुनीच होती. राजश्री 'साधना', कन्हैयालाल दुगड (गीतां री गुजार) आणि इतरानी भक्तीपर काव्यरचना केली आहे. नीतीकाव्यामध्ये खालील रचनाचा समावेश आहे— कन्हैयालाल सेठियाचे रमणीयॅ रा सोरठा (१९४०), मांगेलाल चतुर्वेदीचे मरु भारती (१९५२), भीमराज भाम्बीरु मगल याचे मूघा मोती (१९४४), मनोहर शर्मा मंजुलचे राजस्थानी गूज (१९५९), चद्रशेखर व्यासचे शेखर का सोरठा (१९५७), कन्हैयालाल दुगडाचे विचार बावनी (१९६९).

## काव्य : बदलते युग आणि विचार (१९४७ नंतरचा काळ)

संस्थानामध्ये प्रजामडळाची स्थापना झाल्यानंतर काही स्थानिक कार्यकर्त्यांनी गीतरचना करून आणि गाऊन सामाजिक-राजकीय जागृती करायचा प्रयत्न केला. ही गीते मुख्यत्वे लोकगीताच्या चालीवर आणि शैलीवर आधारलेली होती. माणिक्यलाल वर्मा, हिरालाल शास्त्री, जयनारायण व्यास, सुमनेश जोशी, गणेशीलाल व्यास उस्ताद, भैरवलाल 'काला बादल' आणि इतरानी अशी गीते लिहिली. त्यात साहित्यनिर्मितीपेक्षा राजकीय जागृतीचे वातावरण निर्माण करण्याचाच उद्देश अधिक होता. त्यानी लोकाचे लक्ष आपल्या मातृभाषेकडे वेधले. काही रूपात हा कल अद्यापही चालू आहे.

ज्या दोन उल्लेखनीय काव्यानी भविष्य काळातील राजस्थानी काव्याचा मार्ग खुला केला त्या म्हणजे चंद्रसिहाचे 'बादळी' (१९४१) हे लहान मेघावरचे काव्य आणि मेघराज मुकुल याचे 'सैनाणी' ! सैनाणी ही कविता प्रथम, १९४४ मध्ये दिनाजपूर येथे झालेल्या राजस्थानी साहित्य समेलनात म्हटली गेली होती बादळी ही निसर्गकविता आहे, तर सैनाणी एका ऐतिहासिक घटनेवर आधारलेली आहे. देशभक्तीची सध्याची लाट हा त्याचा आशय आहे दोन्ही कविता ऐतिहासिक महत्त्वाच्या आहेत.

सैनाणी काव्याने हजारो लोकांचे राजस्थानी भाषेकडे केवळ लक्ष वेधले असे नाही, तर त्यासारख्या विषयावर कविता लिहिण्यास प्रेरणाही दिली कवी संमेलनामध्ये राजस्थानी कविताचे वाचन सुरू व्हायचा मार्गही खुला करून दिला.

नंतर, दीर्घ निवेदनात्मक कविता किंवा महाकाव्यसदृश कविताही लिहिल्या गेल्या. वास्तविक पहाता, पद्यमय कथा आणि महाकाव्यसदृश कवितेत आशयाच्या दृष्टीने काही फरक नाही. कथाप्रकारे कथेचा विस्तार केला आहे एवढ्याच दृष्टीने फरक असण्याची शक्यता असते एखाद्याची जीवनकथा किंवा एखादाच प्रसंग यावरच दोन्ही आधारलेल्या असतात कुणा एखाद्याला श्रद्धांजली वाहण्यासाठीही प्रदीर्घ कविता रचल्या गेल्या आहेत. आधुनिक काव्याचा बहुतांश भाग गीताच्या स्वरूपातील आहे काही कविता स्फुट छदांमध्ये रचलेल्या आहेत, परंतु त्यांना गीत-काव्य या विशिष्ट सदरात घालता येणार नाही.

राजस्थानी भाषेतील मासिकांनी, स्वातंत्र्यानंतर, आधुनिक राजस्थानी साहित्याच्या वाढीमध्ये मोलाची कामगिरी बजावली. रावत सारस्वत यांनी जयपूरमध्ये १९५३ मध्ये मरू वाणी नावाचे मासिक सुरू केले. ते अग्रणी समजले जाते. त्यानंतर किशोर कल्पनाकांत यांनी रतनगढ येथे ओळमो नावाचे मासिक सुरू केले. राजस्थानी भाषेतील शंभराहून अधिक लेखक या मासिकांनी उजेडात आणले.

स्वातंत्र्योत्तर काळात सामाजिक, आर्थिक आणि राजकीय परिस्थितीमुळे तसेच समाजवादी विचारसरणीच्या प्रसारामुळे, प्रगतीशील म्हणता येतील अशा कविता लिहिल्या गेल्या. विनोदी आणि उपरोधिक काव्यरचनाही झाली. चीनचे आक्रमण आणि पाकिस्तानबरोबरची युद्धे यामुळे राष्ट्रवाद, ऐक्य आणि देशभक्ती या भावनांचे पुनरुज्जीवन झाले. राष्ट्रीय पुनरुत्थान आणि वीरश्रीवर अनेक कविता लिहिल्या गेल्या कवींनी राजस्थानच्या गौरवशाली इतिहासाची प्रशंसा केली

१९७० ते ८० या दशकाच्या मध्यात काही तरुण कवींनी हिंदीच्या धर्तीवर लिहायला सुरवात केली. ती नवी कविता समजली जाऊ लागली. काव्यात जीवनाचा दृष्टिकोन, मानवी मूल्ये, परिस्थिती आणि व्यक्तिगत कल यांच्यात झालेल्या बदलाचे प्रतिबिंब दिसून येते. नवकवितेच्या चळवळीमुळे साहित्यात बदल घडून आले व ते संपूर्ण आधुनिक राजस्थानी साहित्यात दिसून येतात.

आधुनिक राजस्थानी काव्य मुख्यत्वे राष्ट्रवाद, मानवी स्वातंत्र्याचे विचार आणि या ना त्या स्वरुपातील व्यक्तिगत भावना यावर आधारलेले आहे असे ढोबळ मानाने म्हणता येते.

अनेक राजस्थानी लेखकांवर इतर भारतीय भाषांतील समकालीन वाङ्मयाचा परिणाम झालेला दिसतो. काही थोडे कवीच विशिष्ट प्रवृत्तीचे म्हणून बाजूला

काढता येतील. त्यापैकी बऱ्याच जणांनी थोडयाफार प्रमाणात खाली दिलेल्यापैकी एकाहून अधिक विचारप्रवाहांत भर घातली.

आधुनिक राजस्थानी काव्याचे पुढील विभाग करता येतात :

(१) निवेदनात्मक वा महाकाव्यसदृश काव्य (श्रद्धाजलीकाव्यासह)

(२) निसर्ग काव्य.

(३) गेय आणि इतर काव्य याचे खालील उपविभाग करता येतील .

१) कथा काव्य
२) विनोदी आणि उपरोधिक
३) पुरोगामी
४) मातृभूमीचे प्रेम
५) देशभक्तीपर आणि वीररसात्मक
६) गेय कवने आणि शोकगीते
७) प्रेम आणि शृंगार
८) नवकविता

या प्रत्येक शीर्षकाखालील काव्याचा आता आपण मागोवा घेऊ

## १) निवेदनात्मक वा महाकाव्यसदृश काव्य

अशा काव्याचा विषय मुख्यतः असा असतो-- (१) पौराणिक व धार्मिक (२) ऐतिहासिक आणि (३) आख्यायिका वा दंतकथा. कवींनी अशा कथांचा नवा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला.

श्रीमतकुमार व्यास याच्या रामदूत (१९६६)मध्ये १४ लहान सर्ग असून त्यात हनुमानाच्या वीर कृत्याचे चित्रण आहे. रामायणाच्या कथेवर ते आधारलेले आहे. अशा प्रकारचे हे एकच राजस्थानी काव्य आहे. ब्राह्मणाचे रूप घेऊन आलेला हनुमान रामाची भेट घेतो येथे याची सुरवात होऊन अयोध्येच्या दरबारात हनुमान आपल्या हृदयातील राम-सीता दाखवतो येथे ते समाप्त होते. कवीने या काव्यात हनुमानाचे बंदिस्त आणि व्यापक चित्र सादर केले आहे.

विश्वनाथ 'विमलेश' (१९६६) याच्या रामकथा या काव्याचे ५ अध्याय आहेत. यात रामजन्मापासून अयोध्येतील त्याच्या राज्याभिषेकापर्यंतची कथा थोडक्यात पुन्हा सागण्यात आली आहे. या शैलीचे असे हे एकच काव्य असून त्याची भाषा सोपी राजस्थानी असून त्यावर शेखावाटी बोली भाषेची थोडी छाप दिसते. नानूराम संस्कर्ता याचे लकाणू धणी (१९७६) (म्हणजे लकापती रावण) हे काव्य रावणावर आहे. त्यात रावणाची भव्य बाजू दाखविण्यात आली आहे. यात रावणाचे

महान देशभक्त, विद्वान आणि थोर चारित्र्याची व्यक्ती असे चित्रण करण्यात आले आहे. शूर्पणखा राम-लक्ष्मणानी केलेली आपली विटबना रावणाला सागते येथे या काव्याचा प्रारभ होतो, तर युद्धभूमीवर रावणाचा मृत्यू होतो येथे त्याची अखेर होते रावणाचा मृत्यू म्हणजे मानवतेच्या थोर प्रतीकाचा मृत्यू असे खुद्द महादेवाने म्हटले आहे. बिभिषणाचे चित्रण रामाचा भक्त, परंतु आपल्या मातृभूमीचा द्रोही असे करण्यात आले आहे मातृभूमीसाठी केलेल्या स्वार्थत्यागाची प्रशसा करण्यात आली आहे. रावणाच्या दतकथेला नवा अर्थ देण्याचा प्रयत्न जरी कवीने केला असला तरी रामायणाबद्दलच्या प्रचलित पारपरिक धार्मिक भावनेमुळे नव्या अर्थाचा पडावा तितका प्रभाव पडला नाही. हे काव्य सहा सर्गात आणि सोप्या राजस्थानीत आहेत.

मनोहर शर्माचे या प्रकारातील योगदान अत्यन्त लक्षणीय आहे. त्याचे कुंजाण हे काव्य विरही प्रेमिकाबरचे असून मेघदूताच्या धर्तीवर आहे बिकानेरचा प्रेमात पडलेला एक राजकुमार कुजान नावाच्या पक्ष्याबरोबर घरी असलेल्या आपल्या प्रेमिकेला सदेश पाठवतो पक्ष्याच्या उड्डाणाच्या वर्णनाद्वारे राजस्थानचा भूगोल, सुसगत ऐतिहासिक पार्श्वभूमीसह सागण्यात आलेला आहे.

त्याचे गोपी गीत हे भ्रमर गीत काव्याच्या परंपरेतील असून निर्गुण-सगुण भक्ती आणि प्रेमाचे पावित्र्य हा त्याचा विषय आहे.

माखाणी हे काव्य ढोलामारु या लोककथेवर आधारित आहे. यात ढोलामारु आणि मालवणी ही अनुक्रमे 'जीव', 'विद्या' आणि 'अविद्या' यांची प्रतीके म्हणून दाखविण्यात आली आहेत त्यामुळे कथेला दृष्टान्ताचे रूप प्राप्त झाले आहे

पंछीमध्ये एका पोपटाची करुण कथा देण्यात आली आहे.

बापू हे त्याचे काव्य महात्मा गाधीच्या जीवनावर आहे.

अमरफळ आणि अन्तर्यामी ह्या त्याच्या कृती कठोपनिषद आणि केन्योपनिषदावर आधारित आहेत अमरफळमध्ये नचिकेत आणि त्याने यमराजाकडून मिळवलेले आत्मज्ञान याची कथा सागण्यात आली आहे. नैसर्गिक वस्तूना विविध भावनांची प्रतीके अशा स्वरूपात सादर करण्यात आले आहे. अन्तर्यामीचा नायक इन्द्र आधुनिक मनुष्याचा प्रतीक म्हणून दाखवण्यात आला आहे. हे विचार जागृत करणारे काव्य आहे.

मनोहर शर्माची ही तिन्ही काव्ये १९५८ ते १९६० या तीन वर्षांच्या काळात प्रकाशित झाली. त्याच्या ढोरा रो सगीत (१९७८) मधील लघुकविता स्वरबद्ध करण्याजोग्या असून त्यात लोकप्रिय प्रेमकथातील व्यक्तीची चित्रणे करण्यात आली आहेत. कवीने प्रसंगोपात्त कथेत बदल केले असून त्याना दृष्टान्ताचे स्वरूप दिले आहे. प्रेमाच्या पावित्र्यावर विशेष भर दिलेला आहे

गिरीधारीसिंह पडिहार यांची मानखोची कथा (१९६४) महाभारत व अन्य पुराणातील तुरळक उल्लेखावरून गुफण्यात आली आहे. चेतन गंधर्वाने गालव ऋषीवर पानाची पिंक थुकण्याचे बेछूट कृत्य केल्यामुळे कृष्णाच्या मनात त्याला शिक्षा करण्याचे आले. कोणीही चेतन गंधर्वाला आश्रय दिला नाही म्हणून त्याने स्वत:ला जाळून घ्यावयाचे ठरविले. चेतनाचा हा निर्धार ऐकून त्याची पत्नी विलाप करू लागली. तिचा हा विलाप कृष्णाची भगिनी सुभद्रा हिने ऐकला तिने चेतनला कृष्णाच्या क्रोधापासून वाचवण्याकरता आश्रय दिला, त्यामुळे कृष्ण संतापला व त्याचे आणि अर्जुन–सुभद्रा यांचे युद्ध जुंपले. त्यामुळे विश्वात हाहाकार माजला. नारद आणि गालव यांना संपूर्ण विश्वावरील भयंकर संकटाची जाणीव झाली. त्यांनी मध्यस्थी केली आणि अखेर हे युद्ध संपले. गिरधारीसिंहाच्या काव्यात सुभद्रेला मानवतेची तारक दाखविण्यात आली आहे भावनांची सखोलता मनोरंजक वर्णने आणि योग्य भाषा यामुळे हे काव्य अत्यंत उल्लेखनीय आहे. युद्धाच्या भयानकतेकडे यात लक्ष वेधण्यात आले आहे.

सत्यप्रकाश जोशीचे राधा हे काव्य (१९६०) राधेचे अमर्याद प्रेम एका नव्याच संदर्भात उजेडात आणते ते प्रेम केवळ तिच्यापुरते, तिच्या सुखदु:खापुरते मर्यादित नाही महाभारताच्या युद्धातल्या विनाशापासून ती कृष्णाला परावृत्त करण्याचा प्रयत्न करते आणि समृद्धी व शांततेच्या विधायक संदेशाचा प्रसार करायला सांगते. या काव्यावर धर्मवीर शास्त्रीच्या कनुप्रियाचा प्रभाव पडलेला दिसतो.

सत्यप्रकाश जोशी यांचे बोल भारमली (१९७४) हे शृंगारिक काव्य असून इतिहासावर आधारित आहे. यातील मुख्य व्यक्तिरेखा भारमली असून तीच स्वत:ची कथा सांगते जोधपूरचा राव मालदेव याची रूसलेली राणी उमादे हिची सेविकाम्हणून भारमली काम करीत असे. तिने आपल्या मालकिणीलाच अतिशय दु:ख दिले अखेर तिने रावच्या प्रासादातून निघून जाऊन कोटडाच्या बाघाकडे आश्रय घेतला. बारहट आसाच्या काव्याची चर्चा करताना या कथेचा आपण याआधी विचार केला आहे.

कवी, भारमलीच्या नावाखाली एका स्त्रीच्या लैंगिक वासनेचे स्वत:च्या इच्छेनुसार वर्णन करीत असल्याचे दिसते. त्यात ऐतिहासिक, वाङ्मयीन परंपरा, वास्तववाद आणि सुसंस्कृतपणा याचा लवलेशही दिसत नाही. जोशीने दुसरा विषय निवडला असता तर त्याची काव्यप्रतिभा जास्त चांगल्या प्रकारे वापरली गेली असती. मात्र ऐतिहासिक संदर्भ वगळले तर काही ठिकाणी भारमलीच्या भावनांचे हृदयद्रावक वर्णन केलेले दिसते

बारहट करणीदानचे शकुंतला (१९७४) पौराणिक कथेवर आधारित आहे, परन्तु नवा अर्थ सांगितलेला दिसतो. स्त्रीच्या आत्मसन्मानावर त्यात भर देण्यात

आला आहे. श्री राणी सती हे दुसरे काव्य (१९७५) एका लोककथेवर आधारित आहे राणी सती लोकदेवता मानली जाते व तिचे एक मंदिर झुनझुनु येथे आहे सेठ जालिजी हिस्सारच्या नबाबाचा मुनीम होता. मुनिमाचा मुलगा तनधन याची एक घोडी होती. नबाबाच्या मुलाला ती हवी होती परन्तु तनधन ती द्यायला तयार नव्हता यामुळे संघर्ष उडाला आणि त्यात नबाबाच्या मुलाचे सैनिक तनधन-कडून मारले गेले. नतर तनधन आपली पत्नी नीराणी हिला तिच्या माहेरून आणायला गेला तेथून ते परत येत असताना वाटेत नबाबाच्या मुलाने त्याच्यावर पुन्हा हल्ला केला त्यात तनधन मारला गेला. तेव्हा नीराणीने युद्ध करून नबाबाच्या मुलाला ठार केले त्यानतर ती झुनझुनु नजिक सती गेली.

कान्हमहर्षी याने मरू मयक् (श्री रामदेव चरित्र) (१९६१) लिहिले त्यात राजस्थानच्या ५ प्रसिद्ध लोकदेवतापैकी एक समजल्या जाणाऱ्या रामदेवजी तंवरच्या जीवन व कार्याचे वर्णन आहे. त्याची परोपकारी कृत्ये आणि दैवी शक्ती यासाठी पूजा केली जाते. परतु या काव्यात तो सामाजिक कार्यकर्त्याच्या रूपात दाखवण्यात आला असून त्याने वडिलोपार्जित मालमत्तेचा त्याग करून समाजोद्धार आणि अस्पृश्यता निवारणाचे कार्य केल्याचे दाखविले आहे

नारायणसिंह भाटी याचे मीरां (१९७६) हे मीरांबाईविषयी असून त्यात तिच्या भावना आणि करुण परिस्थिती याचे वर्णन आहे. मानवी भावनेच्या बदलत्या सदर्भात निसर्गाचेही काही ठिकाणी वर्णन आहे. मीरांचे प्रेम भगवान कृष्णावर आहे. कवीने ऐतिहासिक तपशिलाकडे लक्ष दिलेले दिसते. परंतु काही ठिकाणी चुका दिसतात. भाषा काही ठिकाणी भोगळ आहे. काही ठिकाणी उतारे दुर्बोध आहेत.

बनवारीलाल मिश्र 'सुमन' याचे डेलया को दिवालो (१९६३) या काव्यात राणा प्रतापच्या जीवनाचे व शूर कृत्याचे वर्णन आहे. काव्याची सुरवात होते— राणी कर्मा व इतर स्त्रिया जोहार करतात आणि उदयसिंहाला वाचवण्या-साठी पन्नादाई आपल्या मुलाचा बळी देते येथपासून प्रभावी कल्पनाच्या सहाय्याने ओघवत्या राजस्थानी भाषेत लिहिलेले हे वीररसात्मक काव्य आहे

सत्यनारायण 'अमन' याचे शीशदान (१९६१) हे काव्य दोन सर्गात असून त्यात जगदेव पंवार याची वीरकृत्ये आणि त्याग याचे वर्णन आहे. जगदेव पंवार गुजरातच्या सिद्धराव जयसिंहाचा दरबारी होता. या काव्यात इतिहास आणि लोककथेचे मिश्रण आहे. म्हणी आणि वाक्प्रचाराच्या वापरामुळे अभि-व्यक्तीत जिवंतपणा आला आहे.

सूर्यशकर पारीक याच्या धरती (१९७६) या काव्यात राजस्थानचे ग्रामीण जीवन, त्याच्या प्रथा परपरा, सस्कृती, दैनदिन जीवन, सुखदुःखे याचे निसर्ग व

ऋतुचक्राच्या संदर्भात वास्तववादी चित्रण आहे. हे केवळ वर्णनात्मक काव्य आहे. कोठल्याही संबंधित कथेवर आधारलेले नाही भाषा अकृत्रिम राजस्थानी आहे. पारीक यांचे सिद्ध जसनाथजी रो सिरलोको (१९७७) हे संत जसनाथजी यांचे पद्यमय चरित्र असून ते ३ प्रकरणांत ३५४ पदात आहे

नानूराम संस्कार्ता यांचे गोपीचंद (१९७७) हे सहा 'सर्ग'त असून सुप्रसिद्ध नाथ सिद्ध गोपीचंद याच्यावरील काव्य आहे ते थोडाफार फरक करून लोकप्रिय दंतकथांवर आधारित आहे

रघुराजसिंह हाडा यांची हरदौल (१९७८) ही लघुकविता पाच सर्गात आहे ओडछाचा सत्ताधीश झुजारसिंहाचा धाकटा भाऊ बुंदेलखंडाचा योद्धा हरदौल याच्यावर काव्य लिहिलेले आहे. वर्णन बहुतांशी हाडौती बोलीत आहे.

महावीर प्रसाद जोशीचे बिंद्रावन (१९७८) हे काव्य १७ सर्गांत असून कृष्णाच्या वृंदावनातील विविध लीलांचे त्यात वर्णन आहे. प्रसंगोपात्त निसर्गाचे वर्णनही आहे. या काव्याला थोडी भक्तीची डूब आहे. कथन ओघवते असून भाषा सोपी आहे.

प्रेमजी 'प्रेम' यांचे सूरज (१९७८) हे काव्य प्रसिद्ध कवी सूर्यमल्ल मिश्रण यांच्यावर असून त्यात १०१ पदे आहेत. सूर्यमल्ल मिश्रणच्या भावनांचे त्यात वर्णन आहे.

एक अगदी निराळ्या प्रकारचे साधे कथात्मक काव्य म्हणजे कल्याण गौतम यांचे पिव बांधव रँ भेख (१९७८) हे होय. लोकसाहित्यावर आधारित या काव्यात एक तरुण राजपूत पती, आपल्या वधूला घरी आणण्यासाठी ज्या सावकाराकडून २ हजार रुपयांचे ऋण काढलेले असते, त्याला कर्ज फेडेपर्यंत पत्नीला बहिणीसारखे मानायचे आश्वासन देतो अतिशय हालअपेष्टा सोसून तो हे वचन पूर्ण करतो. हे दाम्पत्य चितोडच्या राणीच्या प्रासादात कामाला असते, तिच्या औदार्यामुळे कर्ज फिटून त्यांच्या हालअपेष्टा संपतात.

## श्रद्धांजली रूपातील काव्ये

अशा काव्यात काही ऐतिहासिक व्यक्तींना श्रद्धांजली अर्पण केलेली असते आणि अनुषंगाने उच्च मानवी मूल्यांचे वर्णन केलेले असते. यात सातत्यपूर्ण कथा असत नाही तर त्या व्यक्तीशी संबंधित घटना किंवा परिस्थिती ध्यानात घेतलेली असते व तिचा पार्श्वभूमीसारखा उपयोग केलेला असतो

नारायणसिंह भाटी, रामेश्वरदयाल श्रीमाळी, रामसिंह सोलंकी, इत्यादींनी असे काव्य लिहिले आहे.

भाटी याचे दुर्गादास (१९५६) ही काव्यरचना मारवाडचे दुर्गादास राठोड याच्यावर असून त्यात त्यास महान योद्धा दाखवले आहे संकटप्रसंगी खंबीरपणे लढा देऊन आपले शौर्य व मानवता सिद्ध करणारा वीर म्हटले आहे. भाषा अत्यंत प्रभावी आहे.

आपल्या परमवीर या काव्यात (१९६३) भाटी यानी कुमाऊँ रेजिमेंटचे मेजर सैतानसिंह याना गौरवपूर्ण श्रद्धांजली अर्पण केली आहे. १९६२ मधील चीनच्या आक्रमणाच्या वेळी लडाखमधील चुशुलच्या युद्ध विमानतळाचे रक्षण करता करता त्याने प्राणाची आहुती दिली होती.

रेवतसिह भाटी, सवाईसिह धमोरा, मुकनसिह, सुरजनसिह शेखावत, हनुमत-सिह देवडा, उदयराज ऊजल, अक्षयसिह रतनु, सौभाग्यसिह शेखावत, मानकुमारी राव, सांवलदान आसिया आणि जोगीदान कविया या अन्य कवीनीदेखील सैतान-सिह आणि इतर वीराना काव्यमय श्रद्धाजली अर्पण केली आहे त्या वीरामध्ये परमवीर चक्र विजेते पीरुसिह याचाही समावेश आहे. चीनच्या भारतावरील आक्र-मणात त्यांनी प्राणार्पण केले.

रामेश्वरदयाल श्रीमालीचे हाडी राणी (१९६५) हे मुकुल याच्या सैनाणी-मध्ये सागण्यात आलेल्या कथेवरच आधारलेले आहे नवविवाहिता हाडी राणीने आपल्या पतीला युद्धावर जाण्याचा आग्रह केला. युद्धावर निघालेल्या पतीने दूत पाठवून राणीला तिचे काही तरी स्मृतिचिन्ह द्यायला कळवले. हा प्रेमविव्हल वीर युद्ध करताना आपल्यामुळे विचलित होईल असा संशय वाटल्याने राणीने स्मृतिचिन्ह म्हणून आपले मस्तकच कापून पाठविले. राणीच्या या धीरोदत्त त्यागाला कवीने मनःपूर्वक गौरवपूर्ण श्रद्धाजली वाहिली आहे नारायणसिंह भाटीचे दुर्गादास आणि श्रीमालीचे हाडी राणी ही दोन्ही काव्ये मुक्तछंदात आहेत. श्रीमालीच्या बावनो हिमलो (१९७१) मध्ये महात्मा गाधीचे जीवन, कार्य आणि ज्या आदर्शा-साठी ते झुजले त्याचे वर्णन आहे. ते डिंगलगीताच्या परंपरागत शैलीत आहे.

रामसिह सोलकीचे जननायक प्रताप (१९७६) हे काव्य राणा प्रतापावर असून राणा प्रतापला त्यात देशासाठी सर्वस्वाचा त्याग करणारा स्वातंत्र्यासाठी लढणारा उच्च आदर्श आणि मूल्याची प्राणपणाने जपणूक करणारा लोकाचा नेता या रूपात दाखवले आहे. काव्यात २३४ सोरठे आहेत.

राणा प्रतापाचे शौर्य आणि हल्दीघाटीचे युद्ध यावर आणखीही काही कविता लिहिल्या गेल्या आहेत. त्यांचे स्वरूप निवेदनात्मक आहे श्रद्धाजलीचे असे नाही

ठाकूर रणवीरसिंह शक्तावत 'रसिक' याच्या प्रताप पताका (१९७३) या काव्यात राणा प्रतापची २३६ दोह्यांमध्ये प्रशंसा करण्यात आली आहे. कुवर उम्मेदसिह खाडासर याचे ओळयू (१९५६) आणि दिनेश मिश्र याचे भारत सूर्य

(१९६५) ही दोन्ही लघुकाव्ये असून त्यात अगदी सोप्या राजस्थानीमध्ये हल्दी-घाटीच्या लढाईचे राणाच्या स्थितीचे वर्णन केलेले असून ते टॉडच्या लिखाणावर बहुतेक आधारलेले आहे.

## (२) निसर्गकाव्य

प्राचीन राजस्थानी साहित्यात निसर्गाचे चित्रण मानवी भावनाची प्रेरणा या स्वरूपात केलेले आढळते, केवळ निसर्ग म्हणून स्वतंत्र वर्णन आढळत नाही मागे प्राचीन काळात उल्लेखिलेले वसतविलास आणि काही जुनी स्फुट काव्ये मात्र याला अपवाद आहेत. आधुनिक काळात एक वस्तू म्हणून निसर्गाच्या चित्रणाला चद्र-सिंहाच्या वादळी या, लहान ढगाच्यावर लिहिलेल्या काव्यापासून सुरवात झाली. यात १३० दोहे आहेत. चद्रसिंहाची दुसरी कविता राजस्थानात उन्हाळयात वाह-णाऱ्या गरम वाऱ्यावर आहे. तिचे नाव लू (१०४ दोहे) ही कविता निसर्ग-कवितामध्ये अधिक महत्त्वाची आहे. या कवितांमध्ये पाऊस आणि उन्हाळा यांचे मोठे सूक्ष्म, नैसर्गिक आणि चित्रमय वर्णन केले आहे अभिव्यक्ती प्रभावी आणि जोरदार आहे वादळीमध्ये पावसामुळे वाटणारा सानंद उत्साह वर्णिलेला आहे लूमध्ये उष्ण वाऱ्याच्या भयंकरपणाचे वर्णन असून त्यामुळे सजीव प्राण्यांना होणारे कष्ट वर्णिले आहेत. त्यानंतर मात्र मेघाना जीवनदान देणारा म्हणून त्या वाता-वरण स्थितीचे वर्णन करण्यात आले आहे निवडक शब्दयोजना आणि निसर्गाचे बारीक निरीक्षण ही या काव्याची वैशिष्टये आहेत या विभागातील चद्रसिंहाचे योगदान अद्वितीय आहे

कलायण (१९४९), दसरेव (१९५५) आणि प्रकृती सईकडो (१०० पदे) या नानूराम सस्कर्ताच्या कविता निसर्गावरील असून त्या त्यांच्या छप्पय सतसई (१९७२) मध्ये अन्तर्भूत आहेत. त्या महत्त्वाच्या समजल्या जातात कलायणमध्ये केवळ पावसाळयाचेच वर्णन नाही, तर निसर्गक्रमानुसार येणाऱ्या उन्हाळा, हिवाळा, इ सर्व ऋतूंचे वर्णन आहे. शिवाय त्या अनुषंगाने लोकांच्या सर्वसामान्य जीवनाचे वर्णन आहे दसदेव या काव्यात दहा ग्रामदेवताचे महत्त्व सागितले आहे आणि तेही अतिशय साध्या पद्धतीने. दहापैकी पाच देव नीम, खेजडा, फोग, झाडखो आणि जाळ हे वृक्ष आहेत तर उरलेले पाच कूवो, जोडो, धोरा, खादेडो आणि खाण ही पृथ्वीची विभिन्न परिस्थितीतील रूपे आहेत. प्रकृती सइकडोमध्ये निसर्गा-तील वस्तूचे मानवी भावनाच्या आणि कृतींच्या अनुषंगाने छप्पय छंदात वर्णन करण्यात आले आहे

मनोहर शर्मानेही आपल्या रसधारामध्ये 'उषा' 'वनदेवी' आणि 'किरण' यांसारख्या स्फुट कवितात निसर्गविषय हाताळलेले आहेत अरावली की आत्मा

(१९४७) मध्ये 'अरावली', 'झरणो' आणि टीबा' यांचा समावेश आहे. गजमोती (१०० पदे) या आणखी एका काव्यात निसर्गाकडे गूढरम्य जिज्ञासेने पाहिलेले दिसते

नारायणसिंह भाटी यानी लिहिलेल्या सांझ (१९५४) या काव्यात ११५ पदे असून सध्यासमयाची मानवाची प्रतिक्रिया, इच्छा-वासना, ग्रामीण जनतेची कामे आणि त्यापेक्षा निराळे म्हणजे सध्यासमयाच्या सौंदर्याचे वर्णन आहे. सांझ-मध्ये भरपूर कल्पनाविलास आणि जानपद जीवनाचे सुदर वर्णन आहे.

सुमेरसिंह शेखावत याचे मेघमाळ (१९८४, वि. सं. २२२१) हे काव्य १०८ पदांचे असून त्यात वर्षा ऋतूतील घनदाट ढगाचे सौंदर्य वर्णिले आहे, काही ठिकाणी मानवी सुखदुःखाचा त्या अनुषंगाने उल्लेख आहे. काही ठिकाणी या काव्यावर कालिदासाच्या मेघदूताची छाप पडलेली दिसते

उदयवीर शर्मा याच्या डाफी (१९७३) या काव्यात थंडीची लाट व तिचे निसर्ग व सजीव प्राण्यांवरचे भयंकर परिणाम याचे वर्णन आहे. भाषा साधी आणि वाक्प्रचारयुक्त आहे.

कल्याणसिंह राजावत यांचे 'परभाती' (१९७९) हे मोठे निसर्गकाव्य निसर्गाचे मानवीरूप देऊन वर्णन करते.

ही सर्व काव्ये निसर्ग व मानवी जीवन यांचे समिश्र चित्र उभे करतात असे स्थूल मानाने म्हणता येईल. मानवी विचार आणि भावना याचे निसर्गावरचे आरोपण अतिशय चपखल आहे. सांझमध्ये ही प्रवृत्ती अधिक दिसते.

ह्या केवळ निसर्गावरच असलेल्या कविताव्यतिरिक्त निसर्गाचे विविध पैलू दाखवणाऱ्या अनेक गीतमय पद्यरचना आहेत. अशा कवींमध्ये कन्हैयालाल सेठिया, गजानन वर्मा, किशोर कल्पनाकांत, मनोहर 'प्रभाकर', रघुराजसिंह हाडा (फूल केसूला फूल, १९७६), कल्याणसिंह राजावत, सौभाग्यसिंह शेखावता सुमनेश जोशी, गणेशीलाल व्यास 'उस्ताद', मदनगोपाल शर्मा, त्रिलोक गोयल, मेघराज 'मुकुल', सत्येन जोशी, शक्तीदान कविया आणि नारायदत्त श्रीमाली (काव्यसग्रह मि. र. १९६३) यांचा समावेश आहे.

गजानन वर्मा याचे बारहमासामध्ये वर्षाच्या बारा महिन्यांचे वर्णन आहे, परन्तु जानपद जीवनावर भर आणि गेय स्वरांचे प्राबल्य यामुळे हे काव्य इतर परपरागत काव्यापेक्षा निराळे भासते तत्त्वज्ञानात्मक तर्क आदर्शवादाची अभि-व्यक्ती आणि मानवी समस्यावरच्या तोडग्याचे माध्यम म्हणून निसर्गाची निवड केल्याचे दिसते. कन्हैयालाल सेठिया याच्या काव्यात हा कल प्रामुख्याने दिसतो. मनोहर शर्मा याच्या काव्याप्रमाणे येथेही निसर्गाकडे गूढरम्य जिज्ञासेने पाहिले

आहे. या दृष्टीने सेठियाचे काव्य महत्त्वाचे आहे. काही वेळा, निसर्गातील वस्तूचे वर्णन करताना अखेरीस एखादे शाश्वत सत्य सांगितलेले असते किंवा एखादा विचार अथवा अनुभव निसर्गाच्या, उपमा-उत्प्रेक्षायुक्त वर्णनाद्वारे सांगितलेला असतो कल्पकतेची डूब असलेली ही शैली अद्वितीय आहे. या शैलीचे अध्वर्यू म्हणून कन्हैयालाल सेठिया यांच्याकडेच अंगुलीनिर्देश करावा लागेल. त्यांच्या मीझरमध्ये (१९७२, वि स. २०२९) अशा अनेक कविता समाविष्ट आहेत. त्यांची नावे अशी– 'झर झर पाका पान पडई', 'भवरो', 'दूबडी', 'पपीहो', 'पछी', 'माटी', 'गीत', 'चिडकल्या', 'सखरियो', इत्यादी.

लीलटास (१९७४) आणि घर कूचा धर मजला (१९७९) मा काव्याद्वारे कन्हैयालाल सेठियाने नवी दिशा दिली. या कविता म्हणजे केवळ विचारप्रणाली नव्हे, तर कवीच्या अनुभवातून आणि मानवी अस्तित्वाच्या सखोल जाणिवेतून निर्माण झालेली अनुभूती आहे. या काव्यात भारतीय सांस्कृतिक मूल्यावरची त्यांची श्रद्धा प्रतिबिंबित होते, विचाराना प्रेरणा मिळते

निसर्गातील वस्तूची, प्रागतिक विचारसरणीची अभिव्यक्ती करण्यासाठी निवड करण्यात आली आहे. याची उदाहरणे म्हणून 'मुकुल' यांचे 'डाफर' आणि 'चियातावडो', रेवतदान चारण यांचे 'इन्कलाब री आंधी', गजानन वर्मा यांचे 'रोहिडो', ईश्वरानन्द शर्मा यांचे 'रोहिडै रा फूल' यांची नावे घेता येतील.

या ना त्या रूपात निसर्गाचे वर्णन करणाऱ्या इतर कवींची नावे अशी— रामगोपाल शर्मा 'नवल', रशीद अहमद 'पहाडी', ओंकार पारीक, लक्ष्मणसिंह 'रसवन्त', रघुराजसिंह हाडा, जमनाप्रसाद थाडा 'राही', गोपाल लाल प्रजापति; माणक तिवारी 'बन्धु', सीताराम महर्षी, शान्तिलाल भारद्वाज 'राकेश', बालकृष्ण थोलम्बिया, ब्रजेश 'चंचल', कानसिंह भाटी. दयाशंकर आर्य, ब्रजमोहन माथुर, सूर्यशंकर पारीक, गौरीशंकर आर्य, गंगाराम पथिक, नंदकिशोर पारीक, विश्वनाथ 'विमलेश' आणि दुर्गादानसिंह गौड.

बहुतेक सर्व कविता पर्जन्य, ढग, वर्षा ऋतू आणि श्रावण—वाळवंटात राहणाऱ्यांना साहजिकच प्रिय असणाऱ्या—या विषयावर आहेत. नंतर क्रमांक लागतो फाल्गुन महिना आणि वसंत ऋतूचा. चांदणी, अमावस्या, पाणवठा, प्रभात, खेजडा, जाल आणि चम्बळ नदी हे इतर काही विषय आहेत.

## (३) गेय आणि इतर काव्य

### १) कथाकाव्य

शूर वीर व त्यांच्या शौर्याची प्रशंसा ही चारण काव्य आणि राजस्थानी लोकसाहित्याची परंपरा आहे. ही परंपरा आधुनिक काळातही चालू राहिली; परंतु

थोड्या कमी प्रमाणात शूरवीर, शौर्याबद्दलच्या दंतकथा, स्वार्थत्याग, सन्मान, मानवी गुण, स्वातंत्र्य आणि उच्च आदर्शांबद्दल प्रेम हे विषय कवींनी राष्ट्रभावना जागृत व दृढमूल करण्यासाठी निवडले.

'मुकुल' याच्या सैनाणी काव्याचा या आधी उल्लेख आलेलाच आहे. ते काव्य वरील दृष्टीने दखल घेण्याजोगे आहे. 'हिरोल', 'आन री बात', 'कोडम दे', 'चवरी' आणि 'राणी पद्मिनी' (सैनाणी री जागी जोत, १९६७ किरत्या १९६८) यासह त्यानी अनेक कविता लिहिल्या तितकीच प्रभावी आणि महत्त्वाची कविता म्हणजे 'पातळर पीथळ' (मींझर १९७२) ती कन्हैयालाल सेठिया याने रचली आहे. राणा प्रतापाचे जगलात झालेले हाल आणि कवी पृथ्वीराजने त्याला पाठविलेले पत्र याची हकीगत यात आहे हे काव्य इतिहास आणि लोकप्रिय दतकथा यावर आधारित आहे.

बहुतेक सर्व कविता सत्य परिस्थितीवर आधारलेल्या आहेत आणि एकाच विषयावर अनेक कविताही आहेत.

पौराणिक आणि लौकिक प्रेमकथा आणि लोकप्रिय दंतकथावरही कविता रचल्या गेल्या अशा प्रकारच्या परंतु नाहीशा होत चाललेल्या परंपरेतील सर्वोत्कृष्ट ठरलेली कविता म्हणजे गिरधारीसिंह पडिहार याची जागती जोता (१९६०) याच प्रकारातील त्याच्या इतर उल्लेखनीय कविता अशा— 'मेघनाद', 'सीसपाल, पुरू, पाबूजी'

मुकुल, सेठिया आणि पडिहार याच्या कविता त्यातील रसाळपणा, सवाद आणि शैली यामुळे फार वरच्या दर्जाच्या ठरतात. हे कवी अनेक भावना, व्यक्तीच्या अन्तर्मनातील सघर्ष, त्वरित कृती आणि हृदयद्रावक घटना याचे प्रभावी चित्रण करताना दिसतात. मनोहर शर्मा यांच्या 'अरावली की आत्मा' आणि 'गीतकथा' ही काव्ये पारपरिक दोहा वृत्तातील आणि महत्त्वपूर्ण आहेत कथा पद्यात सांगण्याचा प्रयत्न केलेल्या इतर काही कवींची व त्यांच्या कृतीची नावे अशी— बनवारीलाल मिश्र 'सुमन' (प्रेमप्रदीप १९६९ वि. सं. २०२६) करणीदान बारहट (झर झर कथा), सूरज सोलकी (जुनी वातां), रामपाली भाटी (चार गाथा १९५३), रघुराजसिंह हाडा (अण बाच्या आखर १९७०), नानूराम सस्कर्ता (साकळ सधाण १९७३) आणि दयाशंकर आर्य (मरु मींझर १९६६).

## २) विनोदी आणि उपरोधिक

विनोदी आणि उपरोधिक काव्याचा हेतू आनंद देणे. कुप्रथा आणि त्रुटी उघड करणे आणि सुधारणा करणे हा असतो. सत्यनारायण 'अमन' याने स्वतःच्या काव्याविषयी जे म्हटले आहे ते इतरांनाही तितकेच लागू आहे :

अरे अमन, तू घेतलेले चिमटे म्हणजे 'नीम' आणि 'गिलोरी'च्या पानाचा काढा आहे. त्याने तोंडात कडू चव येते पण शरीराचे आरोग्य पुन्हा सुधारते ! (चुडिया १९६१ वि. स. २०१८).

बदलती सामाजिक परिस्थिती आणि कल्पनानुसार विनोद आणि उपरोधही बदलतो. जीवनातील वाढती गुंतागुत आणि विविधता यामुळे अशा काव्याला भरपूर वाव आहे. व्यक्तिगत, राजकीय, सामाजिक, धार्मिक आणि सास्कृतिक वैचित्र्य वा विक्षिप्तपणावर अशा कविता लिहिल्या गेल्या आहेत.

विश्वनाथ 'विमलेश' हा या क्षेत्रातील अग्रणी होय. त्याच्या कविताचे विषय सामाजिक आणि राजकीय असून त्याने मोठे मजेदार चिमटे घेतले आहेत त्याच्या कवितांचा 'नव रस मे रस हास्य' हा संग्रह १९७३ मध्ये प्रकाशित झाला छेडखानी, कुचरणी आणि हासकोली यात आधी प्रसिद्ध झालेल्या कविताचाही यात समावेश आहे. जनता को दरबार (१९७७) मधील त्याच्या ४८ कवितांत आणीबाणीतील (जून १९७५–मार्च १९७७) अनुभवाच्या प्रतिक्रिया व्यक्त झाल्या आहेत. त्याने त्याच्या वैशिष्टचपूर्ण शैलीत, आणीबाणीतही देशाचा कारभार चालवलेल्या चांडाळचौकडीबाबतही लिहिले आहे

नागराज शर्मा याचीही हीच शैली आहे. त्याच्या बहुतेक कविता (विरखा बीनाजी, थारो के त्या हा १९७४) सामाजिक आणि राजकीय विषय हाताळतात.

सत्यनारायण 'अमन' चूडिया या काव्यात राजकीय परिस्थितीचा प्रत्यक्ष उल्लेख करतो आणि वाचकाला अस्वस्थ करतो विमलेशप्रमाणे तोही अतिशय प्रभावी आहे.

प्रेमजी प्रेम याच्या चमको (१९७३) सग्रहातील कवितात संधीसाधू राजकीय नेत्याचा आणि त्याच्या पित्याचा उपहास करण्यात आला आहे. पिरोल मे कुत्ती ब्याई (१९६९) या संग्रहातील आपल्या कवितात अन्नारीम 'सुदामा'ने भौतिकवादी दृष्टिकोनामुळे निर्माण झालेल्या भ्रष्टाचारी व कुमार्गी जीवनाचे, विशेषत' शहरातील बर्णन केले आहे. बुद्धिप्रकाश पारिकने चूटक्या (१९६४), चवडिका (१९६४), निरसा (१९६४), कलदार आणि इंदरसू इटरव्हयू (१९६९) या कवितात कनिष्ठ मध्यम वर्गातील लोकाची असहाय्यता, गरिबी आणि प्रचलित सामाजिक कुप्रथा अचूकपणे निदर्शनाला आणून दिल्या आहेत.

## ३) पुरोगामी

राजस्थानी कवी बदलत्या राजकीय आणि सामाजिक परिस्थितीविषयी सतर्क होते आणि काळाच्या पुढे होते. बांकीदास आणि शकरदान सामौर यांची

राजकीय दूरदृष्टी आणि उमरदान लालस यांची सुधारणेची प्रवृत्ती यावर आपण आधीच विचार केला आहे स्वातंत्र्यानंतर कवींना राजकीय, सामाजिक आणि आर्थिक क्षेत्रातील कठोर वस्तुस्थितीची जाणीव झाली. त्यांनी या क्षेत्रातील जीवघेणी स्पर्धा, भ्रष्टाचार, अन्याय, त्रुटी, विषमता आणि शोषण यांचं पितळ उघड पाडलं त्यानी सामान्य माणसाच्या मुख्यतः शेतकऱ्यांच्या दुःखाला व हालअपेष्टाना वाचा फोडली. प्रत्येकाची शैली अर्थातच निरनिराळी होती. काही थोड्या कवींनीच विनोद आणि उपहासाची कास धरली. इतर अनेकानी दोन प्रकारे दयनीय अवस्थेचे वर्णन केले. (१) वस्तुस्थितीकडे लक्ष वेधून आणि धोक्याचा सरळ इशारा देऊन. (२) अडचणी असल्या तरीही मूल्याच्या मार्गावर अढळ निष्ठा ठेवायला सांगून

पहिल्या प्रकारच्या काव्यात ग्रामीण जीवनातील सुखदु:खाचे चित्रण आहे.

गणेशिलाल व्यास 'उस्ताद' हा सामर्थ्यशाली कवी या क्षेत्रातील अग्रणी आहे. तो स्वत: स्वातंत्र्यसैनिक आणि भरपूर अनुभव घेतलेला होता. त्याने सर्व प्रकारच्या अन्यायाविरूद्ध आवाज उठवला सरळपणा, विचाराची सुस्पष्टता आणि जानपद भाषा हे त्याच्या काव्याचे वैशिष्टच आहे त्याच्या काही कविता जनकवी उस्ताद (१९७२) मध्ये प्रसिद्ध झाल्या आहेत. त्याने नृत्यगीत रूपक, नृत्यगीत, इत्यादी रचनाही लिहिल्या.

सुमनेश जोशी या विभागातील आणखी एक उल्लेखनीय कवी आहे मुकुल याचे योगदानही महत्त्वाचे आहे. त्याने सातत्याने अनेक विषयांवर अचूक भर देऊन आणि हेतुपूर्ण उपरोधाचा वापर करून लिहिले. गजानन वर्मा, रामेश्वरदयाल श्रीमाली आणि इतर काही जणांच्या कवितेत ग्रामजीवनाचे स्पष्ट चित्र दिसते. भाषा नैसर्गिक आणि ओघवती असून प्रागतिक विचार व्यक्त केलेले दिसतात. मोहम्मद सादिक यानी जूझाती (१९७९) मध्ये मनुष्याचा अस्तित्वासाठीचा अथक आणि दुर्मिळ अशा आशावादी वृत्तीने दिलेला लढा वर्णिला आहे रेवतदान चारण, प्रेमचंद रावल, मनुज दीपावत, त्रिलोक शर्मा, श्रीमंतकुमार व्यास, भीम पांडिया आणि इतराच्या कवितावर साम्यवादी विचारसरणीचा प्रभाव दिसतो. रेवतदान चारण याच्या कविता उत्तम वर्णन, खोल आशय आणि तरल भावना याच्यासाठी उल्लेखनीय आहेत.

देशभक्तीपर कविता लिहिणाऱ्या बहुतेक सर्व कवींनी प्रगतीशील कविता लिहिण्याचा प्रयत्न केला. किशोर कल्पनाकांत, सत्यनारायण 'अमिन', ओंकार पारिक, रघुराजसिंह हाडा, कल्याणसिंह रजावत, सत्यप्रकाश जोशी, कन्हैयालाल सेठिया, हणूंतसिह देवडा, वेद व्यास, भवरसिंह सामोर, दुर्गादानसिंह गौड, हरि-वल्लभ 'हरि', गिरधारीलाल मालव, गौरीशंकर शर्मा आणि माणक तिवारी 'बंधू'

या कवींनी देशभक्तीपर आणि प्रगतील अशा दोन्ही प्रकारच्या काव्यात भर घातली.

दुसऱ्या प्रकारच्या कवितात मानवी गुणांच्या मूल्यावर भर देण्यात आला आहे 'आधुनिक काळात मानवाच्या मेंदूची प्रगती झाली आहे, हृदय मात्र आकसले आहे', 'माणसे खूप आहेत पण खरे मानव प्राणी कमी आहेत', 'मनुष्याने सर्व सकटातही मान उच ठेवली पाहिजे' या आणि अशा प्रकारच्या कल्पनांवर प्रभावीपणे व सवेदनाशील वृत्तीने भर देण्यात आला आहे. गीतमय काव्यात या अशा कविताचा एक वर्ग तयार होतो

ह्या प्रकारची कविता लिहिणारे उल्लेखनीय कवी आणि त्यांच्या कृतींची नावे अशी—

कन्हैयालाल सेठियाचे 'मिनख', मुकुल यांचे 'थ्यारी मे माणखो', 'माणस और कुमाणस' आणि 'मिनख बापडो', नारायणसिंह भाटी याचे 'माणस', गणपतीचद्र भंडारी यांचे 'मिनख पणै रो काळ', माणक तिवारी बधू याचे 'लबेल' आणि 'मानखै रा आसार', सूर्यशकर पारीकचे 'दीसत रा मिनख', सत्यप्रकाश जोशी याचे 'जै मानखा' आणि 'धरतीरा दीया', गौरीशकर कमलेश याचे 'मनख नागो होतो जा रियो' मूलचद प्रणेश याचे 'आवो आपां आदमियत उगावा', दीनदयाल ओझा याचे 'मानवता रा आखर', चंडीदान सधू याचे 'मिनख रो माप', विनोद सोमाणी हंस याचे जिवनै रो मरम्' आणि 'मिनखा जू' आणि दयाशंकर आर्य याचे 'आदमी सू प्यार कर तू'.

## ४) मातृभूमीचे प्रेम

अनेक आधुनिक कवींनी राजस्थानबद्दलचे प्रेम आणि आदरयुक्त अशी स्तुतीपर कविता लिहिली आहे. अशा कवितांत राजस्थानच्या लोकाची वैशिष्टचे, निसर्ग, ऐतिहासिक स्थाने, शूरवीर आणि राजस्थानच्या वैभवाचे वर्णन केले आहे. काही कविता तर इतक्या लोकप्रिय झाल्या की त्यांना लोकगीताचे स्वरूप प्राप्त झाले. कन्हैयालाल सेठिया याची 'धरती धीरा री' (मिझर) हे त्याचे उत्तम उदाहरण आहे

गणपतीचद्र भंडारीचे 'प्यारो मरुधर देस' (रक्तदीप), ओंकार पारीकचे 'गीत धीरा वीरा री धरती रो' (मोरपख), मदनगोपाळ शर्माचे 'धोरां हाळो देश' आणि 'ओ रग रुडो राजस्थान' (गोखै ऊभी गोरडी), माणक तिवारी बंधूचे 'जलम् भोम्' (आखरमाळ), अमनचे 'माता नै बंदण' (आज रा कवी संग्रह), रामदेवचे आचार्यंचे 'नित राजस्थान जियो' (राजस्थान के कवी काव्यसग्रह भाग २), गणपती स्वामीचे 'मुरधर देश' (राजस्थानके कवी काव्यसग्रह भाग २), चडिदान

सधूचे डिंगल गीत 'रुडो राजस्थान' (राजस्थानके कवी काव्यसंग्रह भाग २) ही काही त्याच प्रकारच्या काव्याची उदाहरणे आहेत.

## ५) देशभक्तीपर आणि वीररसात्मक

राजस्थानातून भारतीय लष्करात अनेक सैनिक भरती केले जातात. परिणामी राजस्थानच्या पुत्रांनी आपल्या सशस्त्र दलाच्या वैभवात मोठीच भर घातली आहे त्यापैकी अनेक जणांना मोठे सन्मान प्राप्त झाले आहेत, तर कित्येकांनी युद्धात वीरमरण पत्करले आहे. त्याचे शौर्य आणि त्याग यापासून अनेक कवींना त्यांची प्रशंसा करण्याची प्रेरणा मिळाली आहे. चीन आणि पाकिस्तानबरोबरच्या युद्धामुळे शौर्य आणि देशभक्तीला काव्यात स्थान मिळालेले दिसते. अशा प्रकारच्या कविता दोन्ही म्हणजे पारंपरिक आणि आधुनिक शैलीत आहेत त्यातील देशभक्तीचा सूर आणि त्याची विपुल संख्या यामुळे त्या इतर राजस्थानी कवितांपेक्षा वेगळ्या उठून दिसतात प्रचलित राष्ट्रीय भावनांचे बहुतेक सर्व कवींनी चित्रण केले आहे. त्यांची अभिव्यक्ती जोरदार आणि शैली वैयक्तिक आहे. अशा कवितांत बहुतांश स्वार्थ-त्याग, निष्ठा, वैभव, उत्साह, आव्हान आणि तुच्छता अशा विविध भावनांचे चित्रण दिसते. श्रद्धांजलीरूप काव्याचा विचार करताना आम्ही काही कवींचा उल्लेख केला आहेच. आणखी काही नावे अशी— कन्हैयालाल सेठिया 'मुकुल', कल्याणसिंह राजावत, रशीद अहमद पहाडी, दयाशंकर आर्य, करणीदान बारहट, छगनलाल शर्मा, रघुराजसिंह हाडा, गोपाललाल प्रजापती, माणक तिवारी 'बन्धू', सूर्यशंकर पारीक, सीताराम महर्षी, हरिवल्लभ 'हरि', ब्रजेश 'चकल', प्रेमजी 'प्रेम', राधेश्याम शर्मा, शिव पाडे, कान्ह महर्षी, नानूराम संस्कर्ता, मकबूल अहमद, बनवारीसिंह सामोर, गिरधारीसिंह पडिहार, 'उस्ताद', सुमनेश जोशी, अमर देपावत, रेवतदान चारण, 'विमलेश', बुद्धिप्रकाश पारिक, लक्ष्मणसिंह रसवत, त्रिलोक गोयल, गजानन वर्मा, रावत सारस्वत, भीम पांडिया, निरजननाथ आचार्य, मदनगोपाल शर्मा, सत्यप्रकाश जोशी, श्रीमंतकुमार व्यास, देवकिसन राजपुरोहित आणि बस्तीमल सोलंकी.

## ६) गेय कवने आणि शोकगीते

जुन्या राजस्थानी काव्यात विपुल प्रमाणात 'मरसिया' लिहिल्या गेल्या आणि ही परंपरा अद्याप नष्ट झालेली नाही. मरसिया आणि शोकगीत याचे वरवर रूप सारखे दिसते; परंतु अगदी एखाद्याच व्यक्तिगत तीव्र भावनेमुळे त्यात फरक करता येतो. मरसियामधील शोकाचे स्वरूप व्यक्तिगत असते, शोकगीतातील भावना अधिक सार्वत्रिक, वैश्विक असते. महात्मा गांधींच्या मृत्यूनंतर अशी शोकगीते लिहिली गेली, ती उल्लेखनीय आहेत. कन्हैयालाल सेठिया याचे 'बिखै रा आख में

आसू' मुकुल याचे 'लोरी', 'धर्म रो मर्म गाधी जाण्यो' (गाधी जीवन ज्योती, १९७०), गिरीधारीसिंह पडिहार याचे 'ओ चार भुजा विष्णू है (गांधी गाथा या सग्रहात) आणि करणीदान बारहटचे 'जद मिनखपणो हिडकायो तो (गाधी गाथा) या तशा कविता आहेत. या शोकगीताव्यतिरिक्त अनेक प्रशंसापर कविता महात्मा गाधीवर रचल्या गेल्या. त्यांचा एक निराळा वर्गच होऊ शकेल त्या गाधी गाथा, गाधी जस प्रकाश आणि इतरत्र प्रकाशित झाल्या आहेत.

गेय कवनात एखाद्या वस्तूला वा सजीव वस्तूला संबोधून मानवी भावनाचे त्याच्यावर आरोपण केलेले असते. नारायणसिंह भाटी, मदनगोपाल शर्मा, सत्य-प्रकाश जोशी, कल्याणसिह राजावत आणि इतरांनी उत्तम गेय कवने लिहिली आहेत. मात्र या क्षेत्रात अद्यापही कवी प्रतिभेचा फारसा विलास दिसलेला नाही.

## ७) प्रेम आणि शृंगार

प्रेम आणि शृगारविषयक काव्यांवर शैली, भाषा, कल्पनाविलास, उपमा आणि स्वर याबाबतीत राजस्थानी लोकगीताचा प्रभाव दिसून येतो त्यामुळे साहजिकच ते जास्त लोकाना आवडते आणि ते प्रभावीही आहे. अशा कविता मुख्यत्वे दोन प्रकारच्या आहेत : (१) कौटुबिक जीवन आणि ग्रामजीवनाचे वर्णन करणाऱ्या (२) मानवी भावना, सुख आणि दुःखाचे चित्रण करणाऱ्या. एकदरीत या दोन्ही प्रकारच्या काव्याचे वातावरण मुख्यत्वे ग्रामीण आणि भूतकालीन आहे. अनेक कवितात दोन्ही पैलूचे दर्शन घडते. ओल्यू (प्रियजनाची स्मृती) याचाही यात समावेश आहे गजानन वर्मा, ओंकार पारिक आणि रामगोपाल शर्मा 'नवल' या तीन कवींनी शृगारिक आणि प्रेमकाव्ये लिहिली इतर कवीची नावे अशी—— रघुराजसिंह हाडा, वेद व्यास, बालकृष्ण थोलबिया, 'मुकुल', माणक तिवारी 'बंधु', नारायणसिंह भाटी, त्रिलोक गोयल, गोरधनसिंह शेखावत, चंद्रकुमार 'सुकुमार', कल्याणसिंह राजावत, उदयवीर शर्मा आणि सत्येन जोशी.

दुसऱ्या प्रकारच्या कवितांना ओल्यू किंवा ओलू असे नाव आहे, राजस्थानी लोकसाहित्य ओल्यू काव्याने समृद्ध आहे. आधुनिक साहित्याबाबतही हेच म्हणता येईल. या प्रकारात तीन प्रदीर्घ काव्येही रचली गेली आहेत. ती अशी– ओलू (१९६४, १२१ पदे) कवी नारायणसिह भाटी, ओलू री ओल्या (१९७०, १५७ पदे) कवी तेजसिंह जोधा आणि 'प्रीत पीड री पाल (१९७१, १०१ पदे) कवी सीताराम महर्षी. या काव्यात थोडी कारुण्याची छटा आहे.

भाटींच्या ओलूमध्ये नवविवाहित विरहिणी वधूच्या भावना साध्या परतु हृदयस्पर्शी पद्धतीने व्यक्त करण्यात आल्या आहेत. काही ठिकाणी भाषा अतिशय सूचक आहे. जोधाच्या कवितेत एक व्यक्तिगत प्रभावी भावना दिसते. ह्या कवितेवर

हिंदी कवी प्रसाद याच्या आंसू या कवितेचा प्रभाव पडलेला दिसतो. वृत्तही एकच आहे. 'प्रीत पीड री पाळ' मध्ये विचारापेक्षा भावनेचे प्राबल्य दिसते. सीताराग महर्षी मूलत: नाजूक भावना आणि कारुण्याचा कवी आहे. मचली मत म्हारो (१९७७) या त्याच्या काव्यसग्रहावरून हे सिद्ध होते.

या प्रकारच्या काही लहान कविताही लिहिल्या गेल्या. सत्यप्रकाश जोशी याची ओलू, श्रीमतकुमार व्यास याची ओलूंडी या त्या कविता आहेत

## ८) नवकविता

राजस्थानी भाषेतील नूइ (नव)कविता ही हिंदीमधील नवकविता तसेच आधुनिक ब्रिटीश आणि अमेरिकन नवकवितेतून स्फुरली आहे. तीवर त्याचा प्रभाव पडलेला दिसतो

या काव्यामागची प्रेरणा मानवी मूल्यातील आणि नीती तत्त्वातील वेगवान बदल ही आहे परिस्थितीतील बदल त्याचप्रमाणे नागरी जीवनाची तऱ्हा, जुन्या नातेसबधातील फारकत, व्यक्तिस्वातंत्र्याची प्रवृत्ती, जीवनातील गुंतागुंत, जगण्यासाठीची धडपड, वैफल्य तसेच सामाजिक सबधांपासून वाढते दूरत्व, एकटेपणा यामुळे मानवी मूल्येही बदलली जीवन नगण्य, अर्थशून्य आहे आणि गुतागुत, हालअपेष्टा, इच्छा आणि अस्वस्थता हाच मानवाचा भोग आहे असे कवीला वाटते. त्याच्या दृष्टीने नागरी सामाजिक जीवन घटनाप्रधान आहे, त्यात परस्पर संपर्काचा अभाव आहे. असे विचार आणि त्या अनुषंगाने वाटणारा खेद नवकवितेत प्रतिबिंबित झाला आहे. अशा कवितेत पूर्ण विचार करून ठरवलेला जीवनाचा दृष्टिकोन किंवा घनिष्ट भावना दिसत नाहीत, तर जीवनाच्या प्रश्नावरची बौद्धिक प्रतिक्रिया दिसते प्रवृत्ती खाजगी व्यक्तिगत आहे त्यामुळे निराशावाद दिसून येतो म्हणूनच या कवितेतील दृष्टिकोन आणि परिस्थितीचा सदर्भ मर्यादित आहे

राजस्थानी नवकवितेत मुख्यत्वे ग्रामीण जीवनात झालेले बदल आणि व्यक्तीच्या जीवनात झालेले सर्वसाधारण बदल याचे प्रतिबिंब दिसते. 'मुकुल', कन्हैयालाल सेठिया, सत्यप्रकाश जोशी आणि इतराच्या कवितेस अशा बदलांची चुणूक दिसते; परतु ह्या प्रवृत्तीचे खरे दर्शन १९७०नंतरच्या युवा पिढीच्या काव्यात बहुतेक दिसते. तेजसिंह जोधा, हरमन चौहान, मणि मधुकर, रामेश्वरदयाळ श्रीमाळी, सावर दैया, गोवर्धनसिंह शेखावत, नद भारद्वाज, रामस्वरूप 'परेश', पारस आरोडा, प्रकाश परिमल, ओमप्रकाश भाटी, ओंकार पारीक, कृष्णगोपाल शर्मा, शिवराज छंगाणी, चंद्रप्रकाश देवल, प्रेमजी 'प्रेम' आणि इतर हे या नव्या पिढीचे प्रतिनिधी आहेत.

ही प्रवृत्ती अद्यापही विकसित होत आहे पण तिचे भवितव्य अनिश्चित आहे.

नानूराम सस्कर्ता याने आपल्या समय वायरो (१९५३) मध्ये आणि नारायणसिंह भाटी यानी आपल्या दुर्गादास (१९५६) मध्ये मुक्त छंदाचा वापर केला.

## गद्य

### (१) कादम्बरी

शिवचद्र भरतिया (१८५३–१९१८) हा कादम्बरी लिखाणाचा संस्थापक समजला जातो. त्याची कनक सुदर (१९०३) ही राजस्थानी भाषेतील पहिली कादबरी आहे. तिला त्याने नवल कथा हा लोकप्रिय गुजराती शब्द वापरला आहे. यात हजारीमल आणि मुरलीधर या दोन भावाच्या कुटुबाची कथा असून त्याद्वारे सामाजिक कुप्रथांचे चित्रण करण्यात आले आहे. मुरलीधरचे कुटुब सुधारणावादी तर हजारीमलचे पुराणमतवादी. लेखकाने मुरलीधराच्या कुटुबाच्या विचारांना उचलून धरलेले आहे.

श्रीनारायण अग्रवालच्या चम्पा (१९२५) कादबरीत वृद्धपणी केलेल्या विवाहाचे दुष्परिणाम दाखवण्यात आले आहेत.

दोन्ही कादंबऱ्या आदर्शवादी आहेत

चम्पाच्या प्रकाशनानंतर ३१ वर्षांनी श्रीलाल नथमल जोशीची आभै पटकी (१९५६) प्रसिद्ध झाली. या कादबरीत हिंदू विधवेच्या हालअपेष्टांची कथा असून प्रसंगोपात्त अधश्रद्धा आणि सामाजिक कुप्रथांचे चित्रण आहे. लेखकाने यात समस्येवरचे उत्तरही दिले आहे रामचद या धनवान व्यापाऱ्याची पत्नी किसना (कृष्णा) विधवा होते आणि नंतर पतीचा चुलतभाऊ मोहन याच्याशी तिचा पुनर्विवाह होतो.

जोशीची धोरां रो धोरी (१९६८) यात प्रसिद्ध विद्वान् डॉ. तेस्सितोरी याची कथा सांगण्यात आली आहे. अमर्याद उत्साह आणि महान आदर्श असलेली व्यक्ती असे त्याचे चित्रण केले आहे त्यांची एक बीनणी दो बीन (१९७३) ही कादंबरी टेनिसनच्या इनॉक आर्डन या कथाकाव्याचे गद्यमय राजस्थानी रूपातर आहे जोशी सुधारवादी आणि आदर्शवादी आहे. त्यामुळे त्याच्या या मताना अनुसरूनच घटनांची आणि व्यक्तिचित्राची निवड झाली आहे.

अन्नाराम सुदामा याच्या मैकती काया मुळकती धरती (१९६६) या कादंबरीत सुगनी (सुथारी नानी) नावाची वृद्ध स्त्री स्वतःची दुःखान्तिका सागते. तिच्या विधवा नणदेच्या चिथावणीने पतीने तिला टाकून दिलेले असते. तरीही तिची जीवनावरची श्रद्धा नष्ट होत नाही आणि ती हसतमुखाने सर्व संकटांना तोड देते

लेखकाने जीवनाचे वास्तववादी वर्णन केले आहे आणि स्वभूमीवरील प्रेमावर भर दिला आहे

अधी अर आस्था या दुसऱ्या कादंबरीत सुदामाने राजस्थानच्या ग्रामीण जीवनाचे चित्रण केले आहे. एका गरीब ब्राह्मण कुटुंबाची ही कथा आहे सामाजिक दडपशाही आणि दुर्दैव याना हे कुटुब कसे तोड देते याचे वर्णन आहे सुदामाची स्वत:ची अशी शैली आहे. त्यात म्हणी आणि वाक्प्रचारांना वापर दिसून येतो.

राजस्थानच्या एका खेड्याची कहाणी सुदामा याने आपल्या मेवै रा रुख (१९७७) या कादबरीत रगवली आहे. त्यात सुदामा याने जून १९७५ ते मार्च १९७७ दरम्यानच्या आणीबाणीच्या काळामधील ग्रामीण राजस्थानातील लोकाच्या भयकर अनुभवाचे कथन केले आहे, त्या काळातील राजकारण्याचा बदलता चेहरा-मोहरा, सक्तीची कुटुब नियोजन शस्त्रक्रिया आणि तथाकथित युवक नेत्याचे औद्धत्य याचे उत्कृष्ट चित्रण यात आहे. मात्र मुख्य भर, ग्रामीण जीवनात साव-काराचे असलेले महत्त्वाचे स्थान यावर आहे. गरीब असहाय्य जनता सावकारावर किती अवलबून असते आणि त्याला खूष करण्याचा तिचा करुण प्रयत्न याचे चित्रण त्यात आहे या कादबरीत सुदामाच्या शैलीने आणि भाषेने कळस गाठला होता

यादवेन्द्र शर्मा याने राजस्थानीत दोन कादंबऱ्या लिहिल्या– हूण गोरी किण पीव री (१९७०) आणि जोग संजोग (१९७३) हूं गोरी किण पीव री मध्ये सूर-जडी या, एका कुंभाराच्या विधवेची कहाणी आहे. नतर पतीचा धाकटा भाऊ माधो याच्याशी तिचा पुनर्विवाह होतो. काही ठिकाणी व्यक्तीचा मानसशास्त्रीय आलेख दिसून येतो तो अतिशय प्रभावी आहे. जोग संजोगमध्ये बटुक या मध्यम वर्गीय व्यापाऱ्याचा मुलगा गणेश याची कथा आहे. तो जात-पात-धर्म यांची बधने तोडून एका ख्रिश्चन मुलीशी विवाह करतो. यात दोन मुद्यावर भर देण्यात आला आहे– एक, आपण ठरवल्याप्रमाणे नव्हे तर नियतीच्या इच्छेनुसार घटना घडतात दुसरे, वरवर वाईट दिसणाऱ्या व्यक्तीची अन्तर्मने कधी कधी मानवता आणि दयाळूपणा यानी झगमगतात. हू गोरी किण पीव री ही कादबरी राजस्थानी ललित साहित्याचा अलकार मानली जाते.

छत्रपतीसिहाची त्रिशंकू (१९७४) ही नंदगावच्या जमीनदाराच्या एका कामदाराचा पदवीधर मुलगा पवन याची कहाणी आहे. पूर्वार्धात जमिनदाराचा मुलगा बैजू याची पत्नी लिना हिच्याबरोबरचे पवनचे प्रेमप्रकरण रगवले आहे. नंतर पवन अभ्यासासाठी दिल्लीला जातो व तेथे शैल नावाच्या मुलीशी त्याची ओळख होते ती क्रांतीकारकाच्या गटाची सदस्य असते तिच्यामुळे तो क्रातीकारी चळवळीकडे आकृष्ट होतो. काही क्रांतीकारकामध्ये त्याला वाईट हेतू आणि स्वार्थ

आढळतो. तो आपल्या गावाला परत जातो आणि आपली मालमत्ता शेतकरी आणि मजुरांना वाटून टाकतो. तो त्याची एक सहकारी सस्था स्थापन करतो आणि त्याचा अध्यक्ष बनतो. इतर सदस्याच्या कटामुळे तो हे पद गमावतो. ग्रामीण भागातील लोकही फार जलद गतीने शहरी लोकासारखे लबाड होत चालले आहेत हे त्याला कळून चुकते. शैल नदगावला येते व त्याच्या सुधारणेच्या योजनाना नापसती दाखवते अशा प्रकारे पवन गाव आणि शहर याच्यामधला त्रिशकू होतो. कादंबरीत ज्ञातीच्या सदेशापेक्षा प्रेमावर अधिक भर आहे. अगदी स्वस्त शृगार रंगवण्याचा मोह लेखकाने टाळायला हवा होता असे वाचकाला वाटते.

सत्येन जोशी याची कंवल पूजा ही कादंबरी जैसलमेरच्या प्राचीन इतिहासाबद्दल आहे राव विजयराव आणि गझनीचा महमूद यांच्यातील युद्धावर ती प्रामुख्याने आधारलेली आहे. राव तणोरचा शासक होता असे म्हटले जाते ऐतिहासिक घटना व काळ याचे वर्णन इत्यादी प्रशंसनीय आहे, परतु थोडे अधिक समजून घ्यायला हवे.

सीताराम महर्षी याच्या 'कुण समझै चंवरी रा कौल' (१९७६) आणि 'लालडी एक फेरूं गमगी' या दोन कादबऱ्या वैवाहिक वैमनस्यावर आहेत.

विजयदान देथाने 'तीडो राव' या आपल्या कादबरीत एका लोककथेचे आधुनिक कादबरीत रूपातर केले आहे. तीडो राव हा ढोंगी आणि लबाड दाखवण्यात आला आहे. धूर्तता व योगायोगाने त्याला यश मिळते

रामनिवास शर्मा याच्या 'काळ भैरवी' (१९७६) या कादंबरीत निसर्गाच्या आणि ग्रामीण वातावरणाच्या पार्श्वभूमीवर तांत्रिक पद्धतीबद्दल कथा सागितलेली आहे. जोधपूरचे राव मालदेव आणि मेडताचे विरमदेव याच्या नावाचा केवळ उल्लेख करून लेखकाला वाटते की ही कहाणी १६ व्या शतकातील आहे यावर वाचकांनी विश्वास ठेवावा मात्र त्याला काहीही ऐतिहासिक पाया नाही.

पारस आरोडा याची 'खुलती गाठा' ही लघुकादंबरी १९७७ मध्ये प्रकाशित झाली. तीन अपरिपक्व तरुण मुले व त्यांच्या मैत्रिणी याची ही कथा आहे. त्यापैकी एकाच्या समस्येवर लेखकाने आंतर-जातीय विवाहाचे उत्तर शोधले आहे. साध्या शैलीत लिहिलेल्या या कादबरीत विचारांची परिपक्वता फारशी दिसून येत नाही.

काही कादंबऱ्या हरावल, ओळमो आणि लाडेसर यासारख्या मासिकातून सपूर्ण किंवा क्रमश प्रसिद्ध झाल्या. त्यात दीनदयाळ कुंदन याची गँवार पाठो, किशोर कल्पनाकांताची धाडवी, रामदत्ता साकृत्य याची आभल्दे आणि लक्ष्मीनिवास बिर्ला याची पद्मिणी रो सराप यांचा समावेश आहे.

## (२) कथा

राजस्थानी साहित्य 'वात' नावाच्या कथांनी समृद्ध आहे, परंतु आधुनिक लघुकथा ही पाश्चात्य देशाची देणगी आहे. शिवचंद्र भरतिया हा याही क्षेत्रातील संस्थापक आहे. त्याची 'विश्रांत प्रवासी' ही लघुकथा प्रथम १९०४ मध्ये (वि. सं १९६१) कलकत्याच्या वैश्योपारक या हिंदी मासिकात प्रथम प्रकाशित झाली. यानंतर गुलाबचंद नागौरी याच्या 'बडी तीज' व 'बेटी की विक्री तथा बहू की खरिदी' या दोन कथा प्रकाशित झाल्या. (माहेश्वरी–अलिगढ, १९१२) आणि शिवनारायण तोष्णीवाल याच्या 'विद्या परमदैवतम्' व 'स्त्री शिक्षण को ओनामा' या दोन कथा नासिकच्या पंचराजमध्ये १९१६ त प्रसिद्ध झाल्या. त्यात सामाजिक प्रश्न हाताळलेले असून अखेर सुधारणावादी विचार प्रकट केलेले आहेत.

यानतर सुमारे २० वर्षानंतर म्हणजे १९४४–४५ दरम्यान मुरलीधर व्यास, श्रीचंद राय आणि इतरांनी लघुकथा लिहावयास सुरवात केली. राजस्थानी लघु-कथा लेखकावर हिंदी, बंगाली आणि गुजराती लघुकथांचा बराच परिणाम झालेला दिसतो बिकानेरच्या राजस्थानी साहित्यपीठाच्या साहित्य चळवळीने त्यांना प्रेरित केले. विशेषत. पीठाचे एक सदस्य नरोत्तमदास स्वामी याचा त्याच्या-वर विशेष प्रभाव पडला

१९५० पर्यंत आणि अनेक लघुकथा लिहिल्या गेल्यानंतर हे क्षेत्र विस्तारले. विविध विषयावर लघुकथा लिहिल्या जाऊ लागल्या. त्यात बदलती मूल्ये आणि दृष्टिकोन दिसू लागले. १९७०–८० या दशकाच्या मध्यात लघुकथा अधिक वास्तववादी आणि वैयक्तिक स्वरूपाची झाली. ह्या प्रवृत्ती अधिक प्रकर्षाने व स्पष्टपणे दिसू लागल्या. राजस्थानी ललित साहित्याचा मोठा भाग म्हणून सामा-जिक कथाकडे बोट दाखवता येईल. गेल्या चाळीस वर्षांत लिहिल्या गेलेल्या सामाजिक कथातील मुख्य प्रवाहाखाली दिले आहेत. कमी जास्त प्रमाणात हे सर्वच कथांत दिसून येतात.

सुधारणावादी आणि आदर्शवादी कथांत विशिष्ट सामाजिक समस्येचे उत्तर तरी सुचवलेले असते किंवा समस्येचे वास्तववादी वर्णन करून उत्तर काढण्याचे आवाहन केलेले असते अशा लघुकथा लेखकामध्ये मुरलीधर व्यास (वररागाठ, १९५६), मनोहर शर्मा (कन्यादान, १९७१), नानूराम संस्कर्ता (दस दोख–१९६६, ग्योथी–१९५७ घर की गाय, १९७०), नृसिंह राजपुरोहित (रात वासो–१९६१, अमर चुनडी, १९६९), अन्नाराम सुदामा (आंधै नै आख्या १९७१) आणि वैजनाथ पंवार (लाडेसर १९७०) याचा समावेश आहे.

सामाजिक जीवन आणि तत्त्वप्रणालीतील बदल यांचे वर्णन करणाऱ्या कथा लिहिणारे लेखक असे—श्रीलाल नथमल जोशी (परण्योडी कुंवारी, १९७४),

नृसिंह राजपुरोहित, बैजनाथ पवार (नैमान खुट्यो नीर, १९७७ वि स २०३४), नानूराम सस्कर्ता, मूलचद 'प्रणेश' (उकळता आंतरा शीळा सास, १९७३ आणि परदेसी री गोरडी, १९६५). इ.

काही लेखकानी समाजरचना, कुटुब आणि वैयक्तिक जीवनातील विविध पैलूतील बदलाचे वास्तवादी चित्रण केले. १९७० ते ८० या दशकाच्या मध्यात अनेक तरूण लेखकाचा कल याकडे होता. या काळात लिहिल्या गेलेल्या प्रभावी कथा अशा : रामेश्वरदयाल श्रीमाळीच्या 'जसोदा', 'काचळी' 'संजीवन' आणि 'सळवटा' बैजनाथ पवारची जापो, श्रीमाल नथमल जोशीची पगोथिया, नृसिंह राजपुरोहितच्या 'जडिक', 'कलम री मार' 'उत्तर भीरबा म्हारी बारी' आणि 'कुभाई भाग पडी'

रामनिवास शर्मा, किशोर कल्पनाकात, नद भारद्वाज, प्रेमजी' प्रेम', दामोदर-प्रसाद शर्मा (प्रीतात्मा री प्रीत, १९७३), रामप्रसाद चकलौ, सावर दैया (अस्वाडे पस्वाडे, १९७५), करणीदान बारहट (आदमी रो सीग, १९७४) भंवरलाल सुथार 'भ्रमर' (तगादो १९७२ आणि अमजो कड ताई १९७६) हे लेखक या दिशेने चागले प्रयत्न करीत आहेत.

ह्या सर्व लेखकानी आणि सत्यनारायण गगादास व्यास व मूळचद 'प्राणेश' याच्यासहित इतर लेखकांनी मानसशास्त्रीय कथाही लिहिल्या आहेत मात्र तुलनेने त्याची संख्या कमी आहे.

शोषिताच्या हालअपेष्टांचे चित्रण करणाऱ्या कथाही बऱ्याच लिहिल्या गेल्या. उलटपक्षी, मनोहर शर्मा याच्या काही कथात श्रीमतांचा दयाळूपणा आणि मानवतावादी दृष्टिकोन दिसून येतो सरंजामशाहीतल्या सत्ताधाऱ्यातील शौर्याचा गुण, दुर्बलाचे रक्षण करण्याची वृत्ती आणि वचननिष्ठता हेही दिसून येते

राजस्थानात वारंवार दुष्काळ पडत असतो विशेषतः काही भागात तर तो नेहमी पडतो. दुष्काळाची भयानकता, त्याचे परिणाम, गरिबाच्या हालअपेष्टा यांचे सुस्पष्ट चित्रण काही कथामधून दिसून येते. मुरलीधर व्यास याच्या 'मेह मामो' आणि 'पैट रो पाप', नृसिंह राजपुरोहित याची 'गाव री हयाई', बैजनाथ पवार याची 'धापी भूवा' (नौमान खूट्यो नीर, १९७७), पुरुषोत्तम छंगानी याची 'पूरब पच्छिम' या काही कथा या विषयावरच्या आहेत.

अन्ताराम सुदामा आणि इतराच्या काही कथांत आदर्शवादाचा पैलू स्पष्टपणे दिसून येतो.

काही थोड्या कथात वैयक्तिक वासना आणि भावना याचे चित्रण दिसते किशोर कल्पनाकाताची 'गीतां री बावळियो' हे त्याचे उत्तम उदाहरण आहे.

काही कथा कथेपेक्षा वर्णनात्मक आहेत. नृसिंह राजपुरोहित, भगवानदत्त गोस्वामी, नानूराम संस्कर्ता, मूलचद 'प्राणेश' आणि लक्ष्मीकुमारी चूडावत यानी अशा वर्णनात्मक कथा लिहिल्या आहेत

बद्रीप्रसाद साकरिया याची 'बारणै नै झरोखं रो कजियो, मूलचंद 'प्राणेश' 'दोय कूकरिया', अन्नाराम सुदामा याची 'आधै नै आख्या' आणि श्रीलाल नथमल जोशी याची 'खेजडी अर् बोती' या काही कथा प्रतिकात्मक म्हणता येतील.

सामाजिक कथानतर क्रमाक लागतो ऐतिहासिक व अर्ध-ऐतिहासिक कथाचा. या क्षेत्रातील अग्रणी म्हणून लक्ष्मीकुमारी चूडावत यांच्याकडे बोट दाखवता येईल. त्यानी माझल रात, १९५७, मूमल १९६१, गिर उचा उचा गुढा १९६०, रे चकवा वात १९६० आणि अमोलक वाता १९६२ या कथा लिहिल्या आहेत. यापैकी बहुतेक सर्व कथा पारपरिक राजस्थानी वात शैलीत लिहिल्या आहेत. वातावरणाचे हुबेहूब वर्णन, आल्हाददायक आणि अचूक भाषा, भावनाची ओघवती आणि सामर्थ्यवान अभिव्यक्ती ही त्याच्या कथेची वैशिष्टये आहेत

ब्रजमोहन जावलियाच्या 'झाळ जजाळ' (आज रा कहाणीकार या सग्रहात १९७६) मध्ये ऐतिहासिक व्यक्तिचित्रे विशेषतः पन्नादाईसारख्या व्यक्तिरेखाचे आल्हाददायक वर्णन आहे. त्याचा प्रयत्न प्रशसनीय आहे सौभाग्यसिंह शेखावत आणि इतरांनीही अशा कथा लिहिल्या आहेत

धार्मिक आणि पौराणिक कथात सत्यनारायण गंगादास व्यारा याच्या 'देवी सुभद्रा' आणि 'कच देवयानी' आणि नृसिंह राजपुरोहितच्या 'जोजन गधा' याचा समावेश आहे.

काही थोड्या विनोदी आणि उपरोधिक कथा आहेत, परतु त्या विनोदीपेक्षा औपरोधिक जास्त आहेत. नानूराम संस्कर्ता, श्रीलाल नथमल जोशी, रामदेव आचार्य, भगवानदत्त गोस्वामी, नारायणदत्त श्रीमाली, किशोर कल्पनाकात, ब्रज-नारायण पुरोहित (वकील साहब १९७३), रामनिरंजन शर्मा 'थिमाऊ' (बेमाता का आक, १९७५ वि. स. २०३२), रामेश्वरदयाल श्रीमाली आणि इतरांनी अशा कथा लिहिल्या आहेत.

पचतत्राच्या शैलीमध्येही काही कथा आहेत. यात कथेला फारसे महत्त्व नसते, तर एखादा विचार, तात्पर्य, कल्पना सांगितलेली असते. मनोहर शर्मांची 'सोनल भीग' (१९७६) हे त्याचे एक उदाहरण आहे

ऐतिहासिक आणि अर्ध ऐतिहासिक कथा वगळता इतर सर्व कथा ग्रामीण जीवन किंवा मध्यमवर्गीयाचे जीवन किंवा कनिष्ठ मध्यम वर्गीयाच्या जीवनाचे चित्रण करतात.

मध्ययुगीन राजस्थानी वात साहित्यावर मुख्यत्वे मनोहर शर्मा, कन्हैयालाल सहल, नरोत्तमदास स्वामी, सूर्यकरण पारीक, गोविंद अग्रवाल, सौभाग्यसिंह शेखावत आणि इतरांनी मोठेच कार्य केले आहे त्यांनी 'वात' प्रसिद्ध करून त्यांच्या महत्त्वावर आणि सौंदर्यावर प्रकाश टाकला.

## (३) नाटक, एकांकिका

### नाटक

शिवचंद्र भरतियांचे केसर विलास हे १९०० मध्ये प्रसिद्ध झालेले नाटक राजस्थानीमधील पहिले नाटक आहे. हे नाटक आणि फाटका जंजाळ व बुढापा की सगाई ही त्याची आणखी दोन नाटके सामाजिक कुप्रथांबाबत आहेत सुधारणावादी उद्दिष्टांनी ती प्रेरीत झालेली आहेत ती आदर्शवादी नसून त्यात समाज प्रबोधनाचा कल दिसून येतो. हाच कल भगवतीप्रसाद दारूका यांचे बालविवाह नाटक, वृद्धविवाह नाटक, सीठणा सुधार नाटक; गुलाबचंद नागौरी यांचे मारवाडी मौसर और सगाई जंजाळ (१९२३), बालकृष्ण लाहोटी यांचे कंया बिक्री आणि नारायणदास अग्रवाल यांची बालव्याव को फार्स, विद्या उदय, अकल बडी कै भैंस या नाटकात दिसून येतो. केसर विलास वगळता इतर कोणतीही नाटके रंगभूमीवर यशस्वी झाली नाहीत. मदनमोहन सिद्ध यांचे जयपुर की ज्योनार आणि जमनाप्रसाद पचोरिया यांचे नई बिनणी ही नाटके त्या मानाने थोडीफार यशस्वी झाली.

नारायणदास अग्रवाल यांची महाभारत को श्री गणेश आणि महाराणा प्रताप ही अनुक्रमे पौराणिक व ऐतिहासिक नाटके आहेत गिरधारीलाल शास्त्री यांचे प्राणवीर प्रताप (१९५८) आणि आज्ञाचंद भंडारी यांचे पन्नादाई ही देखील ऐतिसिक नाटके आहेत प्राणवीर प्रतापमधील पात्रे मेवाडी बोली बोलतात.

भरत व्यास यांचे ढोला मारवण (१९४९, वि. सं २००६) आणि रंगीलो मारवाडी (रामू चनणा) ही दोन नाटके रंगभूमीवर यशस्वी झाली, परंतु त्यात वाङ्मयीन मूल्ये नाहीत.

यादवेन्द्र शर्मा चंद्र यांच्या तास रो घर (१९७३) या नाटकात शहरातील आधुनिक जीवन, त्यातील गुंतागुत, बेकारी, भ्रष्टाचार, लैंगिक स्वातंत्र्य, इत्यादी चित्रित केले आहे. ते प्रभावी व जोरकस आहे.

बद्रीप्रसाद पचोलीचे 'पाणी पली पाळ' (१९७३) हे पाच अंकी नाटक असून महाभारत काळातील एका कथेवर आधारित आहे. ते मुख्यत्वे हाडौती या बोली भाषेत आहे. नाटककाराने देशाच्या प्रगती आणि समृद्धीसाठी दोन तत्त्वावर भर दिला आहे. ती म्हणजे 'अर्जन अर समर्पण' (कमवा आणि चांगल्या कामासाठी

वापरा) व 'पाणी पली पाल' (आधी दिलेला इशारा म्हणजे तुमच्या हातीचे शस्त्रच ! )

## एकांकिका

कलकत्त्याच्या वैश्योपकारक या हिंदी मासिकात 'कनक सुदर' या शीर्षकाखाली काही सवाद १९०४ मध्ये प्रसिद्ध झाले होते. १९०५ मध्ये माधव प्रसाद मिश्र यांनी या मासिकात बडा बजार नावाचा सवाद प्रसिद्ध केला होता. त्यात दोन प्रवेश होते. ते एक अंकी नाटकास जवळचे आहे. ते सामाजिक कुप्रथाबद्दल आहे.

शोभाचंद जम्मड याचे वृद्धविवाह विदूषण (१९३०) आणि श्रीनाथ मोदी याचे गाव सुधार या गोमा जाट (१९३१) ही एक अंकी नाटके सामाजिक सुधारणांविषयी आहेत. बोळावण किंवा प्रतिज्ञापूर्ती (राजस्थानी एकांकी संग्रहामधील, १९६६) हे सूर्यकरण पारीक यांचे एकअंकी नाटक असून त्यात प्राणार्पण करावे लागले तरी वचनपूर्ती करण्याची राजपूत परपरा दाखविली आहे.

गोविंदलाल माथूर (सतरंगिणी, १९५५) यांनी सामाजिक कुप्रथा त्याचप्रमाणे ग्रामीण आणि शहरी जीवनातील विविध ज्वलंत समस्यांवर सुमारे १२ नाटके लिहिली. ती वास्तववादी असून रंगमंचावर आणता येण्याजोगी आहेत.

नारायणदत्त श्रीमाली (चियां तावडो), दामोदरप्रसाद (तोप रो लायसेन्स) श्रीमंतकुमार व्यास (चानणो), जगदीश माथूर (पितरां रो आगमण) सुरेंद्र 'अचल' (रगत एक मिनख रो), सत्यनारायण 'अमन' (गुवाड री जायोडी), यादवेंद्र शर्मा (देवता), श्रीलाल नथमल जोशी आणि इतरांनीही अशीच एकअंकी नाटके लिहिली.

काही नाटकात सामाजिक समस्यावरची उत्तरे सुचवलेली आहेत. अशा नाटकांना आदर्शवादी दृष्टिकोनामुळे प्रेरणा मिळाली आहे. दिनेश खरेचे नवो मार्ग, निरंजननाथ आचार्यचे नहरी झगडो, नागराज शर्मांचे इब तो चेतो, आज्ञाचंद भंडारीचे बदला री आग, कन्हैयालाज दुगडचे आदर्श विद्यार्थी आणि नारायणदत्त श्रीमाळीचे माटी रो पौरेदार ही नाटके त्याची उत्तम उदाहरणे आहेत.

अनेक लेखकांनी राजपूत इतिहासातून विषय निवडले आहेत. मनोहर शर्मांचे नैनसी रो साको (१९७३), लक्ष्मीकुमारी चंद्रावतचे सात धर्मा माजी, आज्ञाचंद भंडारीचे देस भगत भामासा, रामदत्त साकृत्यची देस रो हेलो आणि जलम भोम री मूरत (गणपतीचंद्र भंडारीचे सीह जायासाव ही अशी काही नाटके आहेत. दामोदर प्रसादाचे कामरान की आखडल्यां ) हे मात्र अपवाद आहे.

रावत सारस्वत याचे री मौत, बैजनाथ पवार यांचे आपणो खास आदमी, विनोद सोमाणी 'हंस' यांचे रंग में भंग ही काही व्यंग्यात्मक नाटके आहेत. नागराज

शर्मा आणि रामनिरजन शर्मा यांनी विनोदी नाटके लिहिण्याचा प्रयत्न केला ( राम मिलाई जोडी, १९७२ आणि टमरक टू १९७२ वि. सं. २०२९)

या बहुतेक सर्व नाटकात आधुनिक रंगभूमी तन्त्राकडे दुर्लक्षच करण्यात आले आहे.

## (४) शब्दचित्रे, आठवणी आणि स्मृतिचित्रे

मुरलीधर व्यास हे या क्षेत्रातील मार्गदर्शक आहेत. त्याचे जूना जीवता चितराम (१९६०) यात अगदी अलिकडच्या काळापर्यंत दैनदिन जीवनात आवश्यक असलेले व्यावसायिक जे आता आधुनिकीकरणामुळे नष्ट होत चालले आहेत त्यांची व्यक्तिचित्रे रगवली आहेत.

श्रीलाल नथमल जोशी यांचा सबडका (१९६०) हा व्यक्तिचित्राचा संग्रह सर्वांत उल्लेखनीय आहे. काही थोडी शब्दचित्रे वगळता बाकी सर्व विनोदी आहेत. बहुतेक सर्व शब्दचित्रे प्रत्यक्षातील व्यक्तीवर आधारित आहेत असे दिसते. 'बड रो पेड' यात वडाचे झाड आपल्या आठवणी सागत आहे असे दाखविले आहे.

शिवराज छंगानी यानी आपल्या उणियारा आणि ओळखाण (१९७६) ही शब्दचित्रे याच नमुन्यावर बेतलेली दिसतात अनेक विपर्यस्त पत्राचे चित्रण उणियारात केलेले दिसते. ओळखाणमध्ये मुख्यत्वे स्त्रीपात्रे आहेत. कित्येक ठिकाणी वर्णनात व्यक्तिगत भावनेचा अभाव दिसतो आणि प्रबोधनाची वृत्ती दिसते

कुंजबिहारी शर्मा याची शब्दचित्रे (बाता ही चालै, १९६८ वि. सं. २०२५) इतकी नैसर्गिक, आल्हाददायक आणि तरल आहेत की या प्रकारच्या गद्य वाङ्मयात त्याचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे.

अन्नाराम सुदामाचे दूर दिसावर (१९७५) हे प्रवासवर्णन आहे. मजेदार तपशिलाचे बारकाईने निरीक्षण करून लेखकाने स्वतःच्याच शैलीने आपल्या आठवणी कथन केल्या आहेत.

ब्रजनारायण पुरोहित यानी अटाखां (१९७३) आणि वकील साहब (१९७३) यात मनोरंजक व्यक्तीचित्रणे आणि आठवणी लिहिल्या आहेत.

या वाङ्मयप्रकारात इतरही काही लेखकांनी भर घातली आहे. त्याचे किरकोळ लेखन विविध मासिकांतून प्रसिद्ध झाले आहे. दीनदयाल जोशी याची लोग केवै कमावै कोनी आणि कर्णं कमावा वीरा, मनोहर शर्मा याची बैजो छैल, पनजी भगत आणि बडा माजी, नेमनारामण जोशी यांची कूदण बाबो, कुत्तां रो राजा, सुरजो नायक आणि गोगाजी रा घोडा, ओंकार पारिक यांचे हेमी, मोहनलाल पुरोहित याचे दौलुभा, भंवरलाल नाहटांचे लाभू बाबो (बानगी, १९६५) दीनानाथ

खत्रीचे पारो आणि भगवानदत्त गोस्वामी याचे अन्नदाता नै अरज करू यांचा त्यात समावेश आहे.

## (५) गद्यकाव्य

फारच थोड्या लेखकानी हा वाङ्मयप्रकार हाताळला आहे. चंद्रसिंह यांचे गद्यकाव्याचे नऊ लेख 'सीप' या शीर्षकाखाली प्रथम १९४६ मध्ये प्रकाशित झाले. ज्या इतर लेखकानी गद्यकाव्याचा प्रकार हाताळला त्यात पुढील लेखकाचा समावेश आहे—लक्ष्मीकुमारी चूंडावत (मात भोम), बैजनाथ पवार (बो आयो अर चाल्यो गयो), मनोहर शर्मा (सोनल भींग) आणि गोविंद अग्रवाल (नुकती दाणा, १९७८.) मात्र कन्हैयालाल सेठिया यांची या वाङ्मयप्रकारातील कामगिरी अद्वितीय आहे. त्यांच्या गळ गचिया (१९७२) या पुस्तकात गद्यकाव्याचे ६४ नमुने आहेत. यात त्यानी भावनाची डूब देऊन आपल्या कल्पना आणि विचार मोठ्या संक्षेपाने आणि सुबोधपणे व्यक्त केले आहेत.

## (६) निबंध आणि इतर प्रकार

### निबंध

आधुनिक काळात फारसे निबंध लिहिले गेले नाहीत. येथून पुढे उल्लेखिलेल्या इतर प्रकारांबद्दलही हेच म्हणता येईल. बहुतेक सर्व निबंध वर्णनात्मक आहेत. अगदी पहिला निबंधसदृश प्रकार पहावयाचा झाला तर शिवचंद्र भरतिया यांनी आपल्या कनक सुंदर, फाटका जंजाळ इ. राजस्थानी पुस्तकाना लिहिलेल्या प्रस्तावना पहाव्या लागतील.

भावनात्मक आणि डौलदार निबंध लेखनात ब्रजलाल बियाणी हे मार्गदर्शक म्हणावे लागतील त्यांचे 'मोगरा कली', 'बडी फजर को दीवो', 'मारवाडी बोली' इत्यादी निबंध सुंदर आहेत. याच दृष्टीने गिरीराज भंवर (पणघट री सांझ) हे देखील उल्लेखनीय आहेत कृष्णगोपाल शर्मांचा 'ऐ उतरयोडा घडा' हा व्यक्तिगत निबंध आहे. कावेरी कात यांचा 'मांडगी सू फायडा' आणि धनुर्धारी यांचा 'बस म्हाने स्वराज्य होणो' हे विनोदी आणि उपरोधात्मक निबंध आहेत. मनोहर शर्मा यांचे रोहिडे रा फूल (१९७३) या पुस्तकातील निबंध मोठे मनोरंजक आहेत. इतर निबंध लेखक असे—लक्ष्मीकुमारी चूंडावत (मेवाडी फागण), श्रीलाल नथमल जोशी (सच बोल्यां कियां पार पडै) आणि रावत सारस्वत (थोथी बातां).

### लेख आणि वाङ्मयीन समीक्षा

अनेक आधुनिक लेखकानी प्रस्तावना, परीक्षणे आणि समीक्षा लिहिल्या आहेत. नरोत्तमदास स्वामी, अगरचंद नाहटा आणि मनोहर शर्मा हे या प्रकारचे

लेखन करणारे प्रमुख लेखक आहेत. रावत सारस्वत, किशोर कल्पनाकांत, चंद्रदान चारण, श्रीलाल मिश्र आणि इतर अनेकांनी असे लेखन केले आहे. हे त्यांचे प्रयत्न निबंधापेक्षा लेख या सदरात मोडतात.

हे लेख सोडले तर राजस्थानीमध्ये वाङ्मयीन टीका या क्षेत्रात लिहिण्याचे फारसे प्रयत्न झालेच नाहीत.

## चरित्रे

दीनदयाल ओझा यांनी मुलांकरता आधुनिक भारतातील अनेक राष्ट्रीय नेत्यांची चरित्रे लिहिली. देश रा गौरव १९७२, भारत रा निर्माता १९७२ आणि छोटी उमर मोटा काम १९७२ हे त्यांचे या क्षेत्रातील काही लेखन आहे. स्वामी दयानंद सरस्वती, ईश्वरचंद्र विद्यासागर, राजा राममोहन रॉय, लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, सरदार पटेल, लाला लजपतराय, जवाहरलाल नेहरू, चित्तरंजन दास आणि सुभाषचंद्र बोस यांच्यावर त्यांनी लिहिले.

श्रीलाल नथमल जोशी यांनी लिहिलेले आपणा बापूजी (१९६९) हे महात्मा गांधींवर आहे. शांता भानावत यांचे महावीर री ओळखाण (१९७५) हे भगवान महावीरवर आहे. ही पुस्तके वस्तुनिष्ठ व साध्या भाषेत आहेत.

## मासिके

राजस्थानी भाषा आणि वाङ्मयाच्या विकासात आणि समृद्धीत मासिके-नियतकालिके यांनी मोठीच कामगिरी बजावली. या शतकाच्या सुरवातीला सामाजिक सुधारणाविषयक अनेक लेख मुख्यतः स्थलांतरित राजस्थानी लेखकांनी लिहिले. ते अनेक हिंदी मासिकांत छापून येत असत. उदा. वैश्योपकारक (कलकत्ता), माहेश्वरी (अलिगढ) आणि पंचराज (नासिक). राजस्थानी लिखाणाला अलाहाबादच्या हंस आणि कलकत्त्याच्या विशाल भारत या सुप्रसिद्ध हिंदी मासिकात स्थान मिळाले. त्याचप्रमाणे काही राजस्थानी मासिकेही यासाठी उपयुक्त ठरली. मात्र ती अल्पजिवी ठरली. मारवाडी (अहमदनगर), मारवाडी भास्कर (सोलापूर), मारवाडी हितकारक (धामणगाव) आणि आगीवाण (ब्यावर) ही ती मासिके होत. कलकत्त्याच्या राजस्थानी अणि राजस्थान या दोन हिंदी मासिकांत जुन्या वाङ्मयाखेरीज नवी रचनाही प्रकाशित झाली. काही महाविद्यालये आणि शाळांच्या नियतकालिकांतूनही असे साहित्य प्रसिद्ध झाले.

स्वातंत्र्यानंतर राजस्थानात अनेक नियतकालिके सुरू करण्यात आली. हिंदी मासिकांत वाङ्मय, भाषा, इतिहास आणि संस्कृती या विषयावरचे लिखाण प्रसिद्ध

होत होते. जुन्या साहित्याप्रमाणेच नवे साहित्यही छापले जात होते. ही मासिके अशी–शोधपत्रिका (उदयपूर), राजस्थान भारती वैचारिकी, विश्वभरा (बिकानेर), मारु भारती (पिलानी), परंपरा (चोपासनी, जोधपूर), वरदा (बिसाऊ), मारू श्री (चुरू), वाणी – ज्याचे नाव नतर लोकसंस्कृती ठेवण्यात आले (बोरुंदा, जोधपूर), वाग् राजस्थानी रत्नाकर (डूगरपूर), हाडौती पत्रिका–नंतरचे नाव चिदम्बरा (कोटा) आणि संघशक्ती (जयपूर). यांपैकी अनेकांनी उत्कृष्ट कामगिरी केली आणि महत्त्वाचे स्थान प्राप्त केले.

आधुनिक राजस्थानी भाषा आणि साहित्य या क्षेत्रांत लक्षणीय आणि मौल्यवान कार्य राजस्थानी मासिकांनी केले या संदर्भात आपण याआधी मरुवाणी (जयपूर) आणि ओळमो (रतनगढ) यांची नोंद घेतली आहे. मारवाडी हे मासिक श्रीमतकुमार व्यास जोधपूरहून प्रसिद्ध करीत असत त्यानंतर हरावळ (पूर्वी मुंबईहून, आता जोधपूरहून), कुरजा (रतनगढ), ओळखाण, जानकारी (जोधपूर), जलमभोम, हेलो, मूमल (बिकानेर), चामल (कोटा), लाडेसर, शरवर, नैणसी, म्हारो देश (कलकत्ता), राजस्थानी 'एक' आणि 'दीठ' (रणसिसर, नागौर), इसरलाट (जयपूर) आणि इतरांचा क्रमाक लागतो. यातील काही मासिके अल्पजिवी ठरली; परतु राजस्थानी भाषा आणि साहित्यासाठी त्यानी उपयुक्त कार्य केले.

## राजस्थानी भाषा आणि वाङ्मयाचा हेतू

राजस्थानी साहित्य अकादमी (संगम) ची उदयपूर येथे १९५८ मध्ये झालेली स्थापना आणि त्यांच्या मधुमती या नियतकालिकाचे प्रकाशन या घडामोडींमुळे राजस्थानच्या लेखकाच्या लिखाणाला नवी चालना मिळाली. अकादमीचा स्वतंत्र विभाग म्हणून बिकानेरमध्ये १९७२ साली राजस्थानी भाषा साहित्य संगम (अकादमी)ची स्थापना झाली. त्या विभागाने १९७३ पासून राजस्थानीत जागती जोत या नियतकालिकाचे प्रकाशन सुरू केले. त्यामुळेही राजस्थानी भाषा आणि वाङ्मयाच्या विकासाला हातभार लागला. नवी दिल्लीच्या साहित्य अकादमीने राजस्थानीला स्वतंत्र आधुनिक साहित्यिक भाषा म्हणून दिलेली मान्यता आणि जोधपूर विद्यापीठात स्वतंत्र राजस्थानी विभाग उघडण्यात आल्यानंतर वाङ्मयीन विकासाला आणखी वेग आला

आधुनिक काळात राजस्थानी व्याकरण आणि शब्दकोश यांकडेही विशेष लक्ष गेले. आधुनिक शब्दकोशाचे संपादन करण्याचे काम प्रथम रामकरण आसोपा यांनी हाती घेतले. त्याच्या कार्याची आपण याआधी ओळख करून घेतली आहे· त्याच्या नतर सीताराम लालस यांनी या क्षेत्रात काम केले. त्यांचा राजस्थानी

शब्दकोश (राजस्थानी – हिंदी डिक्शनरी) ९ खंडात प्रसिद्ध झाला (१९६२–७९). त्यात वाक्प्रचार आणि म्हणींव्यतिरिक्त २ लाख राजस्थानी शब्द आहेत.

रामकरण आसोपा यांच्या राजस्थानी व्याकरणाच्या पहिल्या कृतीनंतर सीताराम लालस याचे राजस्थानी व्याकरण (१९५४) आणि नरोत्तमदास स्वामी याचे संक्षिप्त राजस्थानी व्याकरण (१९६०) प्रसिद्ध झाले मोतीलाल मेनारिया यानी आपल्या राजस्थानी भाषा और साहित्य (दुसरी आवृत्ती, १९५१, वि. स. २००८) मध्ये राजस्थानी भाषा व व्याकरणाची संक्षिप्त माहिती दिली आहे. त्या पाठोपाठ ह्या पुस्तकाचे लेखक डॉ. हिरालाल माहेश्वरी याचे राजस्थानी भाषा और साहित्य (वि सं. १५००–१६५०) १९६० मध्ये प्रकाशित झाले.

राजस्थानी भाषा आणि वाङ्मयाचे मूळ, विकास आणि वाढ याविषयीच्या माहितीचा आपण येथे समारोप करूया. सुमारे दहा शतकाच्या काळातील माहिती येथे देण्यात आली आहे. या काळात निर्माण झालेल्या साहित्यकृती आणि लेखक कोणत्याही साहित्याला अभिमान वाटावे असेच आहेत. एकंदर भारतीय साहित्याच्या समृद्धीत त्यांनी मोलाची भर घातली आहे.

या पुस्तकाने राजस्थानी भाषा आणि साहित्यातील प्रवाह व प्रवृत्तींची माहिती व्हायला मदत होईल; इतकेच नव्हे तर देशाचा बाकीचा भाग व साहित्याशी असलेला राजस्थानचा दुवा जाणण्यासाठीही याची मदत होईल, अशी आम्हाला आशा आहे.

# संदर्भ ग्रंथ

## पुस्तके


अग्रवाल स्वर्णलता . राजस्थानी लोकगीत · राजस्थान साहित्य अकादमी (संगम), उदयपूर, १९६७.

आसोपा रामकरण : मारवाडी व्याकरण : जयनारायण आसोपा, मंगल मार्ग, बापूनगर, जयपूर.

भानावत महेन्द्र · लोकनाट्य : परंपरा और प्रवृत्तियाँ, बाफना प्रकाशन, जयपूर, १९७१

भानावत महेन्द्र : राजस्थानी वेलि साहित्य : राजस्थान साहित्य अकादमी (संगम), उदयपूर, १९६५.

भाटी नारायणसिंह : डिंगल गीत साहित्य : चिन्मय प्रकाशन, जयपूर, १९७१.

चारण चंद्रदान : अलखिया संप्रदाय · भारतीय विद्या मंदिर शोध प्रतिष्ठान, बिकानेर, १९६४.

चॅटर्जी सुनीतीकुमार : राजस्थानी भाषा : साहित्य संस्थान, राजस्थान विद्यापीठ, उदयपूर, १९४९.

गोयल रामगोपाल : राजस्थान के प्रेमाख्यान; परंपरा और प्रगती : राजस्थान प्रकाशन, त्रिपोलिया बझार, जयपूर, १९६९.

लालस सीताराम : १) राजस्थानी सबद कोश (भाग १) (प्रास्ताविक) : राजस्थानी शोध संस्थान, चोपासनी, जोधपूर, वि. स. २०१८.

२) राजस्थानी व्याकरण : १९५४, लेखक, २४१ अ, शास्त्रीनगर, जोधपूर.

माहेश्वरी हिरालाल : १) राजस्थानी भाषा और साहित्य (वि. सं. १५००-१६५०): आधुनिक पुस्तक भवन, कलाकार स्ट्रीट, कलकत्ता, १९६०.

२) जाभोजी, विश्नोई सम्प्रदाय और साहित्य (२ भाग) : बी. आर. पब्लिकेशन, ६, प्रिटोरिया स्ट्रीट, कलकत्ता, १९७०.

मेनारिया मोतीलाल : १) राजस्थानी भाषा और साहित्य : हिंदी साहित्य सम्मेलन, प्रयाग, वि. स. २००८.

२) राजस्थानी का पिंगल साहित्य : हितैषी पुस्तक भाडार, उदयपूर, १९५२

नाहृटा किरण : आधुनिक राजस्थानी साहित्य : प्रेरणा स्रोत और प्रवृत्तियाँ, चिन्मय प्रकाशन, जयपूर, १९७४.

शर्मा के. के. : राजस्थानी लोक गाथा का अध्ययन . राजस्थान प्रकाशन, त्रिपोलिया बझार, जयपूर.

शर्मा मनोहर : राजस्थानी बात साहित्य; एक अध्ययन : 'परपरा' अंक ४२–४३, १९७६, राजस्थानी शोध सस्थान, चोपासनी, जोधपूर.

शर्मा शिवस्वरूप 'अचल' : राजस्थानी गद्य साहित्य . सादूल राजस्थानी रिसर्च इन्स्टिटयूट, बिकानेर, १९६१.

शेखावत सौभाग्यसिंग : १) राजस्थानी निबंध संग्रह : हिंदी साहित्य मंदिर, जोधपूर, १९७४.

२) राजस्थानी साहित्य सपदा : राजस्थानी भाषा साहित्य (सगम), बिकानेर, १९७७.

सिंग भगवतीप्रसाद . राम-भक्ती साहित्य मे मधुर उपासना : अवध साहित्य मदिर, बलरामपूर, वि. सं. २००८

स्वामी बलरामदास : श्री रामस्नेही अनुभव आलोक : श्री राम सत्संग मंडल, रेन, १९६५.

स्वामी मंगलदास : १) दादू सप्रदाय का संक्षिप्त परिचय : श्री स्वामी लक्ष्मीनारायण ट्रस्ट, जयपूर.

२) श्री महाराज हरिदासजी की वाणी : दादू महाविद्यालय, मोती डूँगरी रोड, जयपूर, १९६२.

स्वामी नरोत्तमदास : १) राजस्थानी साहित्य; एक परिचय : नवयुग, ग्रथ कुटिर, बिकानेर, १९७५.

२) संक्षिप्त राजस्थानी व्याकरण : सादूल राजस्थानी रिसर्च इन्स्टिटयूट, बिकानेर, १९६०.

तेस्सितोरी एल. पी : नोट्स् ऑन दि ग्रामर ऑफ दि ओल्ड वेस्टर्न राजस्थानी विथ स्पेशल रेफरन्स टू अपभ्रंश अँन्ड गुजराती अँन्ड मारवाडी इंडियन अँटिक्वेरी, कलकत्ता, एप्रिल १९१४ ते जुलै १९१६.

त्रिपाठी आर. पी. : रामस्नेही सप्रदाय : आनंद प्रकाशन, फैझाबाद १९७३.

## मासिके

मरु भारती : बिर्ला एज्युकेशन ट्रस्ट, पिलानी.

मरु वाणी : राजस्थान भाषा प्रचार सभा, डी–२८२, मीरा मार्ग, बनी पार्क, जयपूर.

नागरी प्रचारिणी पत्रिका : अंक ३–४, वर्ष ७१, वि. स. २०२३, नागरी प्रचारिणी सभा, वाराणसी.

परंपरा : राजस्थानी शोध संस्थान, चोपासनी, जोधपूर.

राजस्थान भारती : सादूल राजस्थानी रिसर्च इन्स्टिटयूट, बिकानेर.

शोध पत्रिका : साहित्य सस्थान, राजस्थान विद्यापीठ, उदयपूर.

वैचारिकी : भारतीय विद्या मंदिर शोध प्रतिष्ठान, रतनबिहारीजी पार्क, बिकानेर.

वरदा : राजस्थान साहित्य समिति, बिसाऊ (राजस्थान).

## हस्तलिखिते

खालील व्यक्ती किंवा संस्थांपाशी उपलब्ध असलेली विविध हस्तलिखिते विचारात घेतली आहेत :

१. अनूप संस्कृत लायब्ररी, लालगड पॅलेस, बिकानेर.
२. एशियाटिक सोसायटी, पार्क स्ट्रीट, कलकत्ता.
३. श्री दुलिचद गुप्ता, १२४, आर्यनगर, अल्वर (सेवानिवृत्त शिक्षक, बहादुरपूर).
४. प्रा. कृपाशंकर तिवारी, १ म्युझियम मार्ग, जयपूर.
५. श्री राधाकृष्ण नेवटिया, ५२, झकरिया स्ट्रीट, कलकत्ता.
६. राजस्थान ओरिएटल रिसर्च इन्स्टिटयूट, उदयपूर.
७. श्री रावत सारस्वत, डी–२८२, मीरा मार्ग, बनी पार्क, उदयपूर.
८. सेठ सूरजमल जालान पुस्तकालय, राम मंदिर, १८६, चित्तरंजन अॅव्हेन्यू, कलकत्ता.

# सूची

घ



च

झ

ल

## ह

### ज्ञ